# स्वामी विवेकानंद

यांचे

# समग्र ग्रंथ.



पंचम खंड.

१९१६.

Printed and published by G. N. Kulkarni,
at his Karnatak Printing Press,
No. 434, Thakurdwar,
Bombay.

अंधासी सूर्य प्रसन्न ।
झालिया देखे तो निधान ।
तेवीं प्रकटोनि जनार्दन ।
हें गुह्यज्ञान बोलवी ॥ १ ॥
सकळ साधनांचें निजसार ।
सांख्ययोगविवेक सधर ।
त्या साराचेंही निजसार ।
तुझी भक्ति साचार श्रीकृष्णा ॥ २ ॥
जाणोनि भक्तीचें रहस्य ।
हृदयप्रेमा लोधलें मानस ।
तेंचि विज्ञान राजहंस ।
भजनसारांश सेविती ॥ ३ ॥

—श्री एकनाथ.

# विनंति.

यूरोपांत चालू असलेल्या महायुद्धाचे परिणाम आमच्याकडील सर्व धंद्यांस कसे जाणवत आहेत, हें कोणास नव्यानें सांगावयास नको. प्रकाशकाचा धंदा सर्वतोपरी परदेशीय जिनसांवर अवलंबून असल्यामुळें तो चालू कसा राखावा हीच काळजी प्रकाशकांस पडली आहे. प्रत्येक जिनसाचे भाव दुप्पट तिप्पट वाढले; यामुळें प्रकाशकांस किंमतीही वाढविणें भाग पडलें; अशा स्थितींत प्रस्तुत प्रकाशनाचें कार्य तूर्त बंद ठेवावें असाही विचार एकवार आमच्या मनांत आला होता. किंमत अधिक करावी असें वाटेना आणि चालू किमतींत कार्य पुढें चालू ठेवणें फार जड जाऊं लागलें. तथापि परमेश्वराच्या कृपेवर आणि आमच्या आश्रयदात्यांच्या मदतीवर विश्वास ठेवून हें कार्य चालू ठेवण्याचा निश्चय आह्मीं केला आहे. आमच्या आश्रयदात्यांनीं कृपा करून प्रत्येकीं एक दोन नवीन वर्गणीदार मिळवून दिले तरच ही माला पुढें चालविणें शक्य आहे. नाहींतर भरपूर आश्रयाच्या अभावीं ती चालू ठेवणें प्रस्तुत स्थितींत तरी आह्मांस शक्य नाहीं, असें मोठ्या कष्टानें आह्मीं आमच्या वाचकवर्गास कळवितों.

प्रस्तुत खंडाच्या प्रकाशनासही बराच अवधि लोटला आहे. त्याचप्रमाणें बांधणींतही कांहीं फरक झाल्याचें आमच्या आश्रयदात्यांस आढळून येईल. तथापि सांप्रतच्या परिस्थितीकडे लक्ष देऊन व सर्वत्र किमती वाढल्या असतांही आह्मीं पूर्वींचीच किंमत कायम ठेविली आहे हें ध्यानीं आणून आमचा वाचकवर्ग आह्मांवर रुष्ट होणार नाहीं असा आह्मांस भरंवसा आहे.

आमच्या आश्रयदात्यांनीं आह्मांस भरपूर मदत केली तरच पुढील खंड लवकर प्रसिद्ध होणें शक्य आहे इतकें शेवटीं सांगून तूर्त त्यांची रजा घेतों.

—प्रकाशक.

# अनुक्रमणिका.



# स्वामी विवेकानंद यांचे समग्र ग्रंथ

## पंचम खंड.

## कोलंबो-आलमोरा व्याख्यानमाला.

### कलकत्ता येथील मानपत्र व त्यास उत्तर.

[ स्वामी विवेकानंद हे कलकत्ता येथें आल्यानंतर हजारों लोकांनीं अत्यंत उत्साहपूर्वक त्यांचें स्वागत केलें. आगमनानंतर आठ दिवसांनीं राजा राधाकांत देव बहादुर यांच्या घरीं मोठी सभा भरून त्यांस रौप्यकरंडकांतून एक मानपत्र अर्पण करण्यांत आलें. या प्रसंगीं राजा विनयकृष्ण देव बहादुर यांनीं अध्यक्षस्थान स्वीकारलें होतें. ]

श्रीमत् विवेकानंद स्वामी यांस,

प्रियबंधु, आपण जन्मभूमीस परत आलां आहां, अशा प्रसंगीं आह्मीं कलकत्ता आणि बंगाल्यांतील इतर ठिकाणचे हिंदू रहिवाशी आपलें मनःपूर्वक स्वागत करतों. जगाच्या निरनिराळ्या भागांत केवळ हिंदूधर्माचाच नव्हे, तर आमच्या एकंदर देशाची आणि विशेषतः आमच्या प्रांताची जी आपण कीर्ति वाढविली आहे, तिजबद्दल आभारयुक्त अंतःकरणानें आणि अभिमानपूर्वक आह्मी आपलें स्वागत करतों.

शिकागो येथें १८९२ सालीं जी महाधर्मपरिषद् भरली होती, तींत आपण आर्यधर्माच्या तर्फे मुख्य प्रतिनिधित्व स्वीकारिलें होतें. आर्यधर्मा-

संबंधीं तेथें जें व्याख्यान आपण दिलेंत, त्यामुळें आमच्या धर्माचें एक नवेंच स्वरूप तेथील श्रोत्यांच्यापुढें मांडलें गेलें. आपण ज्या पद्धतीनें हें धर्मप्रवचन केलें, ती पद्धतीही अत्यंत मोहक आणि जोरदार अशी होती. यामुळें श्रोत्यांच्या चित्तावर आमच्या धर्मासंबंधीं पक्का ठसा उमटला. कित्येकांना त्यांत कांहीं शंका आल्या असतील व कांहीं थोड्या जणांनीं त्यावर कांहीं टीकाही केली असेल; तथापि सामान्य दृष्टीनें पाहतां सुसंस्कृत अमेरिकन जनतेच्या धार्मिक कल्पनांत आपल्या व्याख्यानामुळें मोठी क्रांति घडून आली, असें ह्मणावयास हरकत नाहीं. त्यांच्या चित्तावर एक नवाच प्रकाश पडला, आणि अमेरिकन लोक सत्याचे मनःपूर्वक चाहते असल्यामुळें, त्यांनीं आपला फायदा करून घेण्याची संधी वायां जाऊं दिली नाहीं. यामुळें आपणासही आपलें कार्य करावयास अधिक संधि मिळाली आणि आपलें कार्यक्षेत्रही विस्तृत झालें. पुष्कळ संस्थानांतल्या बऱ्याच शहरांतून आपणास एकसारखीं बोलावणीं येऊं लागलीं, आपणास अनेकांकडून अनेक प्रकारचे प्रश्न विचारले गेले आणि अनेकांनीं आपली शंकानिवृत्ति करून घेतली. आपण हें कार्य मोठ्या सामर्थ्यानें आणि मनःपूर्वक पार पाडलें, यामुळें आपल्या कार्याचे चिरस्थायी असे परिणाम घडून आले आहेत. आपल्या धर्मशिक्षणाचा परिणाम पुष्कळ सुसंस्कृत अमेरिकन लोकांच्या चित्तावर कोरला गेला आहे आणि त्यामुळें नवे विचार आणि नव्या कल्पना यांच्या संशोधनास प्रोत्साहन मिळालें आहे. तसेंच त्यामुळें हिंदुधर्माचीं ध्येयें तिकडील लोकांस अधिकाधिक पटूं लागून त्यांच्या धार्मिक कल्पनांस नवेंच वळण मिळालें आहे. निरनिराळ्या धर्मांचा आणि तत्वज्ञानपद्धतींचा अभ्यास करण्याकरितां तेथें अनेक संस्था आणि मंडळ्या स्थापन झाल्या आहेत; आणि यावरूनच पाश्चात्य देशांत आपल्या मेहनतीचें कसें चीज होत आहे याची साक्ष पटते. वेदान्ताच्या शिक्षणाकरितां लंडनमध्यें जें कॉलेज स्थापन झालें आहे, त्याचे आद्यप्रवर्तक आपणच आहांत, असें ह्मणावयास हरकत नाहीं. आपल्या व्याख्यानास पुष्कळ श्रोते येत असत आणि तीं त्यांच्या पसंतीसही उतरत. व्याख्यानाच्या जागीं जमलेल्या श्रोत्यांवरच केवळ नव्हे, तर बाहेरच्या अनेक जनसमूहावरही आपल्या व्याख्यानांचा परिणाम घडला आहे. वेदान्ताचा अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांनीं आपल्या

गमनप्रसंगीं लंडन येथें जें मानपत्र आपणांस दिलें आणि त्या प्रसंगीं जे उद्गार त्यांनीं काढले, त्यांवरून आपण तिकडील लोकांचें केवढें प्रेम आणि केवढी मान्यता संपादन केली आहे हें उघड दिसून येतें.

धर्मगुरु या नात्यानें जी यशाची प्राप्ति आपणास झाली, ती केवळ आपल्या आर्यधर्माच्या अत्युच्च ज्ञानामुळें झाली असें नव्हे, अथवा आपल्या वक्तृत्वांत आणि लेखांत जी कार्यकुशलता दिसून आली, तीमुळेंच नव्हे, तर आपल्या वैयक्तिक मोठेपणामुळेंच विशेषत: ही यश:प्राप्ति झाली आहे. आपलीं व्याख्यानें, आपले निबंध आणि आपण लिहिलेले ग्रंथ या सर्वांत तत्त्वदर्शन आणि साहित्य यांच्या दृष्टीनें उच्च दर्जाचे गुण प्रगट झाले आहेत. आणि त्यांचा जो परिणाम होणें योग्य होतें तोच झाला आहे. आपल्या स्वत:च्या साध्या, मन:पूर्वकतेच्या आणि संन्यस्त-वृत्तीच्या वागणुकीमुळें या सुपरिणामांत अधिकच भर पडली आहे.

आमच्या धर्माच्या सत्य प्रमेयांचें उद्घाटन करण्यांत जें कार्य आपण बजाविलें आहे, त्याजबद्दल आपलें अभिनंदन करीत असतां आपले पूज्य गुरू श्रीरामकृष्ण परमहंस यांचा आदरपूर्वक उल्लेख करणें आम्हास अवश्य वाटतें. श्रीरामकृष्णांमुळेंच आपला लाभ आम्हांस झाला आहे. आपणामध्यें जो तीव्र तेजाचा अंश होता, तो श्रीरामकृष्णांनीं आपल्या दिव्य दृष्टीनें जाणला आणि त्या वेळीं आपल्या आयुष्यक्रमास जें वळण त्यांनीं लाविलें, त्याचा उत्तम परिपाक आज सुदैवानें होत आहे. परमेश्वराच्या कृपेनें आपणांस जी गूढ दृष्टि प्राप्त झाली होती, तिजवरील पडदा श्रीरामकृष्णांनीं स्वहस्तें दूर केला. आपल्या ठिकाणीं जे विचार आणि ज्या आकांक्षा वास करीत होत्या, त्यांस आपल्या पुण्यहस्तानें त्यांनीं वळण दिलें आणि पराविद्येच्या प्रदेशांत प्रवेश करावयास आपणास त्यांनीं मदत केली. भावी पिढ्यांकरितां आपल्या रूपानें त्यांनीं एक बिनमोल ठेवा आपल्या मागें ठेविला आहे.

स्वामीमहाराज, आपण पसंत केलेल्या मार्गानें, धिमेपणानें आणि शौर्यानें असेच पुढें चला. आपणास जग जिंकावयाचें आहे. अज्ञ, संशयित अंत:करणाचे आणि जे मुद्दाम अंध बनले आहेत, अशा लोकांस हिंदूंच्या धर्माचें ज्ञान करून देऊन त्या धर्माचें उच्चत्व त्यांच्यासमोर आपणास

स्थापावयाचें आहे. आपण ज्या उमेदीनें हें कार्य हातीं घेतलें आहे, ती उमेद पाहून आम्हांस सानंद आश्चर्य वाटतें. आपण अनेक देशांत आजच मोठें यशसंपादन केलें आहे; तथापि पुष्कळ कार्यभाग अद्यापि शिल्लक आहे. तसेंच आपला देशही आपणासाठीं मार्गप्रतिक्षा करीत आहे. हिंदुधर्मांतील सत्यप्रमेयांचें उद्घाटन पुष्कळ हिंदुलोकांसमोरही आपणास करावें लागेल. या महत्कार्यासाठीं आपण कंबर बांधिली पाहिजे. आपण हें महत्कार्य पार पाडण्यास समर्थ आहां, असा आमचा पूर्ण विश्वास आहे. तसेंच हें आमचें कार्य सत्कार्य आहे, अशीही आमची पक्की भावना आहे. आमच्या राष्ट्रीय धर्माला केवळ ऐहिक विजय संपादन करावयाचा नाहीं. त्याचें कार्य पारलौकिक आहे. त्यांतील सत्यत्व जड दृष्टीपासून लपविलेलें आहे, आणि केवळ विचारवंतासच तें सुलभ होणारें आहे. सर्व जगाला आणि जेथें जरूर असेल तेथें आपल्या हिंदुबांधवांनाही आपले अंतश्चक्षु उघडण्यास, इंद्रियातीत होण्यास, धर्मग्रंथांचें रहस्य समजण्यास, सत्य वस्तूंचें उद्घाटन करण्यास आणि मानवजन्माचें खरें सार्थक करून घेण्यास आपण आव्हान करा. अशाप्रकारची जागृति उत्पन्न करण्यास आपणाहून अधिक योग्य असा दुसरा कोणी सांपडणार नाहीं. या आपल्या कार्यांत आम्हीं अंतःकरणपूर्वक आपणास मदत करूं असें आश्वासन देतों. या कार्यावर परमेश्वरानेंच आपली योजना केली आहे.

**आपले मित्र आणि चहाते.**

* * *

## स्वामींनीं दिलेलें उत्तर.

कोणी केवळ स्वतःच्या अस्तित्वांत साऱ्या विश्वाच्या अस्तित्वाचा अंतर्भाव करूं पाहतात, कोणी संन्यस्तवृत्ति धारण करूं पाहतात, कोणी देहाच्याही बंधनांतून मुक्त होण्याचा यत्न करतात. आपण अमुक एक व्यक्ति आहों हें-सुद्धां विसरण्याकरितां कित्येक धडपड करीत असतात. तथापि अंतःकरणाच्या अत्यंत गूढ अशा भागांत एक मृदु ध्वनि उमटत असतो, एक सूक्ष्म तार तेथें वाजत असते. “ स्वगृह अत्यंत प्रिय आहे ” अशा अर्थाचा हा ध्वनि आहे. कलकत्ता शहरच्या रहिवाशांनों, संन्यासी ह्मणून अथवा एखादा धर्म-प्रचारक ह्मणून मी तुह्मांमध्यें आलों नाहीं. माझ्या लहानपणीं ज्या मोकळ्या

वृत्तीनें मी येथें चालतबोलत असें, त्याच शिशुवृत्तीनें तुमच्याशीं बोलण्याकरितां मी येथें आलों आहें. अहाहा ! त्याच शिशुवृत्तीनें या शहरच्या रस्त्यांतल्या धुळींत खेळावें आणि तितक्याच मोकळेपणानें तुमच्याशीं संभाषण करावें अशी माझी इच्छा आहे. तुह्मीं बंधु या नात्यानें माझें स्वागत केलें, याबद्दल मी अंतःकरणपूर्वक तुमचे आभार मानतों. खरोखर मी तुमचा एक भाऊच असून तुह्मींही माझे प्रिय बंधू आहां. मी इंग्लंड सोडून निघालों, त्या वेळीं तेथील एका गृहस्थानें मला म्हटलें, " स्वामी, आमच्या या शक्तिमान्, सर्वसंपन्न आणि प्रतिभाशाली भूमीचा अनुभव घेतल्यानंतर आपली मातृभूमि आपणास आतां प्रिय वाटते काय ? " यावर मी उत्तर दिलें, " मी येथें येण्यापूर्वी माझ्या मातृभूमीवर माझें प्रेम होतें, पण आतां हिंदुस्थानची धूळही मला पवित्र वाटूं लागली आहे." हिंदुस्थानची हवा माझ्या दृष्टीनें पुण्यभूमींच्या हवेसारखी दिसते. हिंदुस्थान हें आतां मला तीर्थासारखें पवित्र आणि पूज्य वाटूं लागलें आहे. कलकत्त्याच्या रहिवाशांनो, माझ्या प्रिय बंधूंनो, तुह्मीं मजवर जें प्रेम करतां त्याबद्दल माझे आभार मला शब्दांनीं व्यक्त करतां येत नाहींत; अथवा अशा शुष्क आभारप्रदर्शनाचें कारण तरी काय ? कारण तुह्मीं माझे बंधूच असल्यानें बंधूंचें जें कर्तव्य तेंच तुह्मीं केलें. हिंदुबंधूला हेंच कर्तव्य योग्य आहे. अशा प्रकारचे कौटुंबिक संबंध आणि अशाप्रकारचें प्रेम आपल्या या मातृभूमीवांचून दुसऱ्या कोठेंही आढळावयाचें नाहीं.

महाधर्मपरिषद ही एक मोठया महत्त्वाची गोष्ट होती, यांत संशय नाहीं. या परिषदेचा पुरस्कार ज्यांनीं केला, त्या सद्गृहस्थांचे आभार आपल्या देशांतील निरनिराळ्या शहरांकडून मानले गेले आहेत. त्यांनीं आम्हांवर जें प्रेम केलें, त्याबद्दल त्यांचे असे आभार मानणें हेंही उचित आहे हें खरें; पण या महाधर्मपरिषदेचा थोडासा इतिहास आपणास मला सांगावयाचा आहे. ही परिषद भरविण्यांत त्यांचा एक विशिष्ट हेतु होता, आणि तो हेतु सफल करण्यासाठींच त्यांनीं ही सारी खटपट केली होती. ख्रिस्ती धर्मावांचून इतर धर्मांचा एक बडा तमाशा जगाला दाखवावा, असा त्यांचा उद्देश होता; पण ईश्वरी संकेत कांहीं निराळाच होता. यामुळें त्यांच्या हेतूप्रमाणें न घडतां ईश्वरी संकेताप्रमाणेंच सर्व कार्य झालें. त्या सर्वांनें

आह्मांला मोठें प्रेम दाखविलें, ही गोष्ट खरी; पण आपण आतां त्यांचे पुरेसे आभार मानून मोकळे झालों आहों हीं गोष्ट लक्ष्यांत ठेविली पाहिजे.

दुसरीही एक गोष्ट आपणास सांगावयाची आहे. मी अमेरिकेला गेलों तो या महाधर्मपरिषदेसाठीं गेलों नव्हतों. त्या परिषदेला मी हजर असणें हीं गोष्ट केवळ यदृच्छेनें घडून आली आहे. त्या परिषदेमुळें माझा हेतु सफल होण्यास अवसर मिळाला, तिच्यामुळें माझें कार्य करण्यास मला संधि मिळाली, आणि याकरितां या परिषदेच्या चालकांचे आपण सर्व आभारी आहों; पण वास्तविक पाहतां आपणावर खरे उपकार अमेरिकन लोकांचे आहेत. मोकळ्या मनाच्या, अतिथिसत्कारप्रिय आणि महानुभाव अशा अमेरिकन लोकांचे आपणावर खरोखर फार उपकार झाले आहेत. सर्व मनुष्यांत बंधुभावाचें नातें आहे, असें तोंडानें बोलणारे देश या जगतीतलावर अनेक आहेत; पण या बंधुभावाचें प्रत्यक्ष स्वरूप आज अमेरिकेंत जितकें दिसून येतें, तितकें दुसऱ्या कोठेंही तें आढळावयाचें नाहीं. एखादा अमेरिकन केवळ पांचच मिनिटें आगगाडींत तुह्मांला भेटला तर ताबडतोब तो तुमचा स्नेही बनतो. तुमचा पाहुणचार करण्याकरितां तो तुह्मांला आपल्या घरीं बोलावतो आणि आपल्या रहाणींतील सर्व रहस्यें तुमच्यापुढें उभीं करतो. अमेरिकन लोकांचा हा स्वभावच बनून गेला आहे आणि त्यांचा हा स्वभाव आपणास फार प्रिय झाला आहे. त्यांनीं मजबद्दल जें प्रेम व्यक्त केलें, त्याचें वर्णन तोंडानें सांगणें मला शक्य नाहीं. त्यांनीं ज्या रीतीनें माझ्याशीं वागणूक केली, तिचें यथासांग वर्णन करण्यास खरोखर कित्येक वर्षें लागतील. अटलांटिक महासागराच्या दुसऱ्या तीरावरच्या एका राष्ट्राचेंही आभार मानणें आपणास अवश्य आहे. मी इंग्लंडच्या भूमीवर पाय ठेविला, त्या वेळीं इंग्रज लोकांबद्दल माझ्या मनांत तीव्रातितीव्र द्वेष वास करीत होता. या प्रसंगींही माझे कांहीं इंग्रज स्नेही येथें हजर आहेत व ते माझ्या या ह्मणण्याची साक्ष पटवितील; पण त्यांच्याशीं माझा सहवास जों जों अधिक होऊं लागला आणि त्यांच्या राष्ट्रीय जीविताचीं रहस्यें जों जों माझ्या अवलोकनांत येऊं लागलीं, तों तों माझें त्यांजवरील प्रेम वाढत गेलें. आतां माझें इंग्रज लोकांवर जितकें प्रेम आहे, तितकें तुह्मां साऱ्यांपैकीं दुसऱ्या कोणाचेंही असूं शकणार नाहीं. इंग्रजी राष्ट्राचें महत्व जाणावयाचें

असेल तर तुह्मांस तेथें जाऊन राहिलें पाहिजे; आणि त्या लोकांत मिसळलें पाहिजे. आपल्या सर्व दुःखांचें मूळकारण अज्ञान हेंच आहे, असें आमच्या वेदान्ताचें मत आहे. त्याचप्रमाणें इंग्रज लोक व आपण यांच्या परस्पर संबंधांत ज्या अनेक अडचणी आज आपणांस आढळून येतात, त्यांचें मूळही अज्ञान हेंच होय. आपण जसें त्यांस ओळखलें नाहीं, तसेंच त्यांनींही आपणास ओळखलें नाहीं. पाश्चात्य देशांतील लोकांची दृष्टि अशी कांहीं बनली आहे, कीं, धर्म किंवा नीति आणि ऐहिक वैभव यांत नित्य संबंध आहे असा त्यांचा समज झाला आहे. खरोखर ही मोठया दुर्दैवाची गोष्ट आहे. त्यांची दृष्टि अशा प्रकारची झाली असल्यामुळें एखादा इंग्रज येथें येऊन उतरला आणि आमच्या भूमीची विपन्नावस्था त्यानें पाहिली कीं या भूमींत कांहीं धर्म नाहीं, फार काय, पण सामान्य नीतितत्त्वांशींसुद्धां आमची ओळख नाहीं, असें अनुमान तो काढतो. त्याच्या पूर्वानुभवाच्या दृष्टीनें त्याचें अनुमान बरोबर असतें. खराब हवामान आणि इतर परिस्थिति यामुळें दारिद्र्य आणि पापप्रवृत्ति यांचा एकत्र वास युरोपांत नेहमीं आढळतो; पण ही गोष्ट आमच्या या देशाला मुळींच लागू नाहीं. उलट आमच्या देशांत जों जों मनुष्य अधिक गरीब तों तों नीतिमत्तेच्या दृष्टीनें तो अधिक उच्च असतो, असा मला अनुभव आला आहे. आमच्या देशांतील हा विशिष्टपणा लक्षांत यावयास कालावधि पाहिजे, आणि आमच्या देशाचें अस्तित्व मुख्यतः कोणत्या रहस्यावर अवलंबून आहे, हें जाणून घेण्याकरितां बराच काळ येथें वास करणारा असा युरोपियन कोण आहे? आमच्या देशांतील विशिष्ट परिस्थितीचा अभ्यास करण्यास लागणारा दीर्घ परिश्रम करण्यास तयार अशीं माणसें फारच थोडीं सांपडतील. दारिद्र्य आणि पापप्रवृत्ति हीं जेथें एकत्र नांदत नाहींत अशी ही एकच भूमि आहे. दरिद्री असणें ह्मणजे अधर्माचरण नव्हे, असें समजणारें हें एकच मानवकुल आहे. उलट आमच्या या देशांत दारिद्र्य हें फारच उच्चतेच्या पदवीला चढलेलें आहे. अत्यंत दरिद्री पोषाख हाच सर्वांत पवित्र पोषाख येथें समजला जातो. आमच्यासंबंधीं पाहतां आह्मांसही पाश्चात्य देशांतील समाजसंस्थांचा अभ्यास दीर्घ काळ करावयास पाहिजे. त्या संस्थांचें केवळ वरवर अवलोकन करून त्यांजसंबंधीं घाईघाईनें मूर्खपणाचा अभिप्राय प्रगट

करणें आपणास हितावह नाहीं. त्यांचें स्त्रीपुरुषांचें मोकळेपणाचें संघटण, त्यांच्या चालीरिती आणि समाजपद्धती या सर्वांत विशिष्ट अर्थ आहे. यांतही चांगुलपणाचा भाग आहे. मात्र दीर्घ काळ अभ्यास करून आपणास या सर्वांची समजूत करून घेतली पाहिजे. यावरून त्यांच्या सर्व चालीरिती आपण घ्याव्या, असा मात्र माझ्या ह्मणण्याचा अर्थ कोणी करूं नये. तसेंच त्यांनींही आमच्या समाजपद्धतीचा अंगिकार करावा असें माझें मत नाहीं; कारण, प्रत्येक मानवकुलांत ज्या समाजपद्धतीचा आचार आज रूढ झाला आहे, ती समाजपद्धति कित्येक शतकांच्या अनुभवाचें फल आहे. प्रत्येकाच्या चालीरीती परिस्थितीस अनुसरून सकारण उद्भवलेल्या असतात. याकरितां परस्परांच्या चालीरितींबद्दल कोणीही परस्परांची थट्टा करूं नये.

आतां आणखीही एका मुद्याबद्दल या सभेपुढें चार शब्द मला सांगावयाचे आहेत. अमेरिकेंत माझ्या कार्याला जें यश आलें, त्याहून अधिक यशाची प्राप्ति मला इंग्लंडांत झाली आहे. इंग्रज मनुष्याचें डोकें थोडेंसें मद्द असलें तरी तो अधिक धीट, अधिक शूर आणि अधिक चिकाटीचा असतो. त्याच्या डोक्यांत कोणतीही कल्पना एकवार शिरली कीं ती तेथें कायम होऊन राहते आणि प्रत्येक उपपत्तीला प्रत्यक्ष आचाराचें रूप कसें द्यावें, हें जाणण्याची कला इंग्रजांच्या आंगांत मुरलेली असल्यामुळें, त्या कल्पनेचा तावडतोब जोरदार वृक्ष बनतो आणि त्याला लवकरच फळही येतें. इंग्लंडाशिवाय इतर देशांत अशी स्थिति आढळत नाहीं. इंग्रज लोकांतील जिवटपणा आणि कर्मप्रवृत्ति हीं इतर कोठेंही आढळून येत नाहींत. केवळ कल्पनांच्या मृगजळांत पोंहूं जाणारे लोक इंग्लंडांत फारच थोडे सांपडतात; पण त्यांच्यांत कर्मप्रवणता अधिक आहे ही गोष्ट खरी. त्याचप्रमाणें त्यांच्या अंतःकरणांत सद्वासनांचा सांठाही अमूप आहे, ही गोष्टही लक्ष्यांत ठेवण्यासारखी आहे. इंग्लंड हें शूरांचें राष्ट्र आहे. ते खरे क्षत्रिय आहेत. आपल्या भावना प्रकट न करतां त्या गुप्त ठेवण्याचें शिक्षण त्यांस लहानपणापासून मिळालेलें असतें. आपल्या भावनांचा उद्रेक होऊं देणारा असा इंग्रज गृहस्थ क्वचितच आढळेल. फार काय, पण अशी एखादी इंग्रज स्त्रीसुद्धां आढळणें कठीण. जीं कार्यें पाहून निधड्या छातीच्या बंगाल्यांनाही अचंबा वाटेल, अशीं कार्यें निमुटपणें पार पाडणाऱ्या कित्येक इंग्रज स्त्रिया माझ्या पाहण्यांत आल्या आहेत. अशा रीतीनें इंग्रजांच्या

अंतःकरणाचें बाह्य कवच कितीही कठीण दिसत असलें, तरी त्याच्या गाभ्यांत भावनांचा खोल झरा आहे, हें लक्ष्यांत ठेविलें पाहिजे. या गाभ्यांत प्रवेश करण्याची विद्या तुह्मांस प्राप्त झाली आणि तुह्मीं इंग्रजांशीं प्रत्यक्ष सलगी करून त्यांच्यांत मिसळून गेलां, तर ते आपलें अंतःकरण तुह्मांजवळ उघडें करतात–ते तुमचे नित्य मित्र बनून जातात, तुमची वाटेल ती नोकरी बजावण्यास ते तयार होतात. इंग्रज लोकांच्या या विशिष्ट गुणामुळें इतर देशांपेक्षां इंग्लंडांतील माझें कार्य अधिक फलदायी झालें आहे, असें माझें मत आहे. मला उद्यांच मरण आलें तरी इंग्लंडांतील माझें कार्य मरावयाचें नाहीं; उलट त्याचा अधिकाधिक प्रसार होत जाईल, अशी माझी पक्की खात्री आहे.

प्रियबंधूंनो, तुह्मीं आपल्या मानपत्रांत माझें अंतःकरण हालवून सोडणाऱ्या अशा एका नांवाचा उल्लेख केला आहे. माझे सद्गुरु, माझें अंतिम ध्येय, माझ्या या जीवितांतील परमेश्वर असे श्रीरामकृष्ण परमहंस यांच्या केवळ नामोच्चारणानें माझें अंतःकरण तळापासून उचंबळून येतें. कायेनें, वाचेनें अथवा मनानें माझ्या हातून जर कांहीं कार्यभाग झाला असेल, अथवा जगांतील एकाही व्यक्तीच्या उपयोगीं पडणारा असा एखादाही शब्द माझ्या तोंडून बाहेर पडला असेल, तर तो माझा आहे असें समजूं नका. त्या शब्दावर माझी सत्ता नसून त्याचें सारें कर्तृत्व पूज्यपाद श्रीरामकृष्ण यांचेंच आहे; पण माझ्या तोंडून कांहीं अपशब्द निघाले असतील अथवा द्वेषमूलक भाषा मी कोठें वापरली असेल तर ती मात्र त्यांची नसून माझीच आहे असें आपण समजा. दुर्बळपणा जेथें जेथें व्यक्त झाला आहे, तें सर्व कार्य माझें आहे आणि नवजीवन देणारें, शक्तीचें दान करणारें आणि पवित्र असें जें कांहीं कार्य झालें असेल, तें त्यांच्या स्फूर्तिदायक शक्तीनें झालें आहे. त्यांनीं स्वतः आपल्या शब्दांनीं तें कार्य करावयास मला स्फूर्ति दिली. माझ्या मित्रांनो, श्रीरामकृष्णांचें वास्तविक स्वरूप कसें होतें, याचा उलगडा जगाला अद्यापि झाला नाहीं. पूर्व काळीं होऊन गेलेल्या धर्मप्रवर्तकांचीं चरित्रें आज आपणास जगाच्या इतिहासांत पहावयास सांपडतात. त्यांच्या पश्चात् त्यांच्या शिष्यांनीं जें कांहीं कार्य केलें आणि जे लेख लिहून ठेविले, त्यांवरून हीं चरित्रें आज आपणांस उपलब्ध झालीं आहेत. त्यांच्या चरित्रांस आज

हजारों वर्षांचा काळ लोटून गेला आहे. त्या महात्म्यांच्या चरित्रांचें निरनिराळ्या रीतीनें अवलोकन करून त्यांचें यथास्थित स्वरूप आज आपणांस उपलब्ध होण्यास हजारों वर्षें लागलीं; तथापि माझ्या मताप्रमाणें जें चरित्र प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहण्याचें भाग्य मला लाभलें, त्याइतकें दुसरें कोणतेंही चरित्र उज्वल नाहीं असें मला वाटतें. ज्यांच्या पायांपाशीं बसून मी सर्व कांहीं शिकलों आणि ज्यांच्या छायेखालीं मी वाढलों, त्या श्रीरामकृष्णांचें चरित्र अत्यंत उज्ज्वल आहे.

**यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत।**
**अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम्॥**
**परित्रणाय साधूनाम् विनाशाय च दुष्कृताम्।**
**धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे॥**

हें गीतेंतील सुप्रसिद्ध वचन आपल्या सर्वांच्या अवलोकनांत असेलच. या वचनाबरोबरच आणखीही एक गोष्ट आपण ध्यानांत ठेविली पाहिजे. ती आजच आपणांसमोर उपस्थित झाली आहे. धर्मज्ञानाच्या समुद्राला प्रचंड भरती येण्यापूर्वी लहान लहान लाटांचा खळखळाट सर्व समाजभर प्रथम ऐकूं येऊं लागतो. यांतील पहिल्या लाटेकडे कोणाचें फारसें लक्ष्य जात नाहीं. तिजबद्दल कोणाला फारशी माहिती नसते, अथवा तिजबद्दल कोणी फारसा विचारही करीत नाहीं; पण पुढें हीच लाट हळूहळू मोठी होत जाते, लहान लहान लाटांचें आक्रमण ती करूं लागते, अनेक लहान लाटांस स्वतःच्या पोटांत घेऊन ती स्वतः मोठी बनूं लागते. अखेरीस ती एवढ्या प्रचंड शक्तीनें सर्वांच्यावर आदळते कीं, तिच्या मार्गांत अडथळा आणण्याचें सामर्थ्य कोणासही नसतें. आज आपणासमोरही असाच प्रकार चालू आहे. तुह्मांला डोळे असतील, तर मी म्हणतों ही गोष्ट तुह्मांस दिसतही असेल. तुमचीं अंतःकरणें उघडीं असतील, तर या लाटेचें ग्रहण तुह्मीं करूं शकाल. तुह्मीं सत्याच्या शोधाकरितां यत्न करीत असाल, तर आतां तें तुम्हांस सांपडेल. आपणासमोर काय चाललें आहे हें ज्याला दिसत नाहीं, तो मनुष्य खरोखरच आंधळा म्हटला पाहिजे. एका गरीब मातापिरांचा मुलगा, तशांतून ज्या खेड्याचें नांवही कोणाच्या कर्णपथावरून फारसें गेलें नसेल, अशा खेड्यांत जन्मलेला, अशा मुलाची पूजा आज कित्येक देशांत होत आहे. जे देश

सर्व प्रकारच्या मूर्तिपूजेविरुद्ध आज कित्येक शतकें ओरड करीत आहेत, त्याच देशांत या मुलाची पूजा होत आहे. असा प्रकार कसा झाला? कोणत्या शक्तीनें त्या लोकांस भारलें? ती शक्ति तुम्हां आम्हांसारख्या लोकांची आहे काय? नाहीं. जी शक्ति आमच्या या देशांत रामकृष्ण परमहंसांच्या रूपानें प्रकट झाली, तीच शक्ति बाहेरील देशांतही आपला अंमल गाजवीत आहे; कारण तुमच्या आमच्यासारखे सामान्य लोक काय, अथवा ऋषी आणि अवतारी पुरुष काय, हीं सारीं त्या एकाच शक्तीचीं रूपें आहेत. किंबहुना सारें विश्व हें त्याच शक्तीचें रूप आहे. कित्येक ठिकाणीं या शक्तीच्या प्रकटीभवनाचें प्रमाण कमी असतें, तर दुसऱ्या कित्येक ठिकाणीं तें अधिक असतें. श्रीरामकृष्णांच्या ठिकाणीं तीच शक्ति फार मोठ्या प्रमाणांत प्रकट झाली. त्या शक्तीचें हें केवळ पहिलें प्रकटीभवन आज आपण आपल्या समोर पहात आहों; पण आपली पिढी कालाच्या उदरांत जाण्यापूर्वींच या शक्तीचे आणखीही कित्येक प्रचंड चमत्कार आपणास पहावयास मिळतील. हिंदुस्थानच्या पुनरभ्युदयाकरितां ही शक्ति प्रकट झाली आहे. आपल्या देशांत या शक्तीचें कार्य सदोदित चालू आहे, या गोष्टीचा विसर आपणास वारंवार पडत असतो. आजही असा विसर आपणास पडला असल्यामुळें आपणास स्मरण देण्याकरितां ही शक्ति आज योग्य वेळीं प्रकट झाली आहे.

प्रत्येक राष्ट्राच्या संस्कृतीचे मार्ग वेगवेगळे असतात. कित्येकांची उत्क्रांति राजकीय घडामोडींच्या द्वारें होत असते. दुसरे कित्येक देश सामाजिक उत्क्रांतीनें अधिकाधिक संस्कृत होत जातात व आणखी कित्येकांचा प्रकार याहूनही वेगळा असतो. आपणासंबंधीं पाहिलें तर धर्म हाच आपल्या साऱ्या संस्कृतीचा मूळ पाया आहे. धर्माच्या मार्गानेंच जाऊन आमचा अभ्युदय आम्हांस साध्य करून घेतां येईल. एखाद्या इंग्रजाला धर्मज्ञान द्यावयाचें असलें, तर तेंसुद्धां त्याला राजकीय विषयांच्या स्वरूपानें द्यावें लागतें. तेंच एखाद्या अमेरिकनाला द्यावयाचें झालें तर समाजसुधारणेच्या द्वारें तें दिलें पाहिजे. उलटपक्षीं आम्हां हिंदूंना राजकीय विषयाची समजूतसुद्धां धर्माच्या मार्गानें दिल्यावांचून पडत नाहीं. आमची समाजशासनाची पद्धतही धर्माच्या पायावांचून लंगडी पडते. धर्माच्या मार्गावांचून अन्य कोणत्याही मार्गानें कोणत्याही विषयाची समजूत आम्हां हिंदूंच्या मनास पटत

नाहीं. आमच्या राष्ट्राच्या जीवनाचा जो स्वरसमुच्चय आहे, त्यांतील मुख्य अथवा जीवनस्वर धर्म हा असून बाकीचे स्वर त्याचे पोषक मात्र आहेत. हा आमचा मुख्य जीवनस्वर संकटमय स्थितींत पडला होता. आपला हा प्रमुख जीवनहेतु सोडून देऊन आपण दुसऱ्या हेतूच्या मागें लागलां, अशीं चिन्हें दिसूं लागलीं होतीं. आमच्या राष्ट्रीय जीविताचा मुख्य पाया जो धर्म तो सोडून देऊन त्याऐवजीं राजकीय हेतु हा आपला राष्ट्रीय जीवनाचा हेतु करावा, असें आपणांस वाटूं लागलें होतें. या आपल्या कार्यांत यश आलें असतें आणि अदलाबदलीचीही आपली इच्छा सफल झाली असती, तर आमचें राष्ट्र निःसंशय विनाशाच्या मार्गास लागलें असतें; पण असें व्हावें हा ईश्वरी संकेतच नव्हता. याकरितां श्रीरामकृष्णांच्या रूपानें आमच्या राष्ट्राची जीवनशक्ति प्रकट झाली. श्रीरामकृष्णांच्या चरिताचा अर्थ तुम्हीं आपापल्या दृष्टीनें कसाही करीत असलां अथवा तुम्हीं त्यांस पूज्य मानीत असलां अथवा नसलां, तरी त्याचा विचार करण्याचें कारण मला नाहीं. माझें ह्मणणें फक्त इतकेंच आहे कीं, हिंदुस्थानांत कित्येक शतकांनंतर जी ही अचिंत्य शक्ति प्रकट झाली, तिचा अभ्यास करून तिनें हिंदुस्थानाकरितां आणि साऱ्या मानवजातीच्या कल्याणाकरितां काय केलें आहे हें पाहणें, हें हिंदु या नात्यानें तुमचें कर्तव्य आहे. विश्वधर्म आणि मानवजातींत परस्पर बंधुत्वाचें नातें या कल्पनांचा उदय जगांतील कोणत्याही देशांत होण्यापूर्वीं कित्येक वर्षें खुद्द या शहराच्या समोरच एक पुरुष असा राहत होता, कीं ज्याचा आयुष्यक्रम ह्मणजे एक महाधर्मपरिषदच होती.

आमच्या धर्मग्रंथांनुसार पाहतां आमचें अखेरचें ध्येय निराकार हें आहे. हें अत्युच्च ध्येय समजण्यास लागणारी मनाची अत्युच्च दशा आपणा सर्वांस असती तर खरोखरच फार चांगलें झालें असतें; पण ज्या अर्थीं ही गोष्ट शक्य नाहीं, त्या अर्थीं मानवजातीपैकीं बहुतेकांस साकार परमेश्वराचीच आवश्यकता आहे. प्रत्यक्ष अथवा दृश्य साध्य समोर असल्यावांचून धर्ममार्गाचें आचरण करतां यावयाचें नाहीं, अशीच आपणां बहुतेकांची स्थिति आहे. तसेंच कोणतें तरी एखादें मोठें साध्य समोर प्रत्यक्ष असल्याशिवाय कोणत्याही राष्ट्राला उन्नति करून घेण्यास अथवा कोणतेंही मोठें कार्य पार

पाडण्यास हुरूप येत नाहीं. राजकीय, सामाजिक अथवा व्यापारी दृष्टीचें साध्य यांपैकीं कोणतेंही एक आमचें राष्ट्रीय साध्य होऊं शकत नाहीं. हीं साध्यें सिद्ध करून देण्यास समर्थ अशा विभूती आह्मांमध्यें निर्माण झाल्या, तरी आमच्या राष्ट्राच्या सामान्य जनतेवर त्यांची छाप कधींही पडावयाची नाहीं. धर्म हें आमचें राष्ट्रीय साध्य असल्यामुळें फक्त धर्माच्या विभूतींच आपली छाप आह्मांवर बसवूं शकतील. अशा प्रकारच्या विभूतींच्या निशाणा-भोंवतींच आह्मी अत्यंत उत्साहानें एकत्र जमूं. ज्यांना आम्हीं विभूती असें समजतों, त्या साऱ्या धर्मांच्याच विभूती असल्या पाहिजेत. धर्माचा मार्ग प्रकाशित करणारे दीप हेच आमचे खरे नेते होत, असा आम्हां हिंदूंचा समज आहे. श्रीरामकृष्ण परमहंसही अशाच प्रकारची एक विभूति होती. आप-णांस आपली उन्नति करून घ्यावयाची असेल, तर त्यांच्याच नांवाच्या निशाणाभोंवतीं उत्साहपूर्वक आपण एकत्र झालें पाहिजे. श्रीरामकृष्णांच्या जीविताच्या रहस्याचें उद्‌घाटन कोणी करावें हा प्रश्न महत्वाचा नाहीं. हें काम मीं केलें काय, तुम्हीं केलें काय अथवा आणखीही तिसऱ्या कोणीं केलें तरी सारखेंच. माझ्या म्हणण्याचा मुख्य आशय इतकाच कीं जो आयुष्य-क्रम त्यांनीं तुम्हापुढें ठेविला आहे, त्याचा अभ्यास करून आपल्या राष्ट्राच्या आणि आपल्या हिंदुकुलाच्या उन्नतीकरितां तुह्मीं आतांच पुढें सरावें. अनेक विभूतींचीं जीं जीवनचरित्रें आज आपणांस उपलब्ध आहेत, त्या सर्वांत श्रीरामकृष्णांचें चरित्र अत्यंत पवित्र आहे, ही गोष्ट स्पष्टपणें ध्यानांत ठेवावी, इतकेंच मी आपणास सांगतों. श्रीरामकृष्णांचें जीनवचरित्र हें जीवात्म्याच्या व्यक्तदशेचें अत्युत्कृष्ट चरित्र आहे. तें इतकें विस्मयोत्पादक आहे कीं त्याच्या तोडीचें दुसरें चरित्र आपणास वाचावयासही मिळणें दुर्लभ; मग तें प्रत्यक्ष पहावयास मिळणें तर त्याहूनही दुर्लभ होय. अशाप्रकारचें हें चरित्र आज आपणास प्रत्यक्ष पहावयास मिळत आहे. श्रीरामकृष्णांनीं देहविसर्जन केल्यापासून दहा वर्षांच्या अवधींत त्यांच्या सामर्थ्यानें सारी पृथ्वी आक्रमण केली, ही गोष्ट आज प्रत्यक्ष आपणांसमोर आहे. याकरितां आपल्या मानव-कुलाच्या आणि आपल्या धर्माच्या उद्धारार्थ यांचें चरित्र आपणासमोर मांडून, तेंच आपण आपलें इष्ट करावें असें आपणास सांगणें, हें माझें कर्तव्य होय. मजकडे पाहून आपण त्यांची परीक्षा करूं नका. मी ह्मणजे त्यांच्या हातांतलें

एक मोडकेंतोडकें हत्यार आहें. याकरितां माझे गुणदोष पाहून त्यांच्या दानतीची परीक्षा आपण करूं नका. मी किंवा माझ्यासारख्या दुसऱ्या शिष्यांनीं शेंकडों जन्म खर्ची घातले, तरी त्यांनीं जें कांहीं साध्य केलें होतें, त्याचा लक्षांश भागही आह्मांस साध्य होणें शक्य नाहीं. जो सर्वसाक्षी आपल्या सर्वांच्या हृदयामध्यें उभा आहे, त्याच्याद्वारें आपण त्यांच्या चरित्राकडे अवलोकन करा. पुढें धर्मकार्य कोणत्या प्रकारें व्हावयाचें आहे, हें अगोदरच निश्चित होऊन गेलेलें आहे. त्याकरितां तुह्मीं कांहीं खटपट केली अथवा न केली, तरी तें घडून येणारच. या राष्ट्राच्या कल्याणाकरितां, आपल्या देशाच्या उदयाकरितां आणि अखिल मानवजातीच्या उद्धारासाठीं तुमच्या अंतरात्म्यानें तुमचीं अंत:करणें खुलीं करावीं आणि श्रीरामकृष्णांच्या चरित्राचा आदर्श तुह्मांपुढें नित्य असावा, इतकीच माझी परमेश्वरापाशीं प्रार्थना आहे. धर्मकार्य हें परमेश्वराचें आहे, त्याला तुह्मीं हातभार लावला अथवा न लावला तरी तें अडून रहाणार नाहीं. आपल्या कार्यासाठीं लागणारीं हत्यारें परमेश्वर नुसत्या धुळींतूनही निर्माण करूं शकेल. अशीं हत्यारें एक-दोनच काय, पण तीं शेंकड्यानें आणि हजारांनीं मोजतां येण्यासारखीं निर्माण करण्याचें सामर्थ्य त्यास आहे. अशा धर्मकार्यांत वांटेकरी होणें हें मोठें दुर्लभ भाग्य स्वत:स आपण प्राप्त करून घेतलें पाहिजे.

या मूलभूत कल्पनेला धरून भावी विस्ताराचें चित्र आपण रेखाटलें पाहिजे. आपणाला सर्व जग आक्रमण करावयाचें आहे असें तुह्मीं ह्मणतां, ही गोष्ट खरीच आहे. हिंदुस्थानानें सर्व जग जिंकावें हीच माझीही आ-कांक्षा आहे. सर्व जग पादाक्रांत होईपर्यंत या भरतभूमीनें विश्रांति घेऊं नये, असेंच मला वाटतें. आपण एक जग तरी जिंकावें अथवा नामशेष तरी होऊन जावें अशीच ही वेळ आहे. या दोहोंवांचून तिसरी गति आपणास आतां उरलेली नाहीं. प्रसार पावत जाणें हें जिवंतपणाचें चिन्ह आहे. याक-रितां आपण बाह्यदेशीं जाऊन आणि स्वत:चा प्रसार करून स्वत:स जिवंत राखलें पाहिजे किंवा दिवसेंदिवस अधिक खालावत जाऊन अखेरीस मरून गेलें पाहिजे. यावांचून तिसरा मार्ग आतां आपणास उरला नाहीं. 'जगावें कीं मरावें' हा प्रश्न आतां आपणासमोर आहे. याला कोणतें तरी उत्तर आतां आपणांस देणें भाग आहे. आपल्या देशांत क्षुद्र मत्सर आणि

परस्परांतील किरकोळ तंटेभांडणें यांचा सुळसुळाट आहे, ही गोष्ट आपणा सर्वांस विदित आहेच; पण जगांतील इतर देशांतही अशाच प्रकारचीं भांडणें सुरू आहेत, हें मी आपणास स्वानुभवानें सांगतों. इतर देशांत या भांडणांना राजकीय स्वरूप आहे. युरोपांतील एखाद्या देशांत.घरांतल्याघरांत अतिशय भांडणें सुरू झालीं ह्मणजे तो देश दुसऱ्या एखाद्या देशाशीं कुरापत काढून भांडण सुरू करतो आणि असें झालें ह्मणजे त्याचें घरचें भांडण बंद होतें. आपल्या देशांतही अशाच प्रकारचे घरगुती तंटे सुरू आहेत; पण ते बंद करण्याकरितां परकीय देशाशीं भांडण उपस्थित करण्याचें साधन मात्र आपणांस उपलब्ध नाहीं. परकीय राष्ट्रांना आपल्या शास्त्रग्रंथांतील सत्यप्रमेयें सांगणें हीच आपली परराष्ट्रसंबंधाची राजकीय नीति आहे. आज कित्येक शतकें हीच आपली परराष्ट्रनीतीची दिशा ठरून गेली आहे; आणि हीच आपली दिशा नेहमीं कायम राहिली पाहिजे. आपणांपैकीं जे कोणी राजकीय उलाढालींत मन घालीत असतील, त्यांना मला इतकेंच सांगावयाचें आहे कीं, याच दिशेनें आपणा सर्वांची एकी होणार आहे. आपणांतील भांडणांचा नाश करण्यास हाच एक मार्ग आहे. मी ह्मणतों याचें प्रत्यंतर पहावयास फार लांब जाणें नको. आजची सभाच माझ्या ह्मणण्याचें समर्थन करील. अशा रीतीनें आपल्या राष्ट्राचा अभ्युदय होईल हें निःसंशय आहे. पण हा केवळ आपलपोटेपणाचा विचार झाला. याहून उच्चतर आणि परमार्थमूलक असा दुसराही एक. हेतू आपल्या ठिकाणीं जागृत असला पाहिजे. या दुसऱ्या हेतूचीं कित्येक प्रत्यक्ष उदाहरणें आपणामध्यें होऊन गेलीं आहेत; आणि आजही अशीं उदाहरणें आपणामध्यें आहेत. स्वतःजवळील अनुपम आणि दुर्मिळ अशा विचारभांडाराला आर्यभूमीनें ज्या क्षणीं कुलूप घातलें, त्याच क्षणीं तिला उतरती कळा लागली. बाह्य देशांतील तान्हेलेल्या जनतेस या अमृताचा बिंदु देण्याचें ज्या क्षणीं आर्यभूमीनें नाकारलें, त्याच क्षणीं ती स्वतः मृत्युपंथास लागली. आपण कित्येक शतकें स्वतःस कोंडून घेतलें, आपण परदेशीं प्रवास केला नाहीं आणि इतर राष्ट्रें काय करीत आहेत हेंही कधीं पाहिलें नाहीं. आपल्या अधःपतनाचें हें एक मोठें कारण आहे. आज हिंदुस्थानांत जी थोडीबहुत चळवळ नजरेस पडत आहे, तिला राजा राममोहन राया-

च्या कालापासून सुरुवात झाली. आपल्या भोंवतीं असलेल्या आवाराच्या भिंतीचा छेद प्रथम राजा राममोहन राय यांनीं केला आणि तेव्हांपासूनच हिंदुस्थानांत जिवंतपणाचें चिन्ह प्रथम दिसूं लागलें. त्या दिवसापासून हिंदुस्थानच्या इतिहासांत नव्या मनूस सुरवात झाली; आणि आतां ही चळवळ अधिक उत्साहानें सुरू होणार, अशीं चिन्हें सांप्रत दिसूं लागलीं आहेत. पूर्वकाळीं हें धर्मप्रसाराचें कार्य अल्प प्रमाणावर झालें असलें, तरी तें आतां फारच मोठ्या प्रमाणावर सुरू होणार आहे; आणि या कार्याला अडथळा करण्याचें सामर्थ्य कोणासही असणार नाहीं. ‘ दे वाण घे वाण ’ हा न्याय सर्व जगांत चालू आहे. विनिमय हा जीविताचा एक हेतूच आहे. याकरितां बाह्य देशीं जाऊन आपणापाशीं जें कांहीं देण्यासारखें असेल, तें परदेशीयांस आपण दिलें पाहिजे आणि त्याचप्रमाणें त्यांजकडून घेण्यासारखें जें कांहीं असेल, तें घेतलेंही पाहिजे. अनेक बाबतींत आज आपण पाश्चात्यांचें शिष्यत्व पत्करिलें आहे; पण धर्माच्या बाबतींतही आपण त्यांचें शिष्यत्व पत्करणार काय? यंत्रकला आपण त्यांजपासून शिकावी हें रास्त आहे. तसेंच दुसऱ्याही अनेक विद्या आपण त्यांजपाशीं शिकल्या पाहिजेत. पण धर्माच्या बाबतींत मात्र आपण त्यांचे गुरु होऊं शकूं. जगाची संस्कृति पूर्ण होण्याकरितां अद्यापि कांहीं वस्तूंची गरज आहे. त्या वस्तू फक्त हिंदुस्थानांतूनच प्राप्त होणाऱ्या आहेत. त्यांच्याकरितां जग वाट पाहत बसलें आहे. हिंदु मानवकुलानें पराविद्येचा जो सांठा वंशपरंपरेनें आजपर्यंत रक्षण केला आहे, त्यांतील अंश आपणास मिळावा अशी जगाची अपेक्षा आहे. भरतभूमीवर आजपर्यंत अनेक संकटें कोसळलीं, आज कित्येक शतकें ती अवनतावस्थेंत कुजत पडली आहे, पण अशा स्थितींतही हा आपला वडिलार्जित ठेवा तिनें आजपर्यंत उराशीं घट्ट बाळगून ठेविला आहे. या ठेव्याकरितां जग वाट पहात आहे. हिंदुस्थानच्या बाहेरील लोकांस या ठेव्याची किती क्षुधा लागली आहे, याची कल्पना तुह्मांस होणार नाहीं. आपल्या धर्मसिद्धांतांबद्दल आपण आज वाटेल तसें बरळतों. त्यांजबद्दल आपण एकमेकांशीं फुकटचा वाद करितों आणि त्यांची हेटाळणीही मनास वाटेल तितकी करीत असतों. पूर्वी आपणास जें जें कांहीं पवित्र वाटत असे, त्या साऱ्याची हेटाळणी करणें हा दुर्गुण सांप्रत जवळ जवळ साऱ्या राष्ट्रालाच

जडल्यासारखा दिसतो. आपल्या हिंदुस्थानांत जो अमृताचा संचय आपल्या वाडवडिलांनीं करून ठेविला आहे, त्यांतील एक बिंदू तरी आपणास प्राप्त व्हावा ह्मणून, बाह्यदेशांतील जनता बद्धांजली करून वाट पहात बसली आहे. याकरितां तिची आकांक्षा तृप्त करणें आपणास भाग आहे. आपलें हें ज्ञान त्यांस देऊन त्यांचें ज्ञान आपण घेतलें पाहिजे. त्यांस पराविद्या देऊन त्यांची अपराविद्या त्यांजपासून आपण शिकली पाहिजे. सारा जन्म आपण त्यांचें शिष्यत्वच पत्करावें असें नाहीं. धर्माच्या बाबतींत आपण त्यांचें गुरुपण पत्करिलें पाहिजे. परस्परांत समानतेचा भाव उत्पन्न झाल्या-शिवाय खरी मैत्री होऊं शकत नाहीं. ते गुरु आणि आपण शिष्य, असा संबंध चिरकाल राहिला तर आपणा दोघांमध्यें समानतेचा भाव कधींही उत्पन्न होणार नाहीं. एखादा इंग्रज अथवा अमेरिकन याजपाशीं समानत्वाचें नातें आपणास जोडावयाचें असेल, तर आपण त्यांचें गुरुपणही पत्करिलें पाहिजे, आणि कांहीं बाबतींत त्यांचें शिष्यत्वही आपण केलें पाहिजे. आमच्या धर्मज्ञानाचा सांठा इतका विशाल आहे कीं, तो कित्येक शतकें आपण जगाला वांटला तरी तो पुरण्याजोगा आहे. या कार्याकरितां लागणारा उत्साह आणि तीव्रता आपल्या साऱ्या रक्तांत खेळत राहिली पाहिजे. बंगाली लोक कल्पनेच्या साम्राज्यांत वावरणारे आहेत, असा त्यांचा लौकिक आहे आणि तो खरा आहे असें मलाही वाटतें. केवळ कल्पनांच्या मागें लागणारे ह्मणून कित्येक लोक आपला उपहासही करीत असतात. बुद्धीचा प्रभाव मोठा आहे, ही गोष्ट मलाही कबूल आहे; पण कांहीं मर्यादेच्या पलीकडे बुद्धि जाऊं शकत नाहीं, हें मी आपणास पुनः पुन्हा बजाऊन सांगतों. कोणत्याही मोठया कार्याला लागणाऱ्या उत्साहाचा जन्म बुद्धीपासून होत नसून तो फक्त अंतःकरणापासूनच होतो, हें आपण पक्कें लक्ष्यांत ठेवा. जीवितांतील अत्यंत खोल रहस्यापर्यंत फक्त अंतःकरणाचाच प्रवेश होऊं शकतो; या-करितां ज्यांजवळ अंतःकरण आहे, अशा बंगाली लोकांनींच या कार्याला स्वतःस वाहून घेतलें पाहिजे.

" **उत्तिष्ठत जाग्रत प्राप्य वरान्नि बोधत ।** " अशी श्रुतीची वाणी आहे. कलकत्तेकर तरुणांनो, या श्रुतीच्या हांकेला ओ द्या ! या वचनाप्रमाणें वागण्याची उत्कृष्ट संधि सध्या प्राप्त झाली आहे. सारें जग आपणासाठीं तयार होऊन

बसलें आहे. आतां धैर्यानें पुढें व्हा आणि कशाचीही भीति बाळगूं नका. '**अभिः अभिः**' असें विशेषण परमेश्वराला फक्त आपल्या शास्त्रांनींच दिलें आहे. '**अभिः**' ह्मणजे निर्भय. आपणही आतां निर्भय होऊन कार्यास लागलों ह्मणजे तें निःसंशय पार पडेल. '**उत्तिष्ठत जाग्रत**' अशी हांक तुमची मातृभूमि मारूं लागली आहे. या तिच्या हांकेला पुढें सरण्यास मोठया स्वार्थत्यागाची अपेक्षा आहे. हें कार्य फक्त तरुणच करूं शकतील. निधड्या छातीच्या बुद्धिमान् आणि उत्साही तरुणांनीं या कामास आपणास आतां वाहून घेतलें पाहिजे. कलकत्त्यांत शेकडों आणि हजारों तरुण अशा प्रकारचे आहेत. मी कांहीं कार्य केलें आहे असें तुम्ही म्हणतां, पण मी म्हणजे कोण, हेंही तुम्ही आतां आठवा ! कलकत्त्याच्या रस्त्यांत धुळींत खेळणारा एक निरुपयोगी मुलगा मी होतों, याची आठवण करा. अशाप्रकारच्या क्षुद्र मनुष्याच्या हातून जर इतकें कार्य झालें असेल, तर तुमच्यासारख्या बुधिमंतांच्या हातून केवढें महत्कार्य संपादन होईल, हें त्रैराशिक तुम्हींच सोडवा ! '**उत्तिष्ठत जाग्रत**' असें सारें जग तुम्हांस सांगत आहे. माझ्या देशांतील इतर प्रांतांत बुद्धिमत्ता आहे आणि पैसाही आहे; पण या कार्याकरितां लागणारा उत्साह फक्त माझ्या मातृभूमींतच आहे. आतां या उत्साहाला प्रत्यक्ष स्वरूप देणें हें तुम्हां तरुणांच्या हातीं आहे. 'आपण दरिद्री आहों आणि आपणास कोणी पाठिराखा नाहीं,' असल्या तुच्छ कुशंका मनांतही आणूं नका. पैशानें महत्कार्य संपादितां येतें, असें आजपर्यंत कोणी पाहिलें आहे काय? पैसा पौरुष उत्पन्न करीत नाहीं, पण पुरुष संपत्ति निर्माण करूं शकतो. जगाचें जें कांहीं स्वरूप आज आपणांस दिसत आहे, तें मानवी उत्साहाचें कार्य आहे. मानवी उत्साहांत आणि आत्मप्रत्ययांत जें सामर्थ्य आहे, त्यानेंच जगाला सांप्रतची स्थिति प्राप्त करून दिली आहे.

सर्व उपनिषदांत अत्यंत श्रेष्ठ अशा कठोपनिषदाचा अभ्यास तुम्हांपैकीं ज्यांनीं केला असेल त्यांना त्यांत सांगितलेली एका राजाची गोष्ट बहुधा आठवत असेल. एक राजा एकदां एक मोठा यज्ञ करण्यास निघाला; पण एखाद्या मूल्यवान् वस्तूचें दान त्या यज्ञांत न करतां तो कांहीं निरुपयोगी गाई आणि घोडे यांचें दान करूं लागला. त्याला नाचिकेत या नांवाचा एक मुलगा होता. हा यज्ञसमारंभ पाहून नाचिकेताच्या मनांत श्रद्धा

उत्पन्न झाली. श्रद्धा या शब्दाला कोणताही इंग्रजी प्रतिशब्द बरोबर सांगतां येणार नाहीं; कारण, श्रद्धा या शब्दांत जो गूढ अर्थ आहे तो कोणत्याही इंग्रजी प्रतिशब्दानें व्यक्त केला जात नाहीं. श्रद्धा या शब्दाचा अर्थ तुम्हीं मनांतल्या मनांतच उमजा; कारण, तो पक्का उमजण्यावरच पुष्कळ गोष्टी अवलंबून आहेत. नाचिकेताच्या मनांत श्रद्धा उद्भवतांच तिचा परिणाम त्याजवर कसा झाला पहा. तो आपल्याशींच म्हणूं लागला, मी पुष्कळांहून श्रेष्ठ आहें. मजहून श्रेष्ठ असे लोक थोडे आहेत; तथापि मी सर्वश्रेष्ठ नाहीं अथवा अत्यंत कनिष्ठही नाहीं. मलाही आणखी कांहीं करतां येण्यासारखें आहे. कांहीं तरी करावें, ही भावना या मुलाच्या मनांत बळावत चालली. अखेरीस मृत्यु हा काय विषय आहे याचा शोध तो करूं लागला. प्रत्यक्ष मृत्यूच्या घरीं गेल्यावांचून या प्रश्नाचें उत्तर मिळावयाचें नाहीं असें समजून नाचिकेत यमगृहीं गेला. त्या ठिकाणीं तो तीन दिवस वाट पहात होता. आणि यानंतर त्याची आकांक्षा कशी पुरी झाली ही तुम्हांस ठाऊक आहेच. या इच्छापूर्तीच्या मुळाशीं श्रद्धा होती. आपणांसही या श्रद्धेचीच गरज आहे. हिंदुस्थानांतून दुर्दैवानें या श्रद्धेचा लोप झाला आहे. आपल्या सध्यांच्या अवनतावस्थेच्या मुळाशींही हा श्रद्धेचा अभावच होय. मनुष्यामनुष्यांतही जो फरक आढळून येतो, त्याचें कारणही त्या त्या मनुष्यांतील कमीअधिक श्रद्धा हेंच होय. एक मनुष्य सत्पुरुष होतो आणि दुसरा अवनतावस्थेच्या गर्तेत पडलेला असतो; याचें कारणही त्यांच्या श्रद्धेतील फरक हेंच होय. "मी दुर्बळ आहें" असें जो नित्य ह्मणत असतो, तो खरोखरच अखेरीस दुर्बळ होतो, असें माझे सद्गुरु ह्मणत असत. याकरितां तुमच्या अंतःकरणांत श्रद्धा उत्पन्न झाली पाहिजे. ऐहिक सामर्थ्याचें जें कांहीं स्वरूप पाश्चात्य देशांत प्रकट झालेलें आपण पाहातों, तेंही त्या लोकांच्या श्रद्धेचेंच फळ आहे. आपण वाटेल तें करूं शकूं, अशी श्रद्धा प्रत्येक पाश्चात्य मनुष्याच्या मनांत दृढमूल असते. स्वतःच्या मनगटाच्या सामर्थ्यावर त्याचा पूर्ण भरंवसा असतो. तुम्ही आत्मिक बलावर विश्वास ठेवतां असें म्हणतां, मग केवळ शारीरिक सामर्थ्याहूनही या आध्यात्मिक सामर्थ्याचा प्रकाश केवढा मोठा पडला पाहिजे ! आपणां सर्वांमध्यें अफाट सामर्थ्याचा आणि अनंत आत्म्याचा वास आहे असें आपले सारे धर्मग्रंथ,

सर्व ऋषी आणि सत्पुरुष आपणांस एकमतानें सांगत आहेत. आत्म्याचा नाश कोणीही करूं शकत नाहीं. त्याच्या ठिकाणीं अनंत सामर्थ्य आहे; तें सामर्थ्य फक्त आपल्या बोलावण्याचीच वाट पहात आहे. द्वैत-विशिष्टाद्वैत अथवा अद्वैत अशीं अनेक मतें आपणांमध्यें प्रचलित असलीं, तथापि आत्म्याच्या ठिकाणीं अनंतत्त्व आणि सर्वशक्तिमत्त्व हीं आहेत, याबद्दल सर्वांची एकवाक्यता आहे. ही शक्ति फक्त व्यक्त होण्याचाच अवकाश आहे. ही व्यक्त होण्याकरितां श्रद्धेची आवश्यकता आहे. आपणा सर्वांस प्रथम जें कांहीं करावयाचें आहे, तें अंतःकरणांत श्रद्धेची उत्पत्ति करणें हेंच होय. प्रत्येक पवित्र वस्तूची थट्टा करण्याचा जो भयंकर रोग आपणा सर्वांस आज जडला आहे, तो प्रथम समूळ उपटून काढणें आपणांस भाग आहे. तो निघाल्यांशिवाय आपल्या अंतःकरणांत श्रद्धेचें बीज रुजणार नाहीं, आणि श्रद्धेवांचून सामर्थ्य येणार नाहीं. याकरितां आपण श्रद्धावान् होऊन बलवान् होऊं या. आपण बलवान् झालों ह्मणजे बाकीच्या गोष्टी क्रमाक्रमानें आपोआपच साध्य होतील.

माझ्या हातून अद्यापि ह्मणण्यासारखा कोणताही कार्यभाग झालेला नाहीं. मोठें कार्य अद्यापि शिल्लक आहे आणि तें उचलण्याची जबाबदारी तुह्मां सर्वांच्या शिरावर आहे. मी कदाचित् उद्यांच मृत्यु पावलों, तथापि हें कार्य मृत्युवश होणार नाहीं. माझ्यामागें हजारों लोक या कार्यासाठीं कंबरा बांधून सज्ज होतील, असा मला पूर्ण भरंवसा आहे. माझ्या कल्पनेच्या बाहेरही हें कार्य ते यशस्वी करतील, याबद्दल मला शंका वाटत नाहीं. माझ्या मातृभूमीच्या ठिकाणीं आणि विशेषतः तिच्या तरुण पुत्रांच्या ठिकाणीं माझी पूर्ण श्रद्धा आहे. बंगाल्यांतील तरुणांच्या शिरावर अत्यंत महत्त्वाच्या कार्याचें ओझें पडलें आहे. गेलीं दहा वर्षें मी सारा हिंदुस्थान देश भटकलों आणि सर्व देशाचें निरीक्षण करतां माझी अशी खात्री झाली आहे कीं, आध्यात्मिक साम्राज्यांत भरतभूमीला तिचें योग्य स्थान प्राप्त करून देण्याचें महत्कार्य फक्त बंगाल्यांतील तरुणच करूं शकतील. बंगाल्यांतील तरुणांना अंतःकरणाची कोमलता आणि उत्साह यांची जोड मिळालेली आहे आणि त्यांतूनच पृथ्वीच्या एका टोंकापासून दुसऱ्या टोंकापर्यंत आमचा पूर्वार्जित तत्त्वरत्नसंग्रह वांटण्याचें काम करणारे धर्मवीर

उपजतील, असा मला भरंवसा वाटतो. आपणां सर्वांस जें कांहीं करावयाचें आहे, तें हेंच. याकरितां श्रुतिवचनानें पुन्हां एकवार मी आपणांस हेंच ह्मणतों, " **उत्तिष्ठत जाग्रत प्राप्य वरान्नि बोधत** । " आपणांस कशाचीही भीति बाळगावयास नको. सामान्य मनुष्यांच्या संघशक्तीवरच सर्व जगाचें गाडें चालू आहे, असें इतिहास आपणास सांगत आला आहे. सामान्य मनुष्यांतूनच आजपर्यंत महाबुद्धिमान् पुरुष निर्माण झाले आहेत. इतिहासाची पुनरावृत्ति होत असते, असा अनुभव आपणांस नित्य येत असतो. मग याच बाबतींत तशी पुनरावृत्ति कां होऊं नये ? तुह्मी महत्कार्य संपादूं शकाल, याबद्दल क्षणमात्रही शंका अथवा भीति तुमच्या चित्तांत येऊं देऊं नका. भीतीचा प्रवेश तुमच्या चित्तांत झाला, कीं मग मात्र सारा कारभार आटोपलाच. जगांत जीं अनंत दुःखें आढळून येतात, त्यांचें कारण भीतियुक्त अंतःकरण हेंच. या भीतीचें समूळ उच्चाटन झालें, तर या पृथ्वीचाच आपणास स्वर्ग बनवतां येईल ! याकरितां " **उत्तिष्ठत जाग्रत प्राप्य वरान्नि बोधत** । "

सद्गृहस्थ हो, आपण मजवर जो लोभ करतां, त्याजबद्दल पुन्हां एकवार मी आपले आभार मानतों. माझ्या देशाच्या आणि बांधवांच्या रतिभर तरी उपयोगी पडावें, इतकीच माझी अंतःकरणापासून इच्छा आहे.

## मद्रास येथील मानपत्रास उत्तर.

( लिहून पाठविलेलें. )

मद्रास येथील माझे देशबांधव आणि धर्मबांधव हो, आपल्या धर्माच्या प्रसारार्थ जी थोडीशी क्षुल्लक कामगिरी मी केली, ती तुमच्या पसंतीस उतरली, हें पाहून मला फार संतोष वाटतो. तुह्मी माझी स्तुति केली ह्मणून मला संतोष वाटतो असें नव्हे, तर कित्येक शतकेंपर्यंत परकीय अंमलाचा झंझावात भरतभूमीच्या मस्तकावरून वाहत असतांही व अनेक जेत्यांनीं तिला क्षुद्रत्व आणिलें असतांही आणि तसेंच आपल्या स्वतःच्या उपेक्षेनें आमच्या या धर्माच्या इमारतीचे कित्येक खांब आणि कित्येक सुंदर कमानी हीं धुळीस मिळालीं असतांही, इमारतीचा मुख्य आधारस्तंभ अद्यापि

शाबूत आहे, हें पाहून मला फार आनंद होतो. ज्या मुख्य पायावर परमेश्वराच्या तेजोमय साक्षात्काराची आणि सर्वांभूतीं समतेची ही इमारत उभारली गेली आहे, तो पाया अद्यापिही पूर्वी इतकाच मजबूत असून, त्याला यत्किंचितही धक्का लागलेला नाहीं. ज्या परमश्रेष्ठ विभूतीचा संदेश जगाला पोंचविण्याचें काम मज पामराकडे आलें आहे, त्या विभूतीचाच तुह्मी गौरव करीत आहां. हिंदुस्थानांत धर्मकार्यांची जी प्रचंड लाट आतां लौकरच उद्भवणार आहे, तिचा पहिला सूक्ष्म ध्वनि या संदेशाच्या द्वारें ऐकूं येऊं लागला आहे. ही लाट उद्भवली ह्मणजे तिजपुढें साऱ्या क्षुल्लक शक्ती लय पावतील; तिच्या मार्गांत अडथळा आणण्याचें सामर्थ्य कोणासही असूं शकणार नाहीं. मानवजातीस दुर्बलता आणणाऱ्या ज्या ज्या गोष्टी अस्तित्वांत असतील, त्या साऱ्यांचा विलय होईल आणि ईश्वरानें स्वतःच्या इच्छेनें जें उच्चपद हिंदुकुलाकरितां निर्माण केलें आहे, त्या पदीं तें कुल विराजमान होईल. अशा वेळीं त्या कुलाचें तेज पूर्वीपेक्षांही अधिक प्रखर होईल. आज अनेक शतकें अनेक प्रकारच्या हालअपेष्टा हें कुल शांतपणें सोशीत आहे आणि एकंदर मानवकुलाची पारमार्थिक उन्नति करण्याचें जें त्याचें ब्रीद तें हें पुरें करीत आहे. त्याचा मोबदला ह्याला आतां लौकरच मिळेल.

विशेषत: उत्तरहिंदुस्थानांतील लोकांच्या शिरावर तुह्मां दाक्षिणात्यांचे फार उपकार आहेत: कारण, हिंदुस्थानांत जें कांहीं धर्माचें स्वरूप आज आढळून येतें आणि ज्या कांहीं धार्मिक चळवळी अद्यापिही सुरू आहेत, त्यांचें मूळ दक्षिणेंतच आहे. भगवान् शंकराचार्य, श्रीरामानुजाचार्य आणि श्रीमध्वाचार्य हे सारे शककर्ते भाष्यकार दक्षिणहिंदुस्थानांतच जन्मास आले. जगांतील प्रत्येक अद्वैतवादी श्रीशंकराचार्यांच्या पादारविंदीं आपलें मस्तक अर्पण करितो. अवनतावस्थेस पोहोंचलेल्या आणि उच्च जातीयांच्या पादाघातांखालीं चुरडून गेलेल्या कनिष्ट जातींचा उद्धार श्रीरामानुजाचार्यांनीं केला. उत्तरेकडील श्रीकृष्णचैतन्य यांचे अनुयायीही श्रीमध्वाचार्यांची श्रेष्ठता कबूल करितात. अद्यापिही काशींतील श्रेष्ठांचें पुढारीपण दक्षिणेंतील लोकांकडेच आहे. हिमाचलांतील उत्तुंग शिखरावर असलेल्या पवित्र देवस्थानांचें चालकत्व अद्यापिही तुह्मां दाक्षिणात्यांकडेसच आहे.

अशा स्थितींत भगवान् श्रीरामकृष्णांचा संदेश तुह्मांस पटून त्याचें तुह्मीं गौरव करावें, यांत काय नवल आहे ? ज्यांच्या नसांत उपरिनिर्दिष्ट आचार्यांसारख्या महाविभूतींचें रक्त खेळत आहे, त्यांना साजण्यासारखेंच हें कृत्य आहे !

वेदविद्या अनंतकालापासून आजतागायत एकसारखी दक्षिणेंतच नांदत आली आहे ! हिंदुधर्मांत अनेक शाखा आणि पंथ असले तरी त्या सर्वांचें एकीकरण करण्याचें कार्य श्रुतिमाताच करूं शकेल, हें माझें ह्मणणें तुह्मांस खचित पटेल. सर्व पंथांच्या आणि भेदांच्या मुळाशीं श्रुतीच आहे.

वेदांतील संहिता आणि ब्राह्मण हे भाग भाषाकोविदांच्या दृष्टीनें मोठ्या उपयोगाचे असतील व 'अग्निमीळे' किंवा 'ईशेत्वोर्जेत्वा' किंवा 'शन्नोदेवीरभिष्टये' इत्यादि मंत्रांच्या सहाय्यानें केलेल्या यज्ञसमारंभापासून केवढीही मोठी फलप्राप्ति झाली असली, तथापि तिचा उपयोग भोग वाढविण्याकडेच झाला. त्यांच्या सहाय्यानें मोक्षाची प्राप्ति होते, असें आजवर कोणीही ह्मटलेलें नाहीं. अशा स्थितींत मोक्षमार्गांकडे नेणारें जें ज्ञानकांड आणि जीं आरण्यकें त्यांच्याच चरणीं हिंदुकुलानें आजपर्यंत लोटांगणें घातलीं आहेत.

आज तरुण हिंदूंची स्थिति कशी झाली आहे पहा. सनातनधर्माच्या अनेक शाखा व उपशाखा यांत तो गुरफटला आहे. भलत्याच पूर्वग्रहांस बळी पडल्यामुळें खऱ्या धर्मांची ओळख त्यास होत नाहीं. '**अणोरणीयान् महतो महीयान्**' असें ईश्वराचें स्वरूप ज्या एकाच धर्मानें सर्वांस सुगम करून दिलें आहे, तो धर्म आमच्या नव्या तरुणांस समजेनासा झाला आहे. ज्या राष्ट्रांनीं शुद्ध जडवादापलीकडे कधींही मजल मारिली नाहीं, त्या राष्ट्रांपासून धर्मांचे धडे घेऊन, हा तरुण अंधारांतून चांचपडत आहे. स्वतःच्या पूर्वजांनीं पाळलेला अत्युच्च धर्म समजण्याकरितां त्यानें केलेली खटपट फुकट जात आहे. अशा स्थितींत हताश होत्साता सत्यशोधनाचा मार्ग तो सोडून देतो आणि तुटकाफुटका निरीश्वरवादी होऊन बसतो. अशा स्थितींत त्याचा उपजत धर्ममार्गांकडे जाणारा अंतःस्वभाव त्याला चैन पडूं देत नाहीं. मग त्याच्या पाश्चात्य वैद्यांनीं तयार केलेल्या धर्माच्या काढ्यांस स्वतःच्या मतांचा वास लावून त्याचें तो आकंठ पान करतो, आणि अशा रीतीनें "**परियंति मूढा अंधेनैव नीयमाना यथा**

**अन्धाः** " या श्रुतिवचनाची पूर्तता त्याच्या ठिकाणीं दृष्टोत्पत्तीस येते. अंधामागें जाणारी अंध तरुणांची परंपरा हिंदुस्थानांत आज जिकडे तिकडे निदर्शनास येत आहे.

जीवनकलेचें दान करणाऱ्या श्रीसद्गुरूच्या अभय कराचा ज्यांना स्पर्श झाला असेल, ते भक्तिमार्गावर आरूढ होऊं शकतील. भगवान् भाष्यकार म्हणतात,

**दुर्लभं त्रयमेवैतत् देवानुग्रहहेतुकम् ।**
**मनुष्यत्वम् मुमुक्षुत्वम् महापुरुषसंश्रयः ॥**

या जगांत अत्यंत दुष्प्राप्य आणि केवळ परमेश्वराच्या कृपेनेंच प्राप्त होणाऱ्या तीन वस्तू आहेत. मनुष्यजन्म, मुक्त होण्याची इच्छा आणि महापुरुषाचा आश्रय, या त्या तीन वस्तु होत.

परमाणु, द्व्यणु आणि त्रसरेणु इत्यादि आश्चर्यकारक उपपत्तींचें उद्घाटन करणारी वैशेषिकांची पद्धत झाली, अथवा जाति, द्रव्य, गुण, समवाय इत्यादिकांचा वाद पुढें आणणारी नैयायिकांची मीमांसा झाली, अथवा सांख्यमीमांसा झाली अथवा या सर्वांचें केवळ परिपक्व फल अशीं श्री व्यासांचीं सूत्रें झालीं, तरी या सर्वांच्या मुळाशीं श्रुतीचा आधार आहे. मानवी मनाचें पृथक्करण अथवा समीकरण करणाऱ्या कितीही पद्धती झाल्या, तरी त्यांस श्रुतीचा आधार आहे. बौद्ध अथवा जैन यांच्या तात्त्विक ग्रंथांतही श्रुतीचा आधार घेतला जात नाहीं असें नाहीं. किंबहुना कित्येक बौद्धग्रंथांत आणि जैनांच्या बहुतेक ग्रंथांत श्रुतींचें प्रामाण्य पूर्णपणें कबूल केल्याचें आढळतें. फक्त ज्या ठिकाणीं हिंसेचा विषय येतो, तेवढीं ठिकाणें मात्र जैनतत्त्वविवेचकांस कबूल नाहींत. श्रुतींतील अशाप्रकारचे भाग मूळचे नसून ब्राह्मणांनीं ते आपल्या पदरचे घुसडले आहेत असें त्यांचें म्हणणें आहे. अगदीं अलीकडच्या काळीं झालेले स्वामी दयानंद सरस्वती यांचेंही मत अशाच प्रकारचें होतें. प्राचीन आणि अर्वाचीन अशा दोन्ही प्रकारच्या तत्त्ववेत्त्यांचीं मतें कोणत्या दिशेनें वाहतात, याचा आपण शोध केला, तर ती दिशा आपणास श्रीव्यासांच्या सूत्रांत आढळून येईल. हिंदूधर्माचीं अनेक प्रकारचीं रूपें जरी आज दृष्टोत्पत्तीस येत असलीं, तरी त्या सर्वांची एकवाक्यता व्यासांच्या ब्रह्मसूत्रांत आढळून येईल.

'अस्ति,' 'भाति,' 'प्रिय' इत्यादि आत्म्यांच्या विशेषणांचा अद्वैत, केसरीच्या मुखांतून निघालेला घोष हिमाचलाच्या प्रशांत अरण्यांत कोणाच्या कानीं येईल, अथवा वृंदावनांतील वृक्षराजींच्या उदरांत 'पिया,' 'पितं' इत्यादि श्रुतिमनोहरकूजित एकाद्याच्या कानीं पडेल, अथवा वाराणसीच्या मठांत अत्यंत शांत चित्त होत्साता धर्मस्थ बसलेला मुमुक्षुगण एखाद्याच्या नजरेस येईल, अथवा भक्तीच्या आनंदानें बेहोष होऊन नाचणाऱ्या श्रीचैतन्याच्या अनुयायांचा संघ कोणाच्या अवलोकनांत येईल, अथवा कोणी श्रीरामानुजांचा किंवा श्रीमध्वाचार्यांचा शिष्य बनेल अथवा "वा: गुरुकी फतेह!" असा शिखांनीं काढलेला लष्करी ध्वनि एखाद्याच्या कानीं पडेल, अथवा उदासी आणि निर्मल यांनीं केलेली ग्रंथसाहेबावरील टीका कोणाच्या कानीं येईल, अथवा कबिराच्या त्यागी शिष्यांचें दर्शन कोणास घडेल, अथवा सुप्रसिद्ध विचारसागर ग्रंथाचा कर्ता महानुभाव निश्चलदास याची वाणी कोणास ऐकूं येईल, अथवा लालगुरूनीं शिकविलेलें ज्ञान उत्तरेकडील एखाद्या भंग्याच्या अथवा मेहतराच्या तोंडून ऐकूं येईल; तथापि इतक्या अनेकविध पद्धतींच्या मुळाशींही श्रुतींचाच आधार आढळून येतो. परमहंस परिव्राजकाचार्यांपासून तों थेट लालगुरूच्या भंगी चेल्यापर्यंत आढळणारे नानाविध पंथ हीं एकाच धर्माचीं अनेकविध रूपें आहेत, असें आढळून येतें. जो सनातनधर्म, श्रुति, गीता आणि शारीरक सूत्रें यांनीं सांगितला आहे, त्याच धर्माचीं हीं नानाविध रूपें आहेत असें आपल्या प्रत्ययास येईल.

आरण्यकें, गीता आणि शारीरक सूत्रें ह्या तीन भागांस प्रस्थानत्रयी असें ह्मणतात. द्वैत, विशिष्टाद्वैत आणि अद्वैत या तिन्ही मतांस या प्रस्थानत्रयीचा आधार आहे. पुराणांतर्गत कथांच्या द्वारें हिंदुधर्माच्या व्यवहार्य रूपाचें उद्घाटन ह्यांत केलें असल्याचें आढळून येतें, आणि तंत्रांमध्यें हवनयज्ञादि क्रियांचें विवेचन केलेलें आढळेल. अशा रीतीनें प्रस्थानत्रयीचा आधार सर्वसाधारण आहे; पण प्रत्येक पंथानें स्वतःचीं पुराणें आणि तंत्रें हीं वेगवेगळीं रचून स्वतःच्या मतांचें व्यवहार्यरूप दर्शित केलें आहे.

तंत्रांबद्दल बराच गैरसमज सर्वत्र असल्याचें आढळून येतें; तथापि तंत्रांची रचना श्रुतींतील ब्राह्मणग्रंथांच्या आधारानें झाली आहे, हें लक्ष्यांत

ठेविलें पाहिजे. तंत्रांविषयीं भलभलते सिद्धांत स्थापित करूं पाहण्यापूर्वी ब्राह्मणग्रंथांच्या आधारानें तंत्रग्रंथाचा अभ्यास करावा, अशी माझी सूचना आहे. तंत्रांत येणारे बहुतेक सर्व मंत्र ब्राह्मणग्रंथांतून जसेच्या तसेच घेतले आहेत, असें आढळून येईल. हिमालयापासून तों कन्याकुमारीपर्यंत हवनाचे जे प्रकार आज अस्तित्वांत आहेत, ते सर्व तंत्रग्रंथांतूनच घेतले आहेत, असें आढळून येईल. तसेंच शाक्त किंवा शैव किंवा वैष्णव आणि इतर साऱ्या पंथांनींही हवनादि कर्मांत तंत्रग्रंथांचा सारखाच आधार घेतल्याचें आढळून येतें.

हिंदुधर्मांतील निरनिराळ्या पंथांच्या सर्व अनुयायांस या मूळ आधारांची माहिती असेल, असें माझें ह्मणणें नाहीं. खालच्या बंगाल्यांत कित्येक पंथ आणि उपपंथ यांचीं नांवेंही ठाऊक नसलेले असे कित्येक लोक आहेत; तथापि स्वतःस कळत अथवा नकळत हे सारे पंथ प्रस्थानत्रयीच्या आधारानेंच आपापला मार्ग क्रमीत आहेत यांत संशय नाहीं.

हिंदीभाषा ज्या ज्या प्रांतांत बोलली जाते, तेथील हलक्या दर्जाच्या लोकांतही खालच्या बंगाल्यांतील उच्च वर्णियांपेक्षांही अधिक ज्ञान आढळून येतें. असें कां व्हावें?

मिथिलेच्या भूमींतून निघालेल्या या धर्मविचारांचें बीजारोपण नवद्वीपांत झालें. त्यांना शिरोमणी, गदाधर, जगदीश, इत्यादि अनेक विद्वद्रत्नांनीं पाणी घालून त्यांचें पोषण केलें आणि त्यांस वाढीस लाविलें. बंगाल्यांतील न्यायमीमांसा ही कांहीं बाबतींत जगांतील सर्व मीमांसांत श्रेष्ठ आहे. तिचें उद्घाटनही अत्यंत सुंदर आणि मनोहर भाषेंत झालें आहे. आर्यावर्तांतील सर्व प्रांतांत या मीमांसेचा अभ्यास केला जातो; पण कालांतरानें श्रुतींचा अभ्यास मागें पडला, ही मोठ्या खेदाची गोष्ट होय. अखेरीस अशी वेळ आली कीं, श्रीपतंजलीचें महाभाष्य शिकविण्याजोगा विद्वान् पंडित साऱ्या बंगाल्यांत एकही आढळेनासा झाला. या काळांत अनेक वादविवादांच्या पलीकडे गेलेली आणि बुद्धीचा केवळ सागर अशी एकच मूर्ति बंगाल्यांत निर्माण झाली. ही मूर्ति भगवान् श्रीकृष्णचैतन्य यांची होय. भगवान् श्रीकृष्णचैतन्यांच्या आगमनानें बंगालदेश झोंपेंतून खडबडून जागा झाला आणि कांहीं काळपर्यंत देशांतील इतर पारमार्थिक चळवळींस बंगालही हातभार लावूं लागला.

श्रीचैतन्य यांनीं एका भारती गुरूपासून संन्यासदीक्षा घेतली असतांही व अशा रीतीनें ते स्वतः भारतीपंथाचे झाले असतांही त्यांस खरी धर्मजागृति मध्वेंद्रपुरी यांजकडून मिळाली.

बंगाल्यांत धर्मजागृतीचें कार्य मुख्यतः या पुरीच्या पंथानेंच केलें आहे. भगवान् श्रीरामकृष्ण यांस तोतापुरी यांजपासून संन्यासाश्रम मिळाला.

व्याससूत्रांवर श्रीचैतन्य यांनीं जें भाष्य केलें होतें, तें आज उपलब्ध नाहीं. कदाचित् काळाच्या उदरांत तें गडप झालें असावें. पुढें श्रीचैतन्यांचे शिष्य दक्षिणेंतून माध्वपंथीयांस मिळाले; आणि रूप, सनातन आणि जीवगोस्वामी इत्यादि महानुभावांनीं केलेल्या धर्मजागृतीचें कार्य कांहीं बावांजींकडे सोंपविण्यांत आलें. असें झाल्यानंतर श्रीचैतन्यांची कामगिरी मागें पडत चालली. आतां या कामगिरीचा पुनरुदय होण्याचीं चिन्हें अलीकडे कांहीं वर्षांपासून दिसूं लागलीं आहेत. हें कार्य पूर्वींच्या जोमानें पुन्हां चालेल अशी मला आशा आहे.

भगवान् श्रीचैतन्य यांचें वजन साऱ्या हिंदुस्थानांत दिसून येतें. भक्तिमार्गाचा प्रचार जेथें जेथें आहे, तेथें तेथें श्रीचैतन्यांच्या ग्रंथांचा अभ्यास केला जातो आणि श्रीचैतन्यांची अवतारी पुरुषाच्या नात्यानें पूजाही केली जाते. वल्लभाचार्यांचा पंथही श्रीचैतन्यांच्या मूळ पंथाची एक शाखा असावी असें माझ्या दृष्टीनें दिसतें.

गुरूची गादी वंशपरंपरेनें चालविण्याची चाल बंगाल्यांत सर्वत्र सुरू आहे. वास्तविक ही पद्धत फार चमत्कारिक असून तिला पूर्वपरंपरेचा पाठिंबाही नाहीं. या पद्धतीमुळेंच हिंदुस्थानांतील इतर प्रांतांशीं बंगाल्याचा धार्मिक संबंध राहिला नाहीं. तसेंच इतर प्रांतांतून येणारा संन्याशांचा समूहही बंगाल्यांत येईनासा झाल्यामुळें, त्याचा इतर प्रांतांशीं संबंध तुटला. धर्मविचाराचें सारें भांडार अद्यापिही संन्याशांच्याच हातीं असून सनातनधर्माचें प्रतिनिधित्वही अझून त्यांजकडेसच आहे.

बंगाल्यांतील उच्चवर्णीयांस त्यागाची आवड नाहीं. अद्यापि ते भोगी लोक आहेत. त्यांची भोगावरची वासना कमी झाली नसल्यामुळें धर्मविचारांतील अत्युच्च रहस्यापर्यंत त्यांची दृष्टि पोहोंचावी कशी? '**त्यागेनैकेन अमृतत्त्व मानशुः**' असा सनातन सिद्धांत आहे. हा सिद्धांत खोटा कसा होईल?

उलटपक्षीं हिंदी भाषा जेथें चालते, त्या प्रांतांत त्यागी गुरूंची परंपरा एकसारखी लागून राहिली आहे. या गुरूंनीं वेदांताचीं तत्त्वें प्रत्येक शिष्याच्या दारापर्यंत आणून पोंचविलीं आहेत. विशेषत: पंजाबांतील रणजितसिंगाच्या कारकीर्दींत त्यागाला जें विशेष प्रोत्साहन मिळालें, त्यामुळें वेदांतदर्शनाचा प्रचार अत्यंत कनिष्ठ जातींपर्यंतही झाला. कापसाचें सूत काढण्याच्या चाकांतूनही 'सोऽहं, सोऽहं' असा ध्वनी निघतो असें पंजाबांतील शेतकऱ्याच्या मुलीसुद्धां ह्मणतात, तें किती खरें आहे ! हृषिकेशानजीकच्या अरण्यांत कांहीं भंगी जातीचे संन्याशी मला आढळून आले. काषाय वस्त्रांचें परिधान करून ते वेदान्ताचा अभ्यास करीत होते. पुष्कळ उच्चवर्णीयांनीं यांच्या पायीं बसून यांचे शिष्य व्हावें, अशी यांची योग्यता होती. '**अंत्यादपि परंधर्मं**' ही जुनी म्हण येथें लागू करण्यास काय हरकत आहे ? कोणी हलक्या जातीचा झाला ह्मणून त्याजपासून उच्च वर्णीयांनीं पराविद्येची प्राप्ति करून घेऊं नये काय ?

अशा रीतीनें पंजाबांत धर्मतत्त्वांची परंपरा एकसारखी जागृत राहिल्यामुळें बंगाल, मुंबई किंवा मद्रास या प्रांतांपेक्षां तेथील लोकांस धर्मशिक्षण मिळत गेलें आणि अद्यापिही ते इतर प्रांतांपेक्षां या बाबतींत आघाडीस आहेत. त्यागी, दशनामी, बैरागी आणि इतर पंथांचे अनुयायी हे प्रत्येकाच्या दारापर्यंत धर्मज्ञान पावतें करीत असतात. आणि त्याची किंमत ह्मणाल तर भाकरीचा एक तुकडा. या पंथवाल्यांपैकीं बहुतेक लोक अत्यंत निरपेक्ष वृत्तीचे आणि उदात्त हेतूनें प्रेरित असतात. अशाच पंथवाल्यांपैकीं एका स्वतंत्र पंथाचा एक संन्यासी माझ्या माहितीचा आहे. या एकाच संन्याशानें सर्व राजपुतानाभर शेंकडों शाळांची आणि अनेक प्रकारच्या धार्मिक संस्थांची स्थापना करण्यांत पुढाकार घेतला आहे. त्यानें भर जंगलांतही इस्पितळें उघडलीं आहेत. हिमालयाच्या कित्येक खोऱ्यांत पूल बांधले आहेत. हा संन्याशी कोणत्याही नाण्याला स्वतःच्या हस्तानें कधींही स्पर्श करीत नाहीं. त्याला कोणत्याही प्रकारची स्थावर मिळकत नाहीं. फार काय ? पण एका कांबळीशिवाय दुसरें वस्त्रही त्याजपाशीं नसतें ! यावरूनच त्याला कांबळीबावा असें नांव पडलें आहे. हा संन्याशी दारोदार भीक मागून आपलें पोट भरतो. एकाच गृहस्थावर आपलें ओझें पडूं नये

म्हणून एक सबंध शिधा एकाच गृहस्थापासून तो कधींच घेत नाहीं, हें मला ठाऊक आहे. सनातनधर्माचे रक्षणकर्ते अशा प्रकारचे वीर–प्रत्यक्ष परमेश्वराचे अवतार–हिंदुस्थानांत जिवंत असतां व निरपेक्षतेचें कवच त्यांच्या आंगाभोंवतीं असतां हा आमचा पुराण धर्म कधीं तरी लयास जाईल असें तुम्हांस वाटतें काय ? अमेरिकेंत धर्मोपदेशकाला वर्षाकांठीं तीस चाळीस हजार किंबहुना नव्वद हजार रुपयेसुद्धां प्राप्ति असते; आणि इतकें वेतन घेऊन आठवड्यांतून फक्त रविवारीं दोन तास व तेंसुद्धां वर्षांतून सहा महिने इतकें मोठें धर्मप्रचाराचें कार्य ते करीत असतात. आपल्या धर्मांच्या रक्षणाकरितां ख्रिस्ती लोक करोडों रुपये कसे खर्च करितात तें पहा, आणि उलटपक्षीं कांबळीबावासारख्या अत्यंत निरपेक्षवृत्तीच्या धर्मावताराकडे पहा. असल्या प्रकारचीं माणसें म्हणजे भटक्या मारीत फिरणारे आळशी लोक आहेत, असें बंगाल्यानें ह्मणावें काय ? **'मद्भक्तानां च ये भक्तास्ते मे भक्ततमा मता'** जे कोणी माझ्या भक्तांची भक्ति करितात ते माझे परमभक्त होत, असें भगवंतांनीं ह्मटलें आहे.

अत्यंत अज्ञानी अशा एखाद्या बैराग्याचें उदाहरण आपण पाहूं. अशा प्रकारचा बैरागी एखाद्या खेड्यांत गेला म्हणजे तोसुद्धां आपल्या भक्तीप्रमाणें तुळशीदास, श्रीचैतन्य, इत्यादिकांच्या कवितेच्याद्वारें खेडवळांस धर्मज्ञान देण्याचा यत्न करीत असतो. या त्याच्या मेहनतीला कांहींच किंमत नाहीं असें तुम्हांस वाटतें काय ? संसारी जनांचें तो थोडें तरी हित करीत नाहीं काय ? आणि या मेहनतीसाठीं एखाद्या फाटक्या कपड्याची अथवा एखाद्या मूठभर धान्याची किंमत फार झाली काय ? आपल्या टीकेचें शस्त्र हातीं घेऊन अशा प्रकारच्या बैराग्यावर वार करण्यास धांवण्यापूर्वीं आपण स्वत: परक्याकरितां पूर्वीं काय केलें आहे, याचा प्रथम विचार करा. ज्यांच्या खर्चानें शिक्षण घेऊन तुम्ही विद्वान बनलां आणि ज्यांना नि:सत्व करून तुम्ही आपला मोठेपणा कायम राखीत आहां, त्यांजकरितां तुम्ही काय झीज सोसली आहे, याचा विचार करा. इतकें द्रव्य खर्चून तुम्ही जें शिक्षण संपादन केलें, त्याचें फल अशा प्रकारच्या बावाजींस शिव्या देण्यांत दिसावें, हेंच त्या शिक्षणाचें महत्त्व काय ?

हिंदुधर्माचें जें नवें स्वरूप बंगाल्यांत दिसूं लागलें आहे, त्याजवर कांहीं थोडे लोक खरमरीत टीका करीत असतात. वास्तविक पाहतां अशा

प्रकारची टीका व्हावी हें अगदीं रास्त आहे. खऱ्या हिंदुधर्माशीं बंगाल्यांची ओळख नुकतीच कोठें होऊं लागली आहे. आजपर्यंत केवळ देशाचाराच्या पलीकडे त्यांचें धर्मज्ञान गेलें नव्हतें. काय खावें, काय प्यावें, आणि विवाहादि कार्यें कशीं पार पाडावीं असल्या जाड्या विचारांपलीकडे ते गेले नव्हते.

श्रीरामकृष्णांच्या शिष्यांनीं धर्मप्रचाराचें जें कार्य सर्व हिंदुस्थानभर चालविलें आहे, तें शास्त्रप्रणीत नियमास अनुसरून आहे कीं नाहीं, याचा विचार या लहानशा लेखांत करतां येत नाहीं; पण आह्मांवर टीका करणारे जे कोणी असतील, त्यांना चार शब्द उत्तरादाखल मी सांगतों; म्हणजे आह्मी काय करीत आहों हें त्यांच्या बरोबर ध्यानांत येईल.

काशीदास अथवा कृत्तिवास इत्यादिकांच्या ग्रंथांवरून सनातनधर्माबद्दल रास्त कल्पना येत नाहीं असें आम्हीं कधींही ह्मटलें नाहीं. त्यांचे शब्द अमृतासमान असून ज्यांच्या कानांवर ते पडतील, ते पुण्यवान् होतील, याबद्दलही मला शंका नाहीं. तथापि सनातनधर्माचें खरें ज्ञान होण्यास श्रुति आणि दर्शनें हीं काय सांगतात व भाष्यकार आचार्य आणि त्यांचे शिष्य काय ह्मणतात, याचा विचार आपण अवश्य केला पाहिजे.

श्रीगौतमांच्या सूत्रांपासून आरंभ करून वात्स्यायनांच्या टीकेच्या द्वारें ‘ आप्त ’ म्हणजे काय याचा विचार आपण केला आणि शबरादि वृत्तिकारांच्या द्वारें मीमांसेचें अवलोकन आपण केलें. तर आप्त म्हणजे काय हें आपणास कळून येईल, तसेंच ‘ अलौकिक प्रत्यक्ष ’ म्हणजे काय व प्रत्येकाला आपला ‘आप्त’ होतां येतें कीं काय, याचाही विचार आपणांस कळून येईल. आप्तवचन आपणांस प्रमाण असलें पाहिजे ही गोष्ट खरी, पण ‘ आप्त ’ कोण याचाही विचार केला पाहिजे. यजुर्वेदाच्या प्रारंभीं महीधरांनीं जो उपोद्घात लिहिला आहे, तो तुह्मीं पाहिला तर अंतर्गत मानवी विचारांचें नियंत्रण करण्याकरितांच श्रुतींची रचना कशी झाली आहे, याचें अत्यंत सुंदर विवेचन तेथें तुह्मांस आढळून येईल. याच दृष्टीनें श्रुति अनंत आहेत असें उघड दिसून येतें.

सृष्टि अनंत आहे, हें मत केवळ हिंदुधर्मांतच आहे असें नाहीं, तर बौद्ध आणि जैन यांनींही त्याचा प्रामुख्यानें स्वीकार केला आहे.

हिंदुस्थानांत जितके धर्मग्रंथ आढळून येतात, त्यांचे मुख्यत: दोन विभाग करतां येतील. एक ज्ञानमार्गी आणि दुसरा भक्तिमार्गी. श्रीशंकरा-

चार्यांच्या शारीरक भाष्याचें अवलोकन तुह्मीं केलें, तर ज्ञानाला निरपेक्षतेची किती आवश्यकता आहे, हें तुह्मांस आढळून येईल. तसेंच मोक्षप्राप्तीकरितां विशिष्ट आचार, विशिष्ट पंथ, विशिष्ट जात, विशिष्ट वर्ण, अथवा विशिष्ट मनें यांचें यत्किंचितही कारण नाहीं, अशी तुमची खात्री होईल. जो कोणी चतुःसाधनसंपन्न होईल, त्याला मोक्षःश्री माळ घातल्यावांचून राहणार नाहीं.

केवळ भक्तिमार्गापुरता विचार केला तरी मोक्षप्राप्तीच्या मार्गांत जातिगोताची अथवा दुसऱ्या कोणत्याही विशिष्ट गोष्टीची जरुरी नाहीं, असें सर्व सत्पुरुष सांगत आले आहेत, ही गोष्ट आमच्या बंगाली टीकाकारांसही ठाऊक असेलच. भक्तिमार्गांत केवळ भक्ति हीच प्रधान असून इतर आगंतुक गोष्टी महत्वाच्या नाहींत.

भक्ति अथवा ज्ञान यांपैकीं कोणताही मार्ग झाला तरी त्यांत कसल्याही प्रकारची आडकाठी ठेवलेली नाहीं, असेंच आपणास आढळून येतें. यामुळें मोक्षप्राप्तीकरितां एखाद्या विशिष्ट जातीची अथवा पंथाची जरुरी आहे, असें सांगणारें आधार वचन आपणास कोठेंही आढळावयाचें नाहीं. "**अंतराचावितु तद्दृष्टेः**" या व्यासांच्या सूत्रावरील श्रीशंकराचार्यांचें, रामानुजांचें अथवा मध्वांचें भाष्य पाहिलें ह्मणजे मी काय ह्मणतों तें तुमच्या लक्षांत येईल.

दुसऱ्या सर्व धर्मांत मोक्षाची जी आकुंचित कल्पना दृष्टीस पडते, ती उपनिषदांत अथवा संहितांत तुह्मांस कोठेंही आढळून येणार नाहीं. परकीयांच्या मतांचा अधिक्षेप करूं नये, ही कल्पनाही आमच्या ग्रंथांत सर्वत्र आढळून येते. अध्वर्यू वेदाच्या संहितेंतही '**न बुद्धिभेदं जनयेदज्ञानाम् कर्मसंगिनाम्**' अशी ऋचा आढळून येते. आमच्या सर्व ग्रंथांतरीं या कल्पनेचाच प्रादुर्भाव झालेला आहे. कोणीही स्वतः समरूप अशी इष्ट देवता शोधून काढिली तर केवळ त्यास्तव करितां त्याचा हिंदुस्थानांत छळ झाल्याचें एक तरी उदाहरण घडून आलें आहे काय? एखादा मनुष्य सामाजिक नियमांचें उल्लंघन करीत नसेल, तर संशयवादी अथवा निरीश्वरवादीही होण्यास त्यास परवानगी असे. समाजाचे नियम कोणी मोडले तर त्याला शासन करून आपली नापसंती समाज दर्शवूं शकेल;

पण अत्यंत खालच्या दर्जाच्या पतितालाही मोक्षापासून तो दूर ठेऊं शकणार नाहीं. याकरितां समाजशासन आणि धर्ममार्ग यांत असलेला फरक आपण नित्य लक्ष्यांत ठेविला पाहिजे. समाजाचे नियम चमत्कारिक असतात. उदाहरणार्थ मलबारांत ज्या रस्त्यावरून एखादा ब्राह्मण जातो, त्याच रस्त्यावरून चांडाळाला फिरूं देत नाहींत; पण तोच चांडाळ मुसलमान किंवा ख्रिस्ती झाला तर त्याला कुठेंही जाण्यास परवानगी मिळते. हिंदुराजांच्या अमदानींत कित्येक शतकेंपर्यंत हा नियम पाळला जात असे. तुह्मांस ही गोष्ट कदाचित् चमत्कारिक वाटेल, पण या विचित्र प्रकारांतसुद्धां परकीयांच्या धर्माबद्दल आमच्या मनांत किती सहिष्णुता आहे हें येथें आढळून येतें.

आमच्या सर्व धर्मपंथांत एकच कल्पना प्रामुख्यानें आढळून येते. ती कल्पना ह्मणजे चालू आयुष्यांत मुक्ति मिळविणें ही होय. ही कल्पना विषद करण्याकरतां आमच्या ऋषींनीं संस्कृतांतील सारें शब्दभांडार पालथें घातलें आहे. जगांतील इतर कोणत्याही धर्मापासून आमच्या धर्माची जी भिन्नता दिसून येते, ती येथेंच. अद्वैतमत याही कल्पनेपुढें गेलें आहे. " परमेश्वराला जाणणें ह्मणजे परमेश्वरस्वरूप होणेंच, " असें अद्वैतानें ह्मटलें आहे, तें बरोबर आहे.

" ज्यानें ब्रह्म जाणलें तो स्वतःच ब्रह्म होतो. त्याचे शब्द म्हणजे श्रुतीच होत. अज्ञानांधःकाराला नाहींसें करण्याचें सामर्थ्य त्यांत असतें. आपले शब्द त्यानें संस्कृतांत उच्चारले अथवा सामान्य लोकांच्या भाषेंत उच्चारले तरी त्यांतील सामर्थ्यांत फेर पडत नाहीं." हा सिद्धांत आमच्या धर्मांत आरंभापासून आजपर्यंत एकसारखाच प्रणीत केल्याचें आढळून येतें. वेदांतील ऋषींनीं, विदुरानें, धर्म व्याधानें आणि दादुपंथीय निश्चलदासानें हेंच सांगितलें आहे. या सिद्धांताबद्दल सर्वांची सारखीच एकवाक्यता आहे.

परमेश्वराला ओळखणें अथवा स्वतः परमात्मरूप होणें, हेंच साऱ्या श्रुतिसिद्धांतांचें अखेरचें सार आहे. याहून अन्यमतांचें प्रतिपादन जेथें जेथें आढळून येतें, तेथें तेथें फक्त मधल्या पायऱ्यांचें वर्णन केलें आहे असें समजावें. श्रीव्यासांच्या सिद्धांतांचें उत्कृष्ट स्पष्टीकरण भगवान् भाष्यकार शंकराचार्य यांनीं केलें आहे.

केवळ निरपेक्ष दृष्टीनें पाहतां ब्रह्म हेंच अखरचें सत्य आहे; आणि सापेक्ष दृष्टीनें त्याच ब्रह्माचीं परिस्थित्यनुरूप झालेलीं अनेक रूपें ह्मणजे अनेक धर्म व अनेक पंथ हेही खरे आहेत. अमुक धर्म खरा आणि अमुक खोटा असा भेद त्यांत करतां येत नाहीं. फार झालें तर एक थोडा खालच्या प्रतीचा आणि दुसरा वरिष्ठ इतकाच भेद करतां येईल. एखादा मनुष्य सूर्याकडे जाण्यास निघाला आहे, अशी आपण कल्पना करूं. अशा स्थितींत प्रत्येक क्षणीं सूर्याचें स्वरूप पालटत असल्याचें त्याच्या अनुभवास येईल. सूर्य एका लहानशा गोळ्याएवढा आहे असें त्यास दिसेल, आणि जों जों त्याचें अंतर कमी होत जाईल, तों तों सूर्य अधिक मोठा होत जात आहे, असेंही त्याला आढळून येईल. अशा रीतीनें अखेरच्या मुक्कामास पोहोंचे-पर्यंत सूर्याचीं अनेक रूपें त्याच्या प्रतितीस येतील. आतां वास्तविक विचार करतां सूर्य हा लहानशा गोळ्याएवढाही नव्हता अथवा अनेक निरनिराळ्या परिमाणांचाही नव्हता. वास्तविक त्याचें खरें स्वरूप एकच होतें. असें असतांही तो एकच सूर्य त्या प्रवाशाला निरनिराळा दिसत होता हें खरें नव्हे काय ? अशाच रीतीनें सारे धर्म आणि सारे पंथ हेही खरे आहेत. यांपैकीं कांहीं खऱ्या सूर्यापासून लांब असून कांहीं त्याच्याजवळ आहेत. हा खरा सूर्य ह्मणजे '**एकमेवाद्वितीयम्**' हाच.

ज्या अर्थी '**एकमेवाद्वितीयम्**' हें अखरचें सत्य फक्त श्रुतीच शिक-वितात आणि ज्या अर्थी श्रुती सर्व लोकांच्या हितासाठीं साधकाला हातीं धरून पायरीपायरीनें त्याला अखेरच्या सत्याकडे नेतात आणि ज्या अर्थी इतर सारे धर्म हे फक्त या पायऱ्यांसारखे आहेत, त्या अर्थी जगांतील साऱ्या धर्मांचा आणि पंथांचा अंतर्भाव श्रुतिगत सनातनधर्मांत होतो.

शेंकडों जन्म घेऊन आपण अभ्यास केला अथवा युगानुयुगें आपल्या मनाचा कोनाकोंपरा आपण धुंडाळून काढला, तरी सनातनधर्मांत पूर्वी नसलेलें असें एकही तत्त्व आपणास शोधून काढतां यावयाचें नाहीं. आमचा सनानतधर्म हा धर्मतत्त्वांचें अनादि भांडार आहे.

मूर्तिपूजेबद्दल विचार करतां आपणांस असेंच आढळून येईल. मूर्तिपूजक जेव्हां पूजा करीत असतात, तेव्हां तेथें जाऊन त्यांच्या पूजनाचा प्रकार तुह्मी नीट पहा. त्या ठिकाणीं ते देवळाची पूजा करतात, कीं मूर्तीची करि-

तात, कीं स्वतःच्या देहाची करतात हें पहा. ते काय करितात, याचें सूक्ष्म अवलोकन प्रथम करा. मूर्तिपूजकांस लाखोली वाहणारे लोक या बाबतींत खरोखर कधीं विचारच करीत नाहींत. असें सूक्ष्म अवलोकन तुह्मीं केलें तर वेदान्ततत्त्वदृष्ट्या मूर्तिपूजेंत खरोखर काय रहस्य आहे याचा उलगडा तुह्मांस होईल.

असें आहे तथापि हीं कर्में आवश्यकच आहेत असें नाहीं. उलटपक्षीं प्रत्येक वृद्धानें चतुर्थाश्रम घेतला पाहिजे, असें मनुवचन तुह्मांस आढळून येईल. वृद्धपणीं चतुर्थाश्रमाचा स्वीकार कोणी केला अथवा न केला, तरी कर्मत्याग त्यानें केला पाहिजे असें मनुवचन आहे. ' **सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते** ' या श्रुतीप्रमाणें ज्ञानांत सर्व कर्मांची समाप्ति होते हें उघड दिसून येतें.

धर्मज्ञानासंबंधीं पाहतां एखाद्या हिंदु शेतकऱ्याला जें धर्माचें ज्ञान असतें, तितकें इतर देशांतील एखाद्या सुशिक्षित गृहस्थासही असत नाहीं. माझ्या धर्मावरील व्याख्यानांत मी युरोपीय भाषेंतील शब्दांचा उपयोग करतों, याबद्दल एका स्नेह्यानें मजवर टीका केली आहे. संस्कृत शब्दांचा उपयोग मला करतां आला असता, तर मला खरोखर आनंदच झाला असता. धर्मविचारांतील पूर्ण रहस्यें जशीं संस्कृत शब्दांनीं व्यक्त होतात, तशीं इतर कोणत्याही भाषेंतील शब्दांनीं तीं व्यक्त होत नाहींत. यामुळें संस्कृत शब्दांचा उपयोग करणें अधिक सोपें असतें; पण माझीं व्याख्यानें पाश्चात्यांपुढें झालीं, ही गोष्ट ह्या टीकाकाराच्या लक्ष्यांत राहिली नाहीं. हिंदुलोक संस्कृत भाषा पूर्णपणें विसरले असून मिशनऱ्यांच्यामुळें तिला पुन्हां ऊर्जितावस्था येत आहे, असें एका हिंदी मिशनऱ्यानें ह्मटलें होतें; पण मला पश्चिमेकडे भेटलेल्या हजारों मिशनऱ्यांत संस्कृताचा एखादा शब्द तरी जाणणारा एकही मिशनरी मला भेटला नाहीं; आणि अशाच प्रकारचे मिशनरी लोक वेद, वेदान्त आणि हिंदुधर्मासंबंधाचे इतर ग्रंथ यांजवर मनमुराद टीका करीत असतात !

एखाद्या विशिष्ट धर्माविरुद्ध मी आहें असें कोणी ह्मणत असेल, तर ही गोष्ट खरी नाहीं. तसेंच हिंदुस्थानांतील ख्रिस्ती मिशनऱ्यांस मी शत्रूसारखे

लेखतों हें ह्मणणेंही सर्वथा खोटें आहे; पण, अमेरिकेंत पैसा मिळविण्यासाठीं ज्या युक्त्या ते योजतात त्यांच्या विरुद्ध मात्र मी आहें.

हिंदुलोक आपलीं मुलें गंगेंतील मुसरींपुढें टाकीत आहेत, अशीं चित्रें शाळांतील क्रमिक पुस्तकांतून ते काढीत असतात. या चित्रांचा अर्थ काय? तसेंच एखादा पुरुष आपल्या बायकोला जिवंत जाळीत आहे, अशींही चित्रें तिकडे नजरेस पडतात पैसा मिळविण्याच्या या साऱ्या युक्त्या आहेत. मोठमोठ्या रथाखालीं माणसें चिरडत आहेत, अशींही चित्रें काढलेलीं आढळतात. अमेरिकेंतील मुलांसाठीं एक पुस्तक नुक्तेंच प्रसिद्ध झालेलें आहे. त्यांत कलकत्त्याहून आलेल्या एका गृहस्थानें एक गोष्ट लिहिली आहे. कलकत्त्यांतील एका रस्त्यांत एक मोठा रथ कांहीं धर्मवेड्या लोकांस चिरडीत जात असल्याचें आपण पाहिलें, असें तो लिहितो. मेमफिस् येथें एका मिशनऱ्याचें झालेलें व्याख्यान मी ऐकलें. त्या वेळीं हिंदुस्थानांतील प्रत्येक खेड्यापाड्यांत लहान मुलांच्या हाडांनीं भरलेला एक तलाव असतो, असें तो ह्मणाला. हिंदु लोक दुष्ट आणि पाजी आहेत असें प्रत्येक ख्रिस्ती मुलाला हे ख्रिस्ताचे अनुयायी ह्मणविणारे सद्गृहस्थ शिकवीत असतात. हिंदूंनीं यांचें काय घोडें मारलें आहे न कळे. अमेरिकेंत ज्या रविवारच्या शाळा चालविल्या जातात, त्यांत जो कोणी ख्रिस्ती नसेल त्याचा आणि विशेषतः हिंदूंचा द्वेष करण्यास शिकविण्याकरितां तास नेमलेले असतात! अशा रीतीनें हिंदुस्थानांतील मिशनांचीं कामें चालण्याकरितां लागणारा पैसा येथें मिळविला जातो.

सत्याच्या प्रसारार्थ नसलें तरी स्वतःच्या मुलांच्या कल्याणार्थ ख्रिस्ती मिशनऱ्यांनीं या गोष्टी करण्याचें सोडून दिलें पाहिजे. अशा रीतीनें ज्या मुलांस शिक्षण मिळतें तीं मोठेपणीं निर्दय होतात, यांत कांहीं नवल आहे काय?

अनंत नरकयातनांचें जो अत्यंत भयंकर वर्णन करूं शकेल तोच येथील जुन्या ख्रिस्ती धर्मीयांच्या मतानें मोठा धर्मरक्षक ठरतो.

अमेरिकेंत धर्माचें पुनरुज्जीवन करण्याकरितां एक संस्था स्थापन झाली आहे. माझ्या एका मित्राची एक मोलकरीण या सभांना नित्य जात असे. या मोलकरणीला अखेरीस वेड्यांच्या इस्पितळांत पाठविण्याची पाळी आली.

नरकयातनांचीं वर्णनें नेहमीं नेहमीं ऐकून तिचें मस्तक फिरलें. खुद्द मद्रासेंत हिंदुधर्माविरुद्ध जीं चोपडीं प्रसिद्ध केलीं जातात तीं पहा. अशा प्रकारची एखादी ओळही एखाद्या हिंदूनें लिहिली तर मिशनरी लोक त्या हिंदूविरुद्ध आरडाओरड करून आकाशपाताळ एक करून सोडतील.

मद्देशबांधव हो, पाश्चात्य देशांत मी बराच काळ घालविला आहे. त्यांच्या समाजांतील कोनाकोंपरा मला ठाऊक झाला आहे. आमच्या हिंदुसमाजाची व त्यांची तुलना करून आतां मी असें स्पष्ट ह्मणतों कीं, मिशनऱ्यांच्या सांगण्याप्रमाणें हिंदुसमाज राक्षसांचा नाहीं, अथवा पाश्चात्यसमाज देवदूतांचाही नाहीं. आमच्या समाजांतील अनीति, बालहत्या आणि वैवाहिक चालीरीति यांजबद्दल मिशनरी लोक जितकी कमी चर्चा करतील तितकें बरें. मिशनरी लोकांनीं केवळ आपल्या कल्पनेनें हिंदुसमाजाचें जें भयंकर चित्र रंगविलें असेल त्या चित्रालाही मागें टाकणारे देश अस्तित्वांत असतील. लोकांस शिव्या देत सुटावें, हा माझ्या जीवित्वाचा हेतु नाहीं. हिंदुसमाज सर्वांगांनीं परिपूर्ण आहे असें माझें ह्मणणें नाहीं. त्यांत जे कांहीं दोष आहेत अथवा कित्येक शतकांच्या दुर्दैवी परिस्थितीमुळें ज्या दुष्ट चाली उत्पन्न झाल्या आहेत त्याही मला समजतात. आमचे मित्र ह्मणविणारे परकीय लोक खऱ्या सहानुकंपेनें आह्मांस केवळ मदत करण्याकरितां येथें येत असतील आणि आमच्या समाजामध्यें उलथापालथ करण्याचा त्यांचा हेतु नसेल तर त्यांना परमेश्वराचा खास आशिर्वाद मिळेल; पण वेळीं अवेळीं हिंदूंच्या बोडक्यावर शिव्यांचें ओझें लादावें आणि त्यायोगें स्वतःच्या राष्ट्राची श्रेष्ठता स्थापन करावी असा त्यांचा हेतू असेल, तर स्पष्टपणें मीं त्यांस असें बजावितों कीं, हिंदूंची कोणत्याही राष्ट्राशीं न्यायानें तुलना केली, तर हिंदुराष्ट्र या बाबतींत सर्वांच्या आघाडीस आहे, असें निःसंशय निदर्शनास येईल.

हिंदुस्थानांत धर्माच्या पायांत केव्हांही शृंखला घालण्यांत आल्या नव्हत्या. कोणीही कोणतीही इष्ट देवता स्वीकारल्यास त्याला समाजाकडून त्रास पोंचत नसे. त्यानें कोणालाही गुरु केलें अथवा कोणत्याही पंथाचा स्वीकार केला, तरी तेवढ्यामुळें तो मनुष्य गर्हणीय मानला जात नसे. यामुळें हिंदुस्थानांत धर्माची जशी वाढ झाली, तशी ती दुसऱ्या कोणत्याही देशांत झाली नाहीं. उलटपक्षीं आचारांच्या बाजूनें पाहातां समाजाच्या पायांत जड शृंखला घाल-

ण्यांत आल्या होत्या. यामुळें हिंदुस्थानांतील समाजाची वाढ खुंटल्याचें दृष्टोत्पत्तीस येतें. स्वातंत्र्य हा उत्क्रांतीचा मूळ पाया आहे. स्वातंत्र्य नाहींसें झालें ह्मणजे वाढ आपोआपच बंद पडते.

पाश्चात्य देशांत याच्या उलट प्रकार दिसून येतो. तेथें समाजाला स्वातंत्र्य असून धर्म निगडित आहे. आंखून दिलेल्या बंधनांतच धर्मानें राहिलें पाहिजे, असा कटाक्ष युरोपांत आढळून येतो. यामुळें धर्मस्वातंत्र्याचे प्रयत्न तेथें जेव्हां जेव्हां झाले, तेव्हां तेव्हां तेथें रक्ताच्या नद्या वाहिल्या. समाज स्वतंत्र असल्यामुळें सामाजिक उत्क्रांति तेथें उत्कृष्ट प्रकारची आढळून येते; पण धर्म शृंखलाबद्ध राहिल्यामुळें केवळ जडवादापलीकडे त्याची उत्क्रांति झाली नाहीं. आतां तेथें ही स्थिति हळूहळू बदलूं पाहात आहे. मनुष्याचें धार्मिक जीवन वास्तविक कोणत्या स्वरूपाचें आहे, याचा विचार अलीकडील पाश्चात्य तत्त्ववेत्ते करूं लागले आहेत. जुन्या धर्मांत काय उणीवा आहेत, त्या त्यांच्या लक्ष्यांत आतां येऊं लागल्या आहेत. संस्कृत भाषेचा अभ्यास तिकडे ज्यांनीं केला आहे, त्यांना धर्मतत्त्वांची ओळख कोठून करून घ्यावयाची हें समजूं लागलें आहे.

त्याचप्रमाणें हिंदुस्थानांतही पूर्वीची घडी मोडली जाऊन नवी घडी बसविण्याचा उद्योग सुरू झाला आहे. जुनी सामाजिक रचना बदलली पाहिजे असें आम्हांस वाटूं लागलें आहे. गेल्या पन्नास साठ वर्षांत सुधारणा आणि समाजसुधारक यांस जणूंकाय ऊत आला आहे; पण अत्यंत दुःखाची गोष्ट ही कीं, यांपैकीं एकाच्याही कार्यास यश आलें नाहीं. याचें कारण असें कीं, या कार्याची खरी गुरुकिल्लीच त्यांस सांपडली नाहीं. या बाबतींत जो मोठा धडा त्यांनीं शिकावयास पाहिजे होता, तो ते शिकले नाहींत. समाजसुधारणेची जी घाई त्यांस झाली होती, त्या घाईत त्यांनीं सर्व उणिवांचें पातक धर्माच्या माथीं मारलें. एक अशी गोष्ट सांगतात कीं, एका राजाचें एक आवडतें माकड होतें. एके वेळीं राजा निजला असतां एक माशी त्याच्या तोंडावर बसून त्याला त्रास देऊं लागली. आपल्या आवडत्या धन्याला माशी त्रास देत आहे, हें पाहून त्या माकडाला फार राग आला. तेव्हां तिला ठार मारण्याकरितां जवळ पडलेली तरवार घेऊन त्यानें त्या माशीवर जोराचा प्रहार केला. त्या प्रहारामुळें माशी मारली गेली हें खरें, पण

त्यामुळेंच तो बिचारा राजाही गतप्राण झाला. आमच्या सुधारकाग्रणींच्या प्रयत्नांचा शेवटही असाच व्हावयाचा; परंतु हिंदुधर्माची इमारत अभेद्य पायावर रचली असल्यामुळें दगडावर डोकें आपटणारांसारखी त्यांची स्थिति झाली. त्यांच्या प्रयत्नानें हिंदुधर्म नामशेष तर झालाच नाहीं, पण सुधारणा मात्र नामशेष होण्याच्या पंथास लागली. तथापि ज्यांनीं केवळ परहित बुद्धीनें या प्रयत्नांस हात घातला, त्यांचीही धन्य होय असें म्हटलें पाहिजे. प्रयत्नांची दिशा चुकल्यामुळें अपयशाचा वांटा त्यांस पदरीं घ्यावा लागला. हा त्यांचा दोष नव्हे, पण या त्यांच्या प्रयत्नामुळें एक कार्य मात्र चांगलें झालें आहे हें कबूल केलें पाहिजे. त्यांनीं दिलेल्या प्रचंड तडाख्यामुळें आमचा हा भरतभूमीचा कुंभकर्ण महानिद्रेंतून जागा होऊं लागला. सुधारकांनीं केवळ विघटनेचे मात्र प्रयत्न केले. त्यांचे प्रयत्न संघटनात्मक नव्हते, यामुळें ते यशस्वी होण्यासारखेच नव्हते. याकरितांच त्यांस यश आलें नाहीं, ही नवलाची गोष्ट नव्हे.

तथापि त्यांनीं प्रयत्न केले, याबद्दल त्यांस आशीर्वाद देऊन त्यांच्या अनुभवाचा फायदा आतां आपण घेतला पाहिजे. प्रत्येक समाजाची वाढ अंतर्गत कारणानें होत असते, हें तत्त्व त्यांच्या लक्ष्यांत राहिलें नाहीं. केवळ बाह्य सुधारणा समाजाला चिकटविण्याचा यत्न त्यांनीं केला. समाजाच्या अंतर्गत तत्त्वांचें जें प्रत्यक्ष आविष्करण तीच खरी सुधारणा होय. जीं तत्त्वें समाजाच्या मनांत पूर्वकालपासून बिंबलीं असतील, तीं सारीं प्रत्यक्ष आचरणांत येणें याचेंच नांव सुधारणा. समाजाची वाढ याच तत्त्वावर अवलंबून आहे. बीज जमिनींत रुजत घातलें म्हणजे जमिनींतील पोषक रस शोषून घेऊन तें वृक्ष रूपानें वाढूं लागतें; पण या त्याच्या वाढींत त्याचा जो मूलस्वभाव असेल तो नष्ट होत नाहीं. पोषक रसांनीं त्याच्या मूलस्वभावाचा मात्र परिपोष होतो. मूलभाव बदलून त्या जागीं नवा भाव उत्पन्न होत नाहीं. वृक्षाच्या वाढीचें हें तत्त्व समाजाच्या वाढीसही पूर्णपणें लागू पडतें. याकरितां हिंदुसमाजाचें रूपांतर युरोपीय समाजांत करणें केव्हांही शक्य नाहीं. सर्व हिंदुसमाज नामशेष होऊन त्या जागीं एखादा बाहेरचा नवा समाज आला, तरच ही गोष्ट शक्य आहे. पण असें घडणें दुरापास्त आहे हें कोणासही सांगावयास नको. पाश्चात्य समाजाच्या वाढीसही हीच गोष्ट लागू आहे. तेथील समाजानें हिंदुसमाजासारखें बनावें

असा उद्योग आपण सुरू केला, तर त्यांतही आपणास निःसंशय अपयश येईल. भरतभूमि नामशेष होईल ही गोष्ट शक्य तरी आहे काय? जगांतील सर्व धर्मांची आणि नीतितत्त्वांची ही वृद्ध माता काळाच्या पोटांत कधींतरी गडप होईल काय? अनेक ऋषिवर्यांच्या पायांनीं पवित्र झालेली आणि जीवर प्रत्यक्ष परमेश्वराचे अवतार आजमितीसही वावरत आहेत, ती भूमि नष्ट होईल काय? मित्रहो! हातांत दिवा घेऊन मी तुमच्यापुढें सारें जग धुंडाळित चालतों. त्यांतील सर्व शहरें, खेडीं, मैदानें आणि अरण्यें आपण धुंडाळूंया. या शोधांत आमच्या देशांतील नररत्नांसारखें एक तरी रत्न तुह्मांस लाभतें कीं काय, तें पहा. फळावरून झाडाची परिक्षा होते अशी ह्मण आहे. एखाद्या आंब्याच्या झाडाखालीं जाऊन व खालीं पडलेलीं सडकीं व कच्चीं फळें पाहून तें झाड वाईट आहे असें ह्मणणें योग्य होईल काय? पक्व झालेला एखादा आंबा तोडून त्याची चव पहा ह्मणजे त्या वृक्षाची खरी योग्यता तुह्मांस कळून येईल. त्याचप्रमाणें हिंदु धर्मांचें खरें स्वरूप काय आहे याचें ज्ञान तुह्मांस करून घ्यावयाचें असेल, तर अशा प्रकारच्या अवतारी पुरुषांकडे पहा. जो वंशवृक्ष आज कित्येक शतकें वाढत आहे, त्याची खरी योग्यता या परिपक्व फलांवरून तुमच्या नजरेस येईल. हजारों वर्षें या वृक्षावरून कित्येक वादळें वाहून गेलीं आहेत; तथापि त्याच्या एका फांदीचाही भंग न होतां नव्या तारुण्याच्या उमेदीनें अद्यापिही तो ताठ उभा आहे.

भरतभूमि नामशेष होणार काय? तसें झालें तर जगांतून धर्मांचें उच्चाटन होईल, सर्व नीतितत्त्वांची परिपूर्ण अवस्था पुन्हां पाहण्यांत येणार नाहीं, धर्मांबद्दलचें सारें औत्सुक्य विलयास जाईल, अत्युच्च कल्पनातरंग विराम पावतील आणि यांच्या जागीं चैन आणि विषयासक्ति व पैशाची हांव यांचें साम्राज्य होईल. जगांत लुच्चेगिरी, चढाओढ आणि बळजबरी यांचा सुळसुळाट होईल. या सर्वांनीं मिळून पेटविलेल्या होमकुंडांत मानवी आत्म्याची अखेरची आहुती पडेल. याकरितां भरतभूमि नष्ट होणें ही गोष्ट शक्यच नाहीं. आज अनेक प्रकारचीं दुःखें आह्मी भोगीत आहों, तथापि सहनशीलतेमुळें उत्पन्न होणारी शक्ति कर्तृत्वशक्तीपेक्षां अधिक प्रबळ असते, ही गोष्ट लक्ष्यांत ठेविली पाहिजे. द्वेषप्रेरित शक्तीहून प्रेमप्रेरित शक्तींत अधिक

जीवटपणा असतो. हिंदुधर्माच्या उद्धारासाठीं सुरू झालेली चळवळ ही केवळ एकदेशी प्रेमामुळें सुरू झाली आहे असें कोणास वाटत असेल तर तो त्यांचा भ्रम आहे.

या देखाव्याचें वास्तविक स्वरूप काय आहे, याचा विचार आतां आपण करूं

अर्वाचीन भौतिक शास्त्रांच्या शोधांमुळें पाश्चात्य धर्मांच्या किल्ल्याचे बुरूज धडाधड ढांसळून पडत आहेत. केवळ विश्वासाच्या पायावर रचलेली धर्माची इमारत अर्वाचीन शास्त्रांच्या घणाखालीं कांचेसारखी चुरडली जात आहे. अर्वाचीन विचारक्रांतीच्या तडाक्यांत सांपडलेलें पाश्चात्य तत्त्वज्ञान स्वसंरक्षणार्थ धांवपळ करीत आहे. प्राचीन धर्मग्रंथांतील सूत्रांची व अर्वाचीन विचारांची एकवाक्यता करतां करतां पाश्चात्य धर्मप्रचारकांच्या नाकींनव येत आहेत. कित्येक प्राचीन पाश्चात्य धर्मतत्त्वांची मोडतोड होऊन ती अडगळीच्या सांदीकोंपऱ्यांत पडली आहे. पाश्चात्य जनता स्वतःच्या धर्मापासून भराभर पराङ्मुख होत आहे, तिचे पाय सांप्रत कोणत्याही धर्मभूमीला स्थिरावेनासे झाले आहेत. पश्चिमेकडे अशा प्रकारची अंदाधुंदी चालू असतां श्रुतिप्रामाण्याच्या पायावर रचलेले हिंदु आणि बौद्ध हे धर्म पुन्हां जिवंत होऊं पाहात आहेत व नव्या जोमानें पुढें सरसावत आहेत, हें आश्चर्य नव्हे काय? स्वतःच्या धर्मसमुद्रांतून इतस्ततः वाहात जाणाऱ्या पाश्चात्य संशयवाद्याला अथवा नास्तिकाला गीता आणि धम्मपद यांच्या बंदरांत सुरक्षित स्थान सांपडत आहे.

पूर्वीचा मनु आतां पूर्णपणें उलट होऊं पहात आहे. शत्रूच्या हातांनीं आपल्या धर्मगृहावर ठेवलेल्या विस्तवानें तें धडाडून पेटत असल्याचा देखावा साश्रु नयनांनीं पहाण्याचें खडतर नशीब एका काळीं हिंदूंस प्राप्त झालें होतें; पण आतां अर्वाचीन शास्त्रांच्या तीव्र उजेडानें सर्व धूर नाहींसा झाल्यावर आपलें घर पूर्णपणें शाबूत आहे व बाकीच्या साऱ्या इमारती भस्मसात् होऊन गेल्या असून त्यांच्या जागीं आपल्याच घराच्या धर्तीवर बांधल्या जाणाऱ्या नव्या इमारती त्यांस दिसूं लागल्या आहेत. आपल्या डोळ्यांतील अश्रु पुसून टाकल्यावर त्यांस असें आढळून आलें कीं, आपल्या धर्मवृक्षावर पडूं पाहणारी कुऱ्हाड नाहींशी झाली असून तिच्याजागीं दुःखाचें उच्चाटन करणारा शास्त्रवैद्याचा चाकू मात्र अवतरला आहे.

प्राचीन धर्मसूत्रांची व अर्वाचीन विचारांची एकवाक्यता करण्यासाठीं प्राचीन सूत्रांच्या अर्थांची ओढाताण करण्याचें कारण नाहीं असें आह्मांस आढळून आलें आहे. आमच्या धर्ममार्गांत ज्या कांहीं उणीवा दिसून येत आहेत, त्या मुद्दामच राखल्या गेल्या आहेत असें आह्मांस आतां आढळून आलें आहे. अप्रगल्भ बुद्धीच्या लोकांस उच्चतम गोष्टींचें ज्ञान करून द्याव-याचें ह्मटलें तर अप्रगल्भ गोष्टींपासूनच आरंभ करून क्रमाक्रमानें त्यांस अधिकाधिक उच्च दिशेकडे नेलें पाहिजे हें उघड आहे. येथें अरुंधती दर्शन-न्यायच लागू पडतो. अरुंधतीच्या सूक्ष्म ताऱ्याचें दर्शन करून देण्याकरितां आजूबाजूचे मोठे तारे प्रथम दाखवून नंतर अरुंधतीचा सूक्ष्म तारा दाख-विणें हा योग्य मार्ग नव्हे काय ? ज्या परमश्रेष्ठ ऋषिवर्यांनीं अशा प्रकारचा सर्वांस उपयुक्त होणारा धर्ममार्ग निवडून काढला, त्यांनीं अखिल मानव-जातीवर केवढा उपकार केला आहे बरें ? जड सृष्टीच्या अभ्यासानें जीं जीं तत्त्वें आपणास अवगत होतात, अथवा जीं पुढें अवगत होतील त्या साऱ्यांचा अंतर्भाव त्यांनीं आपल्या धर्ममार्गांत केला आहे. जे अर्वाचीन नवे शोध पाश्चात्य धर्मांच्या हानीस कारण झाले, ते वस्तुतः अगदीं नवे नसून आमचे जुने शोध आतां नव्या रूपानें मात्र प्रकट होत आहेत, असें आढळून येत आहे. समाधिस्थितींत आमच्या पूज्य पूर्वजांनीं जे शोध केवळ इच्छामात्रें केले, तेच शोध बुद्धीच्या आणि जड इंद्रियांच्या ज्ञानाच्या बळावर सांप्रत नवा जन्म घेत आहेत.

याकरितां आमच्या जुन्या वस्तूंपैकीं एकीचाही त्याग करण्याचें कारण आह्मांस नाहीं. अथवा नव्या वस्तूसाठीं आह्मांस जगभर भटकावयासही नको. जो प्राचीन ठेवा पूर्वपरंपरेच्या वारसदारीच्या हक्कानें आह्मांस प्राप्त झाला आहे, त्यांतील थोड्याशाही अंशाचा उपयोग आह्मी केला तर आमच्या सर्व गरजा भागतील. सांप्रतची चळवळ याच दिशेनें सुरू आहे. हिंदू-धर्माचें स्वरूप पुन्हां उज्ज्वल होऊं पहात आहे. त्याचें खरें कारण हेंच. ही चळवळ आतां मागें न पडतां यापुढें अधिकाधिक बळावत मात्र जाईल यांत संशय नाहीं.

बंगाल्यांतील तरुणांनों, विशेषेंकरून तुह्मांलाच माझी एक विनंती आहे. प्रियबंधूंनो, हिंदुस्थानांत ज्या अनेक अनिष्ट गोष्टींचा आज प्रवेश झाला आहे,

त्यांचें मूळ कारण आपणच आहों, ही गोष्ट मोठ्या दु:खानें पण खुल्या अंत:करणानें कबूल करणें आपणास भाग आहे. परकीय लोक हिंदुस्थानांतील सर्व जातींवर अनेक प्रकारचे खरे अथवा खोटे आरोप करीत आहेत; पण असें होण्यास आपणा बंगाली लोकांचें वर्तनच कारणीभूत झालें आहे, ही गोष्ट कबूल करण्यावांचून आपणास गत्यंतर नाहीं. असो; झालें तें होऊन गेलें. आतां ही चूक आपल्या लक्ष्यांत येऊं लागली आहे, ही परमेश्वराची मोठी कृपाच होय. यापुढें केवळ स्वत:चीच शुद्धि करून स्वस्थ न बसतां सनातनधर्मानें दर्शित केलेल्या अत्युच्चपदीं हिंदुस्थानांतील इतर जातींनींही आरूढ व्हावें याकरितां आपण त्यांस मदत करूं या. हें साध्य होण्याकरितां प्रथम मत्सराचा नि:पात केला पाहिजे. गुलामगिरींत लोळत पडलेल्या मानवकुलाच्या नशिबीं मत्सर कायमचाच लिहिलेला असतो; पण तो नामशेष करण्यास आपण आपल्या कंबरा बांधल्या पाहिजेत. कोणाचाही मत्सर करावयाचा नाहीं असा दृढ निश्चय करा. आपल्या बऱ्यासाठीं जो कोणी यत्न करीत असेल, त्याला आपणाकडून होईल तितकी मदत करा. प्रत्यक्ष हातानें मदत करणें आपल्या नशिबीं नसेल, तर उत्तम विचारांच्या आंदोलनांनीं तरी जगत्रयांतील सर्व प्राण्यांस आपण मदत करावी.

आपल्या धर्मांत जें एक सनातन सत्य सांगितलें आहे त्याच्याच पायावर आपण आपली भावी इमारत उठविली पाहिजे. या तत्त्वावर हिंदू, बौद्ध आणि जैन या सर्वांचा सारखाच वारसा आहे. तें तत्त्व म्हणजे 'आत्मा सर्वत्र सारखा आहे' हें होय. अमर्त्य, सर्वव्यापी आणि अनंत असें आत्म्याचें स्वरूप आहे. याच्या दिव्य प्रभेचें वर्णन श्रुतींनाही करतां आलें नाहीं. ज्याच्या तेजापुढें लक्ष्यावधि सूर्य आणि कोट्यवधि तारे हे केवळ काजव्यासारखे भासतात, अशा स्वरूपाचा हा आत्मा आहे. प्रत्येक स्त्रीपुरुषांतच काय, पण अत्युच्च देवाधिदेवापासून तों गटारांतील किड्यापर्यंत हाच आत्मा सर्वत्र व्यापून राहिला आहे. त्याच्या व्याप्तींत जो फरक आढळतो तो गुणधर्ममूलक नसून परिमाणमूलक मात्र असतो.

या आत्म्याच्या ठिकाणीं असलेल्या शक्तीचा उपयोग जड वस्तूंच्या संघटनेसाठीं केला तर जड उत्क्रांति उत्पन्न होते. याचा उपयोग बुद्धीच्या

ठिकाणीं केला तर बुद्धितेजाची वाढ होते; आणि तो त्याच्या स्वतःच्याच ठिकाणीं केला तर तोच आत्मा स्वतः परमात्मरूप बनतो.

याकरितां आपण स्वतः परमात्मरूप बनून इतरांस परमात्मरूप बनण्यांत मदत केली पाहिजे. प्रथम स्वतः परमेश्वर व्हा आणि नंतर इतरांस मदत करण्यास पुढें सरा. प्रत्येक मनुष्य परमात्मरूप आहे हें तत्त्व आपण आपल्या चित्तावर ठसविलें पाहिजे. अमुक मनुष्य पापी आहे असें कधींही ह्मणूं नका. तूं परमेश्वरस्वरूप आहेस असेंच प्रत्येकाला सांगत जा. सैतान ह्मणून कोणी या जगांत खरोखर असेल तर त्याच्या अस्तित्वाची आठवणही होऊं न देतां परमेश्वराचा वास सर्वत्र आहे, असेंच आपण सदोदित पठण करीत राहिलें पाहिजे.

खोलींत अंधार असेल तर ‘ अंधार आहे ’ ‘ अंधार आहे ’ असा नुसता जप करून तेथें उजेड मिळणार नाहीं. उजेड तेथें उत्पन्न केला पाहिजे. आपणावर कोणी कितीही निषेधात्मक टीका केली तरी कालेंकरून तिचा मागमूसही नाहींसा होईल; पण आपण जें कांहीं प्रत्यक्ष करूं आणि जी इमारत आपल्या श्रमांनीं उठवूं ती मात्र चिरकाल राहील. तिचा नाश कशानेंही होणार नाहीं. ‘ **शिवोऽहं** ’ ‘ **शिवोऽहं** ’ याच उच्चाराचा वास तुमच्या जिव्हाग्रीं सदोदित असूंद्या. हा उच्चार तोंडानें सदोदित करीत राहून मग कोणत्याही कार्यास हात घाला. मी जडरूप नसून शिवरूप आहें हें चिंतन कधींही विसरूं नका. श्रुतींनीं हेंच सनातन तत्त्व प्रतिपादिलें आहे. अंधाऱ्या खोलींत दिवा पेटविल्याबरोबर अंधार आपोआपच नाहींसा होतो. तो नाहींसा करण्यासाठीं कांहीं निराळी खटपट करावी लागत नाहीं. वेदान्तसिंहाची गर्जना पातालापासून आकाशापर्यंत पोहोंचेशी करा. अशी सिंहगर्जना झाली ह्मणजे कोल्हींकुत्रीं आपोआपच बिळांचा आश्रय करूं लागतील. वेदांततत्त्वांचा प्रसार करावयाचा इतकेंच आपलें कर्तव्य आहे. तें आपण केलें ह्मणजे भावी परिणामाची काळजी करण्याचें कारण आपणांस नाहीं. फक्त मिश्रण योग्य रितीनें तयार करून ठेविलें ह्मणजे त्यांतील क्रिया आपोआपच अंतिम परिणामाकडे जाऊं लागतात. आत्म्याच्या ठिकाणीं असणारें सामर्थ्य साऱ्या भरतभूमीवर वावरूं लागेलसें तुह्मीं केलें ह्मणजे त्याचा निश्चित परिणाम आपोआपच घडून येईल.

स्वत:च्या उच्च पदावरून ढांसळून जाऊन तुह्मीं इतस्तत: भटकूं लागल्यामुळें सर्वत्र गोंधळ माजल्याचा भास तुह्मांस होत आहे. तुह्मीं आपल्या योग्य पदावर आरूढ झालां ह्मणजे बाकीच्या गोष्टी आपोआपच योग्य रीतीनें तुह्मांभोंवतीं गोळा होतील. इंद्र आणि विरोचन यांच्या कथेंतील तत्त्व ध्यानांत आणा. "तूं परमेश्वरस्वरूप आहेस." असा उपदेश त्यांच्या गुरूनें त्या दोघांस सारखाच केला; पण विरोचन असुर असल्यामुळें तूं ह्मणजे देह अशी त्याची कल्पना झाली; आणि देहाचें चिन्तन करतां करतां तो अध:पतन पावला. उलट, इंद्र हा दैवी संपत्तीनें युक्त असल्यामुळें 'तूं' ह्मणजे आत्मा ही गोष्ट त्याच्या ध्यानीं आली. तुह्मीं सर्व इंद्राचीं मुलें आहां. तुमची उत्पत्ति देवापासून झाली आहे. जड अथवा आसुरीसंपत्तीचा अंमल तुह्मांवर कधींही चालणार नाहीं. तुह्मीं देहाचे दास कधींही बनणार नाहीं.

हिंदुस्थानाला ऊर्जितदशा अवश्य येईल, पण ती जड सामर्थ्यानें येणारी नसून दैवी सामर्थ्यानें येणारी आहे. या घडामोडींत नाशाचा झेंडा आघाडीस दिसून येणार नाहीं; पण आमच्या उन्नतीच्या झेंड्यावर शांतता आणि प्रेम यांचेंच चिन्ह सांपडेल. संन्याशाचा पोशाख हाच आमच्या भावी उन्नतीचा झेंडा असेल. संपत्तीच्या शक्तीनें नव्हे तर भिक्षा मागण्याच्या तुंब्याच्या सामर्थ्यानें आमची उन्नति होणार आहे. आपण अशक्त आहों, दुर्बल आहों असा विचार चित्तास कधीं शिवूंही देऊं नका. आत्मा सर्वशक्तिमान् आहे हें कधींही विसरूं नका. भगवान् श्रीरामकृष्णांच्या पादस्पर्शानें पवित्र झालेल्या मूठभर तरुणांकडे पहा. सिंधपासून आसामापर्यंत आणि हिमाचलापासून कन्याकुमारीपर्यंत श्रीरामकृष्णांचा संदेश ते पोंहचवीत आहेत. हिमालयांतील वीसबावीस हजार फूट उंचीचीं हिमाच्छादित शिखरें अनवाणी तुडवून तिबेटांत त्यांनीं प्रवेश केला. हा सारा प्रवास त्यांनीं केवळ भिक्षा मागून संपविला. त्यांनीं आंगावर फाटक्या चिंध्या धारण केल्या होत्या. पोलिसांचें शुक्लकाष्ट त्यांच्यामागें नित्य असे. कित्येक वेळां त्यांस कारागृहवासही भोगावा लागला आहे; पण त्यांच्यासंबंधीं सरकारची अखेर खात्री झाली आणि अखेरीस ते मुक्त झाले.

असे शिष्य आज फक्त वीस आहेत. उद्यांला हा आंकडा दोन हजार झाला पाहिजे. बंगाली तरुणांनों, तुमच्या देशाकरितां एवढ्या त्यागाची

आवश्यकता आहे. तुमच्या देशालाच काय, पण साऱ्या जगाला या गोष्टीची आवश्यकता आहे. स्वतःच्या ठिकाणचें आत्मतेज तुह्मीं जागृत करा ह्मणजे क्षुधा, तृषा व शीतोष्ण यांची बाधा तुह्मांस होणार नाहीं. चैनीच्या वस्तूंनीं भरपूर सजविलेल्या बंगल्यांत बसावें, चैनीच्या वस्तूंचा जंगी संग्रह करावा आणि फावल्यास एकादें लहानसें धार्मिक कृत्य करावें, ही गोष्ट इतर देशांतील लोकांस शोभण्यासारखी आहे; पण हिंदुस्थानच्या लोकांस मात्र ती शोभण्यासारखी नाहीं. अशा थाटानें धर्मप्रचारकाचें काम येथें करूं लागलां तर त्याची डाळ मुळींच शिजावयाची नाहीं. खरा धर्मप्रचारक कोण हें समजण्याची उपजतबुद्धि हिंदुलोकांपाशीं आहे. याकरितां चैनीनें धर्मप्रसार होईल, ही आशाच तुह्मी सोडा. त्यागावांचून कोणतेंही मोठें कार्य कधींही यशस्वी झालेलें नाहीं. हें जग उत्पन्न करण्यासाठीं आदिपुरुषाला स्वतःचाच होम करावा लागला आहे. याकरितां स्वतःच्या चैनी, स्वतःचीं सुखें आणि स्वतःची कीर्ति याविषयींच्या साऱ्या कल्पनांस आतां रजा द्या. फार काय, पण प्रसंगीं जीवही बाजूस ठेवण्याची तयारी तुह्मी केली पाहिजे. अशा अनेक सेवकांचा तुह्मी एक प्रचंड पूल तयार करा ह्मणजे या संसारसमुद्रांतून कोट्यवधि जीव त्यावरून पार होऊन जातील. आपली जात, धर्म, वर्ण इत्यादिकांचा यत्किंचितही विचार चित्तांत आणूं नका. तुमच्यांत कोणी हिरवे, निळे आणि तांबडे असले, तरी हे सारे रंग एकजीव झाले ह्मणजे त्यांतून अत्यंत दीप्तिमान् असा प्रेमाचा शुभ्रवर्ण प्रगट होईल. **'कर्मण्येवाधिकारस्ते'** ही भगवंताची आज्ञा नित्य लक्षांत बाळगून भावी फलासंबंधीं विचार करण्याचें आपण सोडून दिलें पाहिजे. तुह्मी स्वतः परमेश्वरस्वरूपाकडे जात असतां, समाजरचनेंतील सांखळीचा एखादा दुवा तुमच्या आड आला, तर तुमच्या आध्यात्मिक शक्तीनें त्याचा चुरा होऊन जाईल. भविष्यत्कालीं काय घडणार आहे, हें जाणण्याचें सामर्थ्य मला नाहीं आणि त्याची पर्वाही मी करीत नाहीं; पण आमची वृद्ध माता पूर्वींच्याहून अधिक तेजानें विलसत असून आपल्या उच्च पदीं पुन्हां आरूढ झाली आहे, हा देखावा मात्र माझ्या दृष्टीपुढें ढळढळीत दिसत आहे. तिनें दिलेला शांतिसौख्याचा आशीर्वाद सर्व जगास पाहोंचविण्याचें काम तुमचें आहे.

**—विवेकानंद.**

# हिंदुसमाजरचनेंत वेदान्ताचा प्रत्यक्ष उपयोग.

आमचा वंश आणि आमचा धर्म यांचा निदर्शक असा 'हिंदु' हा शब्द आतां सर्वत्र रूढ झाला आहे. प्राचीन काळच्या इराणी लोकांनीं सिंधुनदाला हिंदु असें नांव दिलें होतें. संस्कृतांत कोठेंही ' स ' कार आला म्हणजे फारशी भाषेंत त्याचें रूपांतर ' ह ' कारांत होत असे. अशा रीतीनें ' सिंधु ' या शब्दाचें रूपांतर ' हिंदु ' या शब्दांत झालें. प्राचीन ग्रीक लोकांना ' ह ' काराचा उच्चार करणें कठीण जात असल्यामुळें त्यांनीं ' हिंदु ' याचें रूपांतर इंडियन् असें केलें. सिंधुनदाच्या परतीरीं रहाणाऱ्या लोकांस इराणी लोकांनीं प्राचीन काळीं हिंदु असें नांव दिलें होतें; पण हें नांव कोणत्याही विशिष्ट मानव-कुलास त्यांनीं त्या काळीं दिलें असलें, तरी त्याचें महत्व सांप्रत कांहीं उरलें नाहीं. कारण, या प्रदेशांतील प्रजेंत हिंदु, मुसलमान, पारशी, ख्रिस्ती बौद्ध आणि जैन इत्यादि अनेक धर्मीयांचा समावेश होतो. हिंदु या शब्दांत आतां इतक्या धर्मांचा समावेश झाला पाहिजे. तथापि केवळ धर्मांच्या नांवा-संबंधीं विचार करतां या शब्दांत खऱ्या हिंदूंखेरीज बाकीच्यांस हिंदु या नांवानें संबोधणें युक्त होणार नाहीं. याकरितां एकाच शब्दांत आम्हां सर्व धर्मीयांचा समावेश होईल असें सामान्य नाम शोधून काढणें फार कठीण आहे. वास्तविक हिंदुधर्मांत इतक्या अनेक धर्मांचा, अनेक कल्पनांचा, अनेक हव्यकव्यांचा आणि इतक्या अनेक पंथांचा समावेश झाला आहे कीं, त्या सर्वांस मिळून एकच नांव शोधून काढणें कठीण आहे. आमच्यांतील अनेक पंथांची एकवाक्यता फक्त एका सिद्धांताबद्दल मात्र आहे. तो सिद्धांत श्रुतिप्रामाण्य हा होय. श्रुतिग्रंथ सर्व पंथांस सारखेच पूज्य आहेत. जो कोणी श्रुतिप्रामाण्य मानणार नाहीं, त्याला हिंदु म्हणवून घेण्यास अधिकार नाहीं असें म्हटलें तरी अयुक्त होणार नाहीं.

श्रुतिग्रंथांत कर्मकांड आणि ज्ञानकांड असे दोन भाग आहेत, ही गोष्ट तुम्हां सर्वांस ठाऊक असेलच. कर्मकांडांत यज्ञयागादि क्रियाकलापांचा समा-वेश होतो. सांप्रतच्या काळीं कर्मकांडाचा बहुतांशीं लोप झाला आहे. ज्ञान-कांडांत तत्त्वांचा विचार मुख्यतः केला असून त्यांत उपनिषदादि वेदान्त

ग्रंथांचा समावेश होतो. श्रुतीचा हा भाग आमच्या सर्व आचार्यांस सारखाच पूज्य असून त्याचें प्रामाण्यही सर्वांस सारखेंच कबूल आहे. द्वैती, विशिष्टाद्वैती आणि अद्वैती या साऱ्यांच्या मतांची उभारणी मूळ श्रुतिग्रंथांवरच झालेली आहे. कोणीं कोणत्याही तत्त्वाचें प्रतिपादन केलें अथवा कोणताही पंथ स्वीकारला तरी त्याला श्रुतीचा आधार दाखल करणें भाग पडतें. त्याला असा आधार दाखवितां आला नाहीं, तर त्याचा मार्ग वेदबाह्य अतएव त्याज्य असें आम्ही समजतों. याकरितां हिंदूंच्या सर्व पंथांचें निदर्शक असें एखादें सामान्य नांव द्यावयाचें म्हटलें तर तें वेदान्ती किंवा वैदिक असें देतां येईल; आणि याच दृष्टीनें वेदान्तधर्म आणि वेदान्त या शब्दांचा उपयोग आह्मीं करीत असतों. या ठिकाणीं यासंबंधीं आणखीही थोडें स्पष्टीकरण करणें जरूर आहे. वेदान्ततत्त्वज्ञानाच्या अद्वैतमार्गाला मात्र सांप्रत वेदान्त हें नांव लोकांत बहुधा रूढ झालें आहे. उपनिषदांत ज्या अनेक मतांचा अंतर्भाव होतो त्यांपैकीं अद्वैतमत ही एक शाखा मात्र आहे, हें आपणा सर्वांस ठाऊक आहेच. अद्वैतमतवाद्यांना उपनिषदांसंबंधीं जितकी पूज्यबुद्धि आहे तितकीच ती विशिष्टाद्वैतवाद्यांच्या ठिकाणींही आहे. अद्वैतमतवादी स्वमताच्या पोषणासाठीं उपनिषदांचा जितका आधार दाखवितात, तितकाच विशिष्टाद्वैतीही दाखवितात. हीच गोष्ट द्वैतवाद्यांस आणि इतर सर्व प्रकारच्या मतवाद्यांस लागू आहे; पण अद्वैती आणि वेदान्ती हे शब्द एकाच अर्थाचे द्योतक म्हणून सर्वांच्या मनांत रूढ होऊन बसले आहेत; आणि असें होण्यास थोडेंसें कारणही आहे. श्रुतिग्रंथ हे आमचे प्रमाण ग्रंथ असले, तरी त्या कालानंतर लिहिले गेलेले स्मृतिग्रंथ आणि पुराणग्रंथ हेही आम्हांस पूज्य आहेत. या ग्रंथांत श्रुतींतील तत्त्वांचा प्रत्यक्ष आचार दाखविला आहे. तथापि या ग्रंथांना श्रुतींइतकें प्रामाण्य मात्र नाहीं. ज्या ठिकाणीं पुराणें आणि स्मृति यांचीं मतें श्रुतींच्या मतांहून भिन्न असतील, तेथें पुराणें आणि स्मृति त्याज्य समजाव्या, असा आमचा निर्बंध आहे. अद्वैतमताचे प्रमुख प्रवर्तक श्रीशंकराचार्य यांनीं स्वमतप्रतिपादनाच्या वेळीं आपल्या ग्रंथांत बहुधा सर्वत्र उपनिषद् ग्रंथांचेच आधार दाखल केले आहेत. ज्याला श्रुतिग्रंथांत आधार फार करून सांपडत नाहीं, अशा एखाद्या मुद्यापुरताच स्मृतिग्रंथांचा आश्रय त्यांनीं केला आहे. याखेरीज ते बहुधा केव्हांही स्मृतींकडे वळलेले नाहींत. उलटपक्षीं

इतर मतवाद्यांनीं श्रुतींपेक्षां स्मृतींचा आश्रय अधिक प्रमाणावर केला असल्याचें आढळून येतें. द्वैतमताच्या सन्निध जों जों जावें तों तों श्रुतींपेक्षां स्मृतिगत प्रमाणांचें आधिक्य वाजवीपेक्षां अधिक आढळून येतें. अशाप्रकारें अद्वैतमतवाद्यांखेरीज इतर मतवाद्यांनीं स्मृतिपुराणग्रंथांस इतकें प्राधान्य दिलें कीं, वेदान्ती आणि अद्वैती हे शब्द अखेरीस समानार्थक म्हणून रूढ झाले. या कारणामुळें वेदान्ती या शब्दानें अद्वैतमतवादी असाच बोध बहुधा होतो.

हें कसेंही असलें तरी वेदान्त या शब्दांत हिंदुस्थानांतील सर्व मतांचा समावेश झाला पाहिजे. श्रुतिग्रंथ हे आमच्यांतील अत्यंत प्राचीन ग्रंथ आहेत. अलीकडच्या पंडितांनीं कांहीं ह्मटलें तरी अमुक श्रुति अमक्या वेळीं लिहिली गेली आणि तमुक तमक्या वेळीं लिहिली गेली, हें त्यांचें मत आह्मां हिंदूंस मुळींच मान्य होत नाहीं. सारे श्रुतिग्रंथ एकाच वेळीं अस्तित्वांत आले; किंबहुना ते अमक्यानें अमक्या वेळीं अस्तित्वांत आणले असेंही ह्मणतां येत नाहीं. हें आह्मां हिंदूंचें प्राचीन मत अद्यापिही तसेंच कायम आहे. श्रुतींचें अस्तित्व परमेश्वराच्या मनांत अनंतकालचेंच आहे, असा आमचा पक्का विश्वास आहे; आणि अशाप्रकारच्या श्रुतिग्रंथांचा आधार द्वैत, विशिष्टाद्वैत आणि अद्वैत या सर्वांस सारखाच असल्यामुळें वेदान्त या शब्दांत या साऱ्यांचाच अंतर्भाव होतो, असा माझ्या ह्मणण्याचा आशय आहे. फार काय, पण बौद्ध आणि जैन यांचीही आमच्यांत अंतर्भूत होण्याची इच्छा असली तर तसें करण्यासही आह्मी मागें घेणार नाहीं. या साऱ्यांचा अंतर्भाव करण्याइतकीं आह्मां हिंदूंचीं अंतःकरणें विस्तार पावलेलीं आहेत; पण आह्मी तयार असलों, तथापि आमच्यांत येण्याची त्यांचीच मर्जी दिसत नाहीं. बौद्ध धर्माचें नितांत सार काढलें तर त्यांतील तत्त्वें उपनिषद् ग्रंथांतूनच घेतलीं असल्याचें आढळून येईल. ज्या नीतितत्त्वांबद्दल बौद्ध धर्माची आज एवढी प्रसिद्धि आहे, तीं नीतितत्त्वेंही कोणत्याना कोणत्या उपनिषद् ग्रंथांतून अक्षरशः घेतलीं असल्याचें आढळून येतें. अशाच रीतीनें जैन धर्मांतील मूर्खपणाचा भाग वगळला तर बाकीचा भाग उपनिषद् ग्रंथांतूनच घेतला असल्याचें आढळून येईल. हिंदुस्थानांत उपनिषद् कालानंतर जितके धर्ममार्ग रूढ झाले, त्या सर्वांचें मूळ उपनिषद् ग्रंथांत आढळून येतें. उप-

निषद्ग्रंथांत भक्तिमार्गाचा उल्लेख सांपडत नाहीं, असा आरोप त्या ग्रंथांवर कधीं कधीं करण्यांत येतो; पण हा आरोप अगदीं निराधार आहे. उपनिषद्ग्रंथांचा अगदीं मनःपूर्वक अभ्यास ज्यांनीं केला असेल, त्यांना हा आरोप निराधार असल्याचें ठाऊक असेलच. उपनिषदांचा अभ्यास उघड्या डोळ्यांनीं करणारास भक्तीचा उल्लेख प्रत्येक उपनिषद्ग्रंथांत आढळून येईल. आतां इतकी गोष्ट मात्र खरी कीं, ज्या मतांचा विशेष विस्तार पुराणांनीं आणि स्मृतींनीं केला आहे, तीं मतें उपनिषद्ग्रंथांत कित्येक प्रसंगीं फार संक्षिप्त रीतीनें सांगितलीं आहेत. जणूंकाय, तेथें त्यांचा वास केवळ बीजरूपानें मात्र आहे. याच बीजाचा पुराणांनीं पुढें मोठा वृक्ष बनविला. ज्याचा मूळ उगम अथवा ज्याचें बीज उपनिषद्ग्रंथांत सांपडत नाहीं असें एकही विस्तार पावलेलें धर्ममत हिंदुस्थानांत आज अस्तित्वांत नाहीं. भक्तिमार्ग हा उपनिषद्प्रणीत नसून त्याचें मूळ कोठेंतरी बाह्य देशीं आहे असें दाखविण्याचा हास्यास्पद प्रयत्न त्या ग्रंथांचें विशेषसें ज्ञान नसलेल्या पंडितांनीं केला आहे. पण त्यांचे हे सारे प्रयत्न फुकट गेले आहेत, हें आपणां सर्वांस माहीत आहेच. उपनिषद्ग्रंथांतच काय, पण त्यांच्यापूर्वींच्या संहितांतही भक्तीचीं बीजें स्पष्ट आढळून येतात. त्या कालानंतर भक्तिमार्ग अधिक विस्तृत होत जाऊन उच्चतर झाला इतकेंच. एखादा वरुणाचा अथवा दुसऱ्या एखाद्या देवाचा भक्त कंपित अंतःकरणानें आपल्या देवतेची स्तुति करीत असल्याचें संहितांत मधूनमधून आढळून येतें. पापाची कल्पना संहितांत कोठेंकोठें आढळून येते; पण पाप आणि भीति या कल्पनांचें अस्तित्व उपनिषद्ग्रंथांत आढळून येत नाहीं. उपनिषद्प्रणीत धर्म भीतिमूलक नसून प्रेममूलक आणि ज्ञानमूलक आहेत.

उपनिषद्ग्रंथ हे आमचे धर्मग्रंथ होत. याजवर निरनिराळ्या मतवाद्यांनीं निरनिराळ्या अर्थांचीं भाष्यें लिहिलीं आहेत, हें मी पूर्वीं सांगितलेंच आहे. ज्या ठिकाणीं श्रुती आणि पुराणें यांत मतभेद होतो, त्या ठिकाणीं श्रुतींचें प्रामाण्य मानलें जातें; पण आज वास्तविक स्थिति अशी झाली आहे कीं, शेंकडा नव्वद अंशांनीं आमचा चालू धर्म पौराणिक स्वरूपाचा असून फक्त दहा भाग मात्र तो वैदिक आहे. कित्येक प्रसंगीं तर तो शुद्ध पौराणिकच असावा असें वाटतें. धर्मतत्त्वांच्या व्यावहारिक स्वरूपाचा

अथवा आचारांचा विचार करतां प्रांतोप्रांतींचे आचार एकमेकांपासून भिन्न आणि कित्येक प्रसंगीं तर परस्परविरुद्ध आढळून येतात. कांहीं लोक आपलीं धर्ममतें ह्मणून जीं सांगतात तींही निरनिराळ्या प्रांतांत निरनिराळींच आढळून येतात. वास्तविक पाहातां या लोकांना खऱ्या वैदिक-तत्त्वांचें यत्किंचितही ज्ञान नसतें. कांहीं प्रांतांत कित्येक आचार असे आहेत कीं, त्यांस श्रुती, स्मृती अथवा पुराणें यांपैकीं एकाचाही आधार नसून ते केवळ त्या प्रांताची रीत ह्मणून पाळले जातात. असल्या निराधार आचारांवरही अज्ञ खेडवळांचें इतकें प्रेम जडलेलें असतें कीं, त्यांपैकीं एखादा आचार नष्ट झाला तर आपलें हिंदुत्वही त्याबरोबर नष्ट होईल, अशी भीति त्यास वाटत असते. आपले सर्व आचार वैदिकमतांस अनुसरूनच आहेत, ही भावना त्याच्या ठिकाणीं दृढमूल झालेली असते. श्रुतिग्रंथ त्यांनीं वाचले तरी आपल्या आचारांस श्रुतींचा' आधार नाहीं ही गोष्ट त्यांच्या लक्ष्यांतच येत नाहीं. अशाप्रकारच्या आचारांचा त्याग केल्यास आपण भ्रष्ट न होतां अधिक संस्कृत मात्र होऊं ही गोष्ट त्यांच्या लक्ष्यांतच येत नाहीं. आतां याशिवाय आणखीही एक अडचण आहे. आमच्या धर्मग्रंथांचा विस्तार फार मोठा आहे. एकट्या सामवेदालाच हजार शाखा आहेत, असा उल्लेख भगवान् पतंजलींनीं आपल्या महाभाष्यांत केला आहे. या एवढ्या ग्रंथविस्तारांत काय आहे हें कोणासही ठाऊक नाहीं. अशीच स्थिति इतर श्रुतिग्रंथांचीही झाली आहे. यांतील बराचसा भाग कालाच्या पोटांत गडप झाला आहे आणि शिल्लक असलेला थोडासा भाग मात्र आज आम्हांस उपलब्ध आहे. हे ग्रंथ कांहीं विशिष्ट कुटुंबाच्या हातीं होते. कालेंकरून हीं कुटुंबें निर्वंश झालीं आणि त्यांजबरोबर पुष्कळसे ग्रंथही नामशेष झाले. ज्या कोणास श्रुतिग्रंथांबद्दल नवी माहिती सांगावयाची असेल अथवा जे कोणी श्रुतिविरुद्धही आपल्या चालींरितींचें समर्थन करूं पाहत असतील त्यांनीं ही गोष्ट अवश्य लक्ष्यांत ठेविली पाहिजे. एखाद्या प्रांतांतील एखाद्या आचाराला श्रुतीचा आधार नाहीं असें कोणी दाखविलें तर नष्ट झालेल्या श्रुतींच्या भागांत त्याला आधार होता असें सांगण्यांत येतें. असें सांगण्याची ही एक रीतच पडून गेली आहे. श्रुतींवर निरनिराळ्या आचार्यांनीं निरनिराळीं भाष्यें लिहिल्यामुळें त्या सर्वांत सामान्यत्वेंकरून

काय सांगितलें आहे ही समजण्याची मारामार पडते. या सर्व ग्रंथांस कांहींतरी एक सामान्य पाया असला पाहिजे ही गोष्ट तावडतोब आपल्या लक्ष्यांत येते. काळ जात चालला तसे अनेक भेद त्यांत उत्पन्न झाले असले अथवा त्यावर निरनिराळ्या इमारती उठविल्या गेल्या असतील तथापि त्या सर्वांचा पाया एकच असला पाहिजे याबद्दल आपली खात्री झाल्यावांचून राहत नाहीं. असा एक पाया यांस नसता तर हे ग्रंथ इतक्या दीर्घ कालपर्यंत काळाच्या जबड्यांतून सुरक्षित राहिले नसते. श्रुतिग्रंथांवर झालेल्या भाष्यांचा विचार करतां येथें आणखीही एक अडचण दिसून येते ती ही कीं, एखादा अद्वैतवादी टीकाकार मूळ संहितेवर टिका करूं लागला ह्मणजे शुद्ध अद्वैतदर्शक अर्थ निघत असेल तोंपर्यंत मूलग्रंथास सोडून तो जात नाहीं. पण एखाद्या ठिकाणीं द्वैतमतपोषक अर्थ निघण्याचा संभव दिसूं लागला ह्मणजे मूलग्रंथाची ओढाताण तो करूं लागतो; व त्यांतून विचित्र अर्थ निर्माण करण्याची धडपड तो करतो. ' अज ' या संस्कृत शब्दाचा अर्थ न जन्मलेला असा एखाद्या ठिकाणीं उघड दिसत असतांही स्वतःच्या मताच्या पोषणासाठीं एखादा टीकाकार त्याचा अर्थ 'बकरा' असा करतो. अशाच रीतीनें किंवा याहूनही वाईट पद्धतीनें द्वैतमतानुयायी मूलग्रंथाची ओढाताण करीत असतात. आपल्या द्वैतमतास पोषक असा मूलग्रंथ कायम राखून अद्वैतमतदर्शक मूलग्रंथ ते छिन्नविछिन्न करूं पाहतात. संस्कृतभाषा ही आधींच फार कठीण आहे; त्यांतून प्राचीन श्रुतींची भाषा तर फारच कठीण आणि गुंतागुंतीची आहे. एकेका शब्दाला संस्कृतांत इतके अर्थ आहेत कीं, एखाद्या शब्दाच्या अर्थनिष्पत्तीसाठीं कोणी वितंडवाद करण्याचें मनांत आणलें तर तो वाद त्यास जन्मजन्मांतरीं पुरेल. कोणी कसलीही बडबड संस्कृतांत केली तरी ती बरोबर आहे असें दाखविण्याचें एखाद्या पंडिताच्या मनांत आलें तर शेंकडों आधारांनीं ती गोष्ट तो सिद्ध करूं शकेल. उपनिषद्ग्रंथ समजण्याच्या मार्गांत अशा प्रकारच्या अडचणी आहेत. एक सत्पुरुष पक्के द्वैती, पक्के अद्वैती, पक्के भक्त आणि पक्के ज्ञानीही होते. अशा सत्पुरुषांच्या सहवासाचा लाभ सुदैवानें मला झाला. त्यांच्या सहवासामुळेंच टीकाकारांच्या ह्मणण्यावर विश्वासून न राहतां स्वतंत्रपणें उपनिषद्ग्रंथांचा अभ्यास केला पाहिजे ही गोष्ट माझ्या लक्ष्यांत आली. अशा

रीतीनें या श्रुतींचा अभ्यास मी केला; तेव्हां त्या मूलग्रंथांत परस्परविरोध कोठेंही नाहीं अशी माझी खात्री झाली. याकरतां मूलग्रंथाची ओढाताण करण्याचें यत्किंचितही कारण आपणांस नाहीं. मूलग्रंथ अत्यंत सुंदर आहेत. त्यांत परस्परविरोध कोठेंही नाहीं. इतकेंच नव्हे, तर त्यांत इतकी एकवाक्यता आहे कीं, ती पाहून खरोखरच फार नवल वाटतें. सर्व तत्त्वांची रचना इतक्या सुंदर रीतीनें केलेली आहे कीं, वाचक एका तत्त्वांतून दुसऱ्यांत व दुसऱ्यांतून तिसऱ्यांत केवळ लीलेनें प्रवेश करीत जातो. या ग्रंथांसंबंधीं आणखीही एक विशेष गोष्ट माझ्या लक्ष्यांत आली, ती ही कीं, या ग्रंथांचा आरंभ द्वैतमतांत होत असून त्यांचें पर्यवसान अत्युच्च अद्वैतमतांत होतें.

माझ्या सद्गुरूंच्या सहवासाचा लाभ मला झाल्यामुळें जी एक गोष्ट विशेषेंकरून माझ्या लक्ष्यांत आली ती ही कीं, द्वैती आणि अद्वैती यांनीं परस्परांशीं विरोध करण्याचें यत्किंचितही कारण नाहीं. एकंदर हिंदु मानवकुलाच्या रचनेंत त्या दोघांसही महत्वाचें स्थान आहे. द्वैतमताचा उच्छेद होणें इष्ट नाहीं; कारण, हिंदु मानवकुलाच्या रचनेचें एक अंग जसें अद्वैतवाद्यांच्या हातीं आहे तसेंच दुसरें अंग द्वैतवाद्यांच्या हातीं आहे. या दोघांच्याही अस्तित्वानें समाज पूर्ण झाला आहे. यामुळें एकाच्या अभावीं दुसरा राहूं शकत नाहीं. एकांत जें कांहीं अपूर्ण असेल त्यास दुसरा पूर्णत्व आणीत असतो. एक इमारतीसारखा ह्मटला तर दुसरा तीवरील छपरासारखा आहे. एक मुळासारखा असून दुसरा फळासारखा आहे. याकरितां उपनिषद् ग्रंथांचे स्व-मत-पोषणार्थ वाभाडें काढीत सुटणें अत्यंत हास्यास्पद आहे असें ह्मणावें लागतें. केवळ भाषेच्याच दृष्टीनें पाहतां उपनिषद् ग्रंथ अत्यंत सुंदर आहेत. त्यांतील तत्त्वज्ञान किती अगाध आहे आणि त्यांतील नीतितत्त्वें किती उच्च दर्ज्याचीं आहेत हें मी सांगावयास नकोच. मनुष्याला मुक्तिपथावर आरूढ करण्याच्या कामीं उपनिषद् ग्रंथांच्या तोडीचे लेख जगांत दुसऱ्या कोठेंही सांपडावयाचे नाहींत. मानवी मनाची –विशेषत: हिंदुमनुष्याच्या मनाची–अंतररचना कशी आहे याचें पूर्ण स्वरूप या ठिकाणीं उत्कृष्ट रीतीनें चित्रित झालें आहे. उच्चमार्गदर्शक असे अनेक ग्रंथ अनेक देशांत निर्माण झाले आहेत ही गोष्ट खरी; तथापि त्यांचें उच्चत्व जडरूपापलीकडे गेलें नाहीं असें आपणास आढळून येतें. मिल्टन्, डांटी, होमर अथवा इतर पाश्चात्य कवींचे ग्रंथ पाहातां ही गोष्ट आपल्या ध्यानांत आल्या-

वांचून राहाणार नाहीं. यांच्या ग्रंथांतील भरारी प्रसंगविशेषीं अति उदात्त असल्याचें आढळून येतें. तथापि तेथेंही जडत्वाचा अंश तिचा पिच्छा सोडीत नाहीं. उदात्ततेची परमावधि झाली तरी तेथेंही जडत्वाचा थोडातरी अंश चिकटलेला आढळतोच. असाच प्रकार संहितांच्याही कांहीं भागांत आढळून येतो. मूळ उत्पत्ति कशी झाली याचें वर्णन करणाऱ्या सुंदर ऋचा आपणास ठाऊक असतीलच. याठिकाणीं उदात्ततेची परमावधी झाली आहे. मंत्रद्रष्टा जणूंकाय कालस्थलातीत होऊं पहात आहे असें वाटतें. पण अशा रीतीनें अनंताचा ग्रास करणें शक्य नाहीं, ही गोष्ट त्या द्रष्टयाच्या ध्यानीं आल्याचें आढळून येत नाहीं. बाह्यसृष्टीद्वारा केवढीही भरारी मारली तरी चित्तांतील सर्व कल्पना व्यक्त करतां येत नाहींत ही गोष्ट त्यांच्या लक्ष्यांत आली. या ठिकाणीं उपनिषद् ग्रंथांच्या भाषेचें स्वरूपही पालटत गेलें असल्याचें आढळून येतें. या ठिकाणीं निषेधक भाषेस प्रारंभ होतो. कित्येक प्रसंगीं इंद्रियांस आकलन करतां न येण्यासारख्या जागीं मंत्रद्रष्टा वाचकास भिऊन जातो. तो काय सांगत आहे हें पूर्णपणें तुमच्या इंद्रियांच्या आकलनांत येत नसलें तरी तेथें कांहीं तरी आहे इतकी जाणीव तो तुमच्या ठिकाणीं उत्पन्न करितो. **न तत्र सूर्योभाति न चंद्रतारकम् नेमाविद्युतो भांति कुतोऽयमग्निः** अशासारख्या ऋचांशीं उदात्तपणांत तुलना करावयास जगांतील ग्रंथांत एकही वाक्य कोठें सांपडावयाचें नाहीं. हिंदूंच्या एकंदर तत्त्वज्ञानाचें सार काय आहे आणि मानवी आत्म्याच्या वृत्तीविषयीं त्यांच्या साऱ्या कल्पनांचें अखेर पर्यवसान कोठें होतें हें ज्या एक दोन ऋचांत सांगितलें आहे त्यांचें भाषासौष्ठव आणि त्यांतील विचारांचें उदात्तत्व यांशीं तुलना करावयास जगांत एकही वाक्य सांपडावयाचें नाहीं.

**" द्वा सुपर्णा सयुजा सखाया समानम् वृक्षम् परिषस्वजाते ।**
**तयोरन्यः पिप्पलम् स्वाद्वत्यनश्नन्न्यो अभिचाक शीति ॥**
**समाने वृक्षे पुरुषो निमग्नो नीशया शोचति मुह्यमानः ।**
**जुष्टं यदा पश्यत्यन्य मीशमस्य महिमानमिति वीत शोकः ॥**

"सुंदर पिसाऱ्यांचे असे दोन पक्षी एकाच वृक्षावर बसले आहेत. ते दोघेही परस्परस्नेही आहेत. त्यांपैकीं एक वृक्षाचीं फळें खात असून दुसरा कांहींच न खातां स्वस्थ बसून राहिला आहे. खालच्या फांदीवर बसलेला पक्षी जीं

फळें खात आहे त्यांत कांहीं कडू आणि कांहीं गोड आहेत; यामुळें तो कांहीं वेळ सुखी आणि कांहीं वेळ दुःखी होतो. पण वरच्या फांदीवर बसलेला पक्षी शांत आणि उदात्तचित्त असा आहे. तो कडू अथवा गोड यांपैकीं कोणतींहीं फळें खात नाहीं. तो सुख किंवा दुःख यांपैकीं कशाची पर्वा करीत नसून स्वतःच्या महिम्यांतच दंग होऊन राहिला आहे." मानवी आत्म्याचीही अशीच कथा आहे. या संसारांत राहून ह्यांतील कडू गोड फळें तो चाखीत आहे. तो कनककामिनींच्या आणि जगांतील इतर इंद्रियसुखांच्या मागें धांवत आहे. जगांतील तुच्छ वस्तूंच्यामागें तो वेड्यासारखा धांवत सुटला आहे. दुसऱ्या कांहीं उपनिषद्ग्रंथांत मानवी आत्म्याची तुलना रथवाहकाशीं केली आहे; व इंद्रियांची तुलना उधळलेल्या घोड्याशीं केली आहे. जगांतील तुच्छ वस्तूंच्या मागें लागलेल्या मनुष्याची अशीच दशा होत असते. पुढें आपणास अमुक प्रकारचीं सुखें प्राप्त होतील अशीं स्वप्नें लहानपणीं पडतात पण तीं खोटीं असल्याचा अनुभव मोठेपणीं येतो. वृद्धापकाळीं आपल्या गत आयुष्याचें चिंतन मनुष्य करीत असतो. व असें करितांना कित्येक वेळां तो कष्टीही होतो. पण या संसाराच्या जाळ्यांतून सुटण्याचा एकही मार्ग त्यास दिसत नाहीं. साऱ्या जगभर अशाचप्रकारें मानवी जीवनक्रम चालू आहे. असें आहे तथापि प्रत्येकाच्या आयुष्यांत एखादा तरी सोन्याचा क्षण येत असतोच. कित्येक वेळां महादुःखाच्या प्रसंगीं आणि कित्येक वेळां अत्यंत सुखाच्या प्रसंगींही एखादा अत्यंत महत्वाचा क्षण प्राप्त होत असतो. त्याक्षणीं आपल्या डोळ्यांपुढील पटल अंशतः दूर होत असतें. ज्ञानसूर्याच्या आड आलेले ढग अंशतः फाटून जाऊन त्याच्या एखाद्या किरणाचें दर्शन तरी आपणास होत असतें. संसारांतील जड वस्तूंस आपण अट्टाहासानें चिकटून पाहात असतांही क्षणैक आपण इंद्रियातीत होतों. क्षणैक या खोट्या वस्तूंच्या आणि त्यांपासून होणाऱ्या खोट्या सुखदुःखांच्या पलीकडे आपण जातों. या प्रकृतीच्या पार आपण प्रवास करतों. ऐहिक अथवा पारलौकिक सुखांसंबंधीं ज्या कांहीं कल्पना आपल्या चित्तांत होत्या त्या सर्वांच्या पलीकडे क्षणैक आपण भरारी मारतों. त्या ठिकाणीं कनककामिनी, कीर्ति, मोठें नांव अथवा वंश यांचें क्षणैक भानही आपणास उरत नाहीं. या ठिकाणीं मनुष्य क्षणैक स्थिरावला तर त्याला त्या शांत आणि उदात्त

पक्ष्याचें दर्शन घडतें. जो कडू अथवा गोड फळें खात नसून स्वतःच्या महिमेंतच संतुष्ट असतो अशा पक्ष्याचें त्यास दर्शन घडतें.

भगवान् श्रीकृष्ण ह्मणतात,

**यस्त्वात्मरतिरेव स्यादात्म तृप्तश्च मानवाः ।**
**आत्मन्येव च संतुष्ट स्तस्य कार्यम् न विद्यते ॥**

"ज्याला आत्म्यावांचून दुसऱ्या कशाचीही अपेक्षा राहिली नाहीं, ज्याची भक्ति फक्त आत्म्याच्याच ठिकाणीं जडली आहे आणि जो आत्म्याच्याच ठिकाणीं संतुष्ट आहे त्याला कार्य असें कोणतेंही राहिलेलें नाहीं." अशा मनुष्याला कार्य तें काय असावयाचें आहे ? त्यानें अट्टाहास कशासाठीं करावा ? अशा प्रकारच्या प्राप्त झालेल्या क्षणांत मनुष्याला ज्ञानसूर्याच्या एखाद्या किरणाचें दर्शन होतें; पण पाठोपाठ या गोष्टीची त्याला विस्मृती पडून या जीवितांतील कडू गोड फळांच्या मागें तो पुन्हां लागतो. कांहीं वेळानें त्याला पुन्हां पूर्वस्मृति येते आणि त्या वरच्या पक्ष्याकडे धक्के खात खात तो जात असतो. अशाप्रसंगीं बसणारे तडाके जों जों अधिक मोठे तों तों ते त्या पक्ष्याकडे त्याला अधिक लौकर नेतात. त्या पक्ष्याच्या जों जों अधिक जवळ तो जाऊं लागतो तों तों त्याच्यांत रूपांतर होऊं लागतें. जों जों तो अधिक जवळ जाऊं लागतो तों तों त्याचें स्वतःचें निराळें अस्तित्व संपुष्टांत येऊं लागतें; आणि अखेरीस तें पार नाहींसें होतें. आपणाला स्वतंत्र अस्तित्व नव्हतेंच असें त्याच्या अनुभवास येतें. त्या शांत आणि उदात्त पक्ष्याची आपण पडच्छाया मात्र होतों, असें त्यास दिसतें. त्या दुसऱ्या पक्ष्याच्या ठिकाणीं दिसणारी उज्ज्वलता ही आपलीच उज्ज्वलता होती अशी प्रतीति त्यास होते. अशी प्रतीति आली ह्मणजे तो आत्मतुष्ट होत्साता शांत आणि निर्भय चित्तानें राहतो. अशा प्रकारच्या रूपकांनीं, उपनिषद्ग्रंथांना द्वैतांत आरंभ करून त्याचें अद्वैतांत पर्यवसान केलें आहे.

अशाप्रकारचीं अनंत उदाहरणें सांगतां येतील. पण वेळाच्या अभावीं मला तसें करतां येत नाहीं. उपनिषद्ग्रंथांतील कवित्व किती अद्वितीय आहे, त्यांतील चित्रकल्पना किती उदात्त आहे आणि त्यांतील विचार किती उच्चतम दर्ज्याचे आहेत हें सांगण्यास वेळ पुरावयाचा नाहीं. तथापि एकच गोष्ट विशेषेंकरून आपल्या लक्ष्यांत मला आणून द्यावयाची आहे. ती

गोष्ट ही कीं, उपनिषद्ग्रंथांतील विचार आणि त्यांची भाषा हीं अशीं तीव्र आहेत कीं, एखाद्या तरवारीच्या पात्याप्रमाणें तीं थेट तुमच्या हृदयांत घुसतात. तेथें अर्थ शोधीत बसण्याचें कारणच पडत नाहीं. त्यांतील अर्थ स्वतःच तुमच्या हृदयांत प्रकट होतो. त्या गीतांतील नुसता ध्वनी सुद्धां इतका मंजुळ आणि इतका पुष्ट आहे कीं, त्याचा सुद्धां तुमच्या चित्तावर परिणाम झाल्यावांचून राहाणार नाहीं. त्यांत शब्दच्छल अथवा मेंदूस वेडी करून सोडणारी ओढाताण कोठेंही आढळावयाची नाहीं. त्यांतील सूक्तें आपलें उच्च स्थान सोडून भ्रष्ट•झाल्याचें कोठेंही आढळून यावयाचें नाहीं. त्यांत फार रूपकें अथवा फार अलंकार आढळावयाचे नाहींत. त्यांत गुणदर्शक विशेषणांवर विशेषणें आढळून यावयाचीं नाहींत. अशाप्रकारचीं विशेषणें एखाद्या लेखांत तुडुंब भरलेलीं असलीं म्हणजे तो विषय अधिकाधिक कठिण मात्र होत जातो; इतका कीं, त्यांतून अर्थ काढण्याचें कार्य मेंदूस करतांच येत नाहीं. असल्या प्रकारच्या साहित्याच्या चक्रव्यूहांत एखादा मनुष्य सांपडला म्हणजे अर्थनिष्पत्तीसाठीं फिरतां फिरतां अखेरीस तो अधिक श्रमिष्ट मात्र होतो. उपनिषदग्रंथांत असला चक्रव्यूह एकही·सांपडावयाचा नाहीं. असले ग्रंथ जर मनुष्याच्या हातून निर्माण झाले असले तर ज्या मानवीकुलांतून ते निर्माण झाले त्या मानवकुलांतील चैतन्य अद्यापीही अवश्य शिल्लक असलें पाहिजे.

साऱ्या उपनिषद्ग्रंथांत एकच उपदेश मला विशेषेंकरून सर्वत्र आढळून आला. "बळकट व्हा," हाच तो उपदेश. सर्वोपनिषद्ग्रंथ, प्रत्येक पानांच्या मुखानें जणूं काय हा एकच उपदेश बोलत आहेत. त्यांतील विशेषेंकरून लक्ष्यांत ठेवण्यासारखी गोष्ट हीच. माझ्या साऱ्या आयुष्यक्रमांतही हाच एक मोठा धडा मला शिकविण्यांत आला. 'दुर्बल होऊं नका' हा एकच उपदेश उपनिषद्ग्रंथांनीं पुनःपुन्हां केला आहे. 'मानवी स्वभावाबरोबरच कांहीं दौर्बल्य उपजलेलें नाहीं काय?' असा प्रश्न कोणी विचारल्यास उपनिषद्ग्रंथ उत्तर देतात, "होय; असें दौर्बल्य त्याजबरोबर उत्पन्न झालें आहे, ही गोष्ट खरी. पण अधिक दौर्बल्यानें पूर्वीच्या या दौर्बल्याचा नाश होईल काय? घाणीनें घाण धुण्याचा यत्न तुह्मीं करणार कांय? पापानें पाप नष्ट होतें काय? या गोष्टी घडणें शक्य असेल तर मात्र दौर्बल्यानें दौर्बल्य नष्ट होईल. या

करितां जागे व्हा, आणि मनोदार्ढ्य प्रथम मिळवा. 'अभय' हा शब्द वारंवार उपयोगांत आणल्याचें या ग्रंथांत सर्वत्र आढळून येतें. जगांतील दुसऱ्या कोणत्याही धर्मग्रंथांत परमेश्वराला अथवा मनुष्याला निर्भय हें विशेषण लावल्याचें दिसून येत नाहीं. अशाप्रसंगीं जगज्जेत्या शिकंदर बादशहाच्या गोष्टीचें मला स्मरण होतें. सिंधुनदाच्या तीरीं एका महान् अरण्यांत आमचे कांहीं संन्यासी बसले असतां त्यांजसमोर बादशहा उभा राहिलेला मला दिसतो. ज्या वृद्ध मनुष्याबरोबर त्याचें संभाषण झालें तो मनुष्य पूर्ण नग्नावस्थेंत होता. तो एका शिलाखंडावर बसला होता. त्याच्या मुखांतून स्रवणाऱ्या ज्ञानगंगा-जलाचें पान करून बादशहा आश्चर्यानें स्तब्ध झाला, आणि त्याला पुष्कळ द्रव्याची लालूच दाखवून आपल्याबरोबर ग्रीस देशास येण्याविषयीं तो त्याला विनवूं लागला. त्या वृद्धानें त्या सुवर्णराशीकडे पाहून तुच्छतादर्शक नुस्तें हास्य मात्र केलें; आणि बादशहाच्या विनंतीचा अव्हेर केला. हा आपला अपमान झाला असें वाटून बादशहा मोठ्या क्रोधानें ह्मणाला, "मजबरोबर तूं आला नाहींस तर मी तुझा वध करीन." हें बादशहाचें भाषण ऐकून तो मनुष्य गदगदां हांसून ह्मणाला, "राजा, आतां तूं जितका मिथ्या प्रलाप करीत आहेस तसें साऱ्या जन्मांत तूं खोटें बोलला नसशील. मला मारण्यास या जगांत कोण समर्थ आहे? तूं बादशहा असलास तरी तूं जड जगाचा बादशहा आहेस. मग तूं मला कसा मारूं शकशील? कारण, मला जन्म कधीं आलाच नाहीं. मी केवळ चैतन्यरूप मात्र आहें. मी आज असल्यामुळें शाश्वतही आहें. मी सर्वव्यापी व सर्वशक्तिमान् आहें. मग कोंवळ्या पोरा, तूं मला मारशील कसा?" मनोदार्ढ्याचें स्वरूप हें आहे. अशी दृढता आपण प्राप्त करून घेतली पाहिजे. माझ्या प्रिय मित्रांनों, मद्देशबांधव हो, उपनिषद्ग्रंथांचा अभ्यास जों जों मी करतों, तों तों तुमच्यासाठीं माझ्या डोळ्यांत अश्रूंचे पूर लोटतात. कारण, तुह्मांला सांगण्यासारखा असा हा एकच धडा माझ्या नजरेसमोर उभा राहतो. आपणास दुर्बलता आणण्यास हजारों कारणें आहेत; अशा गोष्टींनीं आमचीं पुराणें ओतप्रोत भरून राहिलीं आहेत. साऱ्या पुराणांतील अशा गोष्टी एकत्र केल्या तर जगांतील पाऊण हिस्सा ग्रंथसंग्रहालयें तुडुंब भरून जातील. गेलीं हजारों वर्षें ज्याप्रकारचें आचरण आपण केलें

आहे त्या आचरणानें आमच्या साऱ्या हिंदुकुलास दौर्बल्य मात्र आणलें आहे. जणूंकाय, दिवसेंदिवस अधिकाधिक दुर्बल कसें होत जावयाचें, या एकाच गोष्टीचा विचार हजारों वर्षें आपण उराशीं बांधला होता. असल्या विचारानें आज आपण खरोखर मातींतील किड्यांच्या अवस्थेस पोचलों आहों. आम्हांस तुडविण्याची ज्या कोणाची मर्जी असेल त्याच्या पायाखालीं डोकें देण्यास आह्मी तयार झालों आहों. मित्र हो, याकरितां तुमच्याच हाडांमासांचा एक ह्मणून मला तुह्मांस पुन्हां पुन्हां हाच उपदेश करावयाचा. हें सर्व दौर्बल्य झुगारून देऊन सामर्थ्य प्रथम प्राप्त करून घ्या. उपनिषद्ग्रंथ हे सर्वसामर्थ्याची जणूं खाणच आहेत. सर्व जगाच्या नाड्यांत भरून उरण्याइतकें सामर्थ्य उपनिषद्ग्रंथांत आहे. त्यांच्याद्वारें सर्व जगाला शक्तिदान करतां येईल. त्यांच्याद्वारें सर्व जगाला नव्या चैतन्याची प्राप्ती होईल. जगांत तुडविलीं गेलेलीं जितकीं ह्मणून मानवकुलें आज अस्तित्वांत असतील आणि दौर्बल्य आणणारे जे धर्म आणि पंथ अस्तित्वांत असतील त्या साऱ्यांस नवें चैतन्य आणि मुक्ति यांची प्राप्ती करून घ्या असा उपदेश उच्च घोषानें उपनिषद्ग्रंथ करीत आहेत. सर्व उपनिषद्ग्रंथांचा मूळ पाया शरीरस्वातंत्र्य, बुद्धिस्वातंत्र्य आणि चैतन्यस्वातंत्र्य हाच आहे.

मुक्तीचा लाभ बाहेरून कोठून होणारा नसून तुमच्या स्वतंत्र होण्यावरच तो अवलंबून आहे, असें सांगणारा धर्मग्रंथ जगांत दुसरा कोणताही नाहीं. प्रकृतीनें ज्या जाळ्यांत तुमचे हातपाय बांधले आहेत आणि ज्यामुळें तुह्मांस दौर्बल्य आलें आहे तें जाळें तोडून मोकळें व्हा, असा उपदेश दुसऱ्या कोणत्याही धर्मग्रंथानें केलेला नाहीं. तुह्मीं स्वभावतःच मुक्त आहां असें सांगणारा धर्मग्रंथ हाच एक आहे. तुह्मीं द्वैतवादी असलां तरी त्यासही आमची हरकत नाहीं. तुमचा आत्मा स्वभावतःच परिपूर्ण आहे, ही गोष्ट तुह्मांलाही कबूल करावीच लागेल. आपल्या स्वतःच्या कृतींनीं मात्र आत्मा बद्ध झाला आहे. बद्ध आणि मुक्त याबद्दल श्रीरामानुजांनीं जी उपपत्ति सांगितली आहे, ती सांप्रतच्या उत्क्रांतिवाद्यांच्या तत्त्वांशीं तंतोतंत जुळते. आत्म्याची पिछेहाट होते, आणि तो जणूंकाय संकुचित होतो. अशा स्थितींत त्याचें सामर्थ्य अदृश्य स्थितींत राहतें, पण तें नष्ट होत नाहीं. सत्कृत्यांनीं आणि सद्विचारांनीं या संकुचित स्थितीचा त्याग आत्मा करूं लागतो. आणि

हळूहळू पुन्हां मुळचें पूर्णत्व पावतो. अद्वैतमतांत आणि या मतांत एकच फेर आहे; तो हा कीं, अद्वैतमताप्रमाणें आकुंचन आणि प्रसरण या क्रिया आत्म्याच्या नसून त्या प्रकृतीच्या मात्र आहेत. आपण अशी कल्पना करूं कीं, आपणासमोर एक पडदा असून त्या पडद्याला एक लहान छिद्र आहे. मी या पडद्यामागें उभा राहिलों असून त्या छिद्रांतून या सभेकडे पहात आहें. अशा स्थितींत कांहीं थोडे चेहेरे मात्र मला दिसतील. आतां तें छिद्र मोठें होत जात आहे अशी कल्पना करा. तें जों जों मोठें होत जाईल तों तों अधिक मनुष्यें मला दिसूं लागून अखेरीस हें छिद्र खुद्द पडद्याइतकें मोठें होऊन मला सर्व सभेचें एकदमच दर्शन होईल. या उदाहरणावरून तुमच्या आणि माझ्यामध्यें वास्तविक कशाचेंच अस्तित्व नव्हतें; जो कांहीं फरक झाला तो तुमच्यांत झाला नाहीं, अथवा माझ्यांतही झाला नाहीं. तो फरक फक्त पडद्यांत मात्र झाला. तुह्मीं आरंभापासून अखेरपर्यंत जसेच्या तसेच होतां. फक्त पडद्यांत मात्र फरक झाला उत्क्रांतितत्त्वा-संबंधीं अद्वैतवाद्यांचें हेंच ह्मणणें आहे. त्यांच्या मतें प्रकृतीची उत्क्रांती होत असून तिजमुळें संकुचितसा भासत असलेला आत्मा क्रमशः प्रकट होत जातो. आत्म्याचें संकोचन करण्याचें सामर्थ्य कोणासही नाहीं. तो अनंतस्वरूप असल्यामुळें त्याच्या रूपांत कोणीही बदल करूं शकत नाहीं. मायेच्या पडद्यामुळें त्याचें स्वरूप झांकून गेलेलें असतें. आणि हा मायेचा पडदा जों जों विरळ होत जातो तों तों त्याचें मूळ रूप अधिकाधिक प्रकट होत जातें. हिंदुस्थानांतून बाह्य देशींच्या लोकांस शिकण्यासारखा जर एखादा सिद्धांत असेल तर तो हा एकच सिद्धांत होय. त्यांनीं स्वतःच्या तत्त्वज्ञानाच्या कितीही बढाया मारल्या तथापि हा सिद्धांत मान्य केल्यावांचून कोणताहि समाज चिरस्थायी होऊं शकणार नाहीं, ही गोष्ट आज ना उद्यां कबूल करावीच लागेल. जग सध्यां सर्व गोष्टींत संक्रमण पावत आहे, ही गोष्ट आपणासही आढळून येत नाहीं काय? पूर्वीं कोणा एखाद्यावर एखाद्या गुन्ह्याचा आरोप करण्यांत आला तर स्वतःचा निरपराधिपणा शाबित करण्याचा बोजा आरोपीवर असे. सर्व प्रकारच्या गुन्ह्यांत आणि कित्येक वेळां रोगचिकित्सेसही हाच नियम लागू करण्यांत येत असे. पण आतां हें पूर्वीचें कायद्याचें स्वरूप साफ बदलून गेलें आहे. शरीर हें

स्वभावातःच चांगल्या स्थितींत असून रोगांचा निःपात करण्याकडे त्याची स्वभावतःच प्रवृत्ति आहे ही गोष्ट सांप्रत मान्य होत चालली आहे. औषधींचा उपयोग, फारच झालें, तर शरिराच्या या क्रियेंत त्याला मदत करण्याकरितांच होतो. गुन्हेगारांच्या कायद्यांतही आतां असाच बदल झाला आहे. कोणावर केवढ्याही मोठया गुन्ह्याचा आरोप असला, तरी तो गुन्हेगारही परमेश्वराचा अंश आहे ही गोष्ट आधुनिक कायद्यानें मान्य केली आहे. आणि याच तत्त्वावर सांप्रत प्रत्यक्ष गुन्हेगारासही वागविण्यांत येतें. याच दृष्टीला अनुसरून गुन्हेगारांस सुधारण्याकरितां अनेक प्रकारच्या संस्था अस्तित्वांत येत आहेत. हीच गोष्ट सर्वत्र आढळून येते. सर्वत्र परमेश्वराचा वास आहे या आमच्या प्राचीन सिद्धांताचें ग्रहण पाश्चात्य लोकही आतां करूं लागले आहेत. हा मूलसिद्धांत कोणी शोधून काढला हें त्यांस ठाऊक असेल अथवा नसेल; तथापि तो त्यांच्या समाजरचनेंत हळुहळू अधिकाधिक व्यक्त होऊं लागला आहे ही गोष्ट मात्र खरी. या सिद्धांताचें सोपपत्तिक विवरण आपल्या धर्मग्रंथांत केलें असून इतर देशांना आपणांपासून तें शिकावें लागेल. निरनिराळ्या मानवकुलांचा जो परस्परसंबंध आज दिसत आहे तो साफ बदलून जाईल. यासंबधींच्या साऱ्या जुन्या कल्पनांस आतां लौकरच रजा द्यावी लागेल. चालू शतकाच्या अवधींतच जुन्या कल्पनांचा चक्काचूर होण्यास आरंभ होईल. आपल्या सिद्धांताबद्दल कदाचित् थट्टा करणारेही कोणी आढळतील, तर त्यांनीं खुशाल तसें करावें. जगांत पाप मुळींच नाहीं असें सांगत मी फिरतों, याबद्दल माझीही पुष्कळ लोक थट्टा करितात. पण या थट्टा करणाऱ्या लोकांनीं हें पक्कें लक्षांत ठेवावें कीं, त्यांचीच पुढील पिढी माझी स्तुति करील. मी पापाबद्दल कांहीं शिकवीत नसून मी सद्गुणांचा मात्र शिक्षक आहें—मी प्रकाशाचा उपदेशक आहें.

सर्व विश्वाची एकात्मता हा दुसरा एक सिद्धांत उपनिषद्ग्रंथांतून सर्व जगास शिकावयाचा आहे. जगांत भेद उत्पन्न करणाऱ्या गोष्टींचा लय हळू हळू होऊं लागला आहे. वीज आणि वाफ यांच्या सामर्थ्यानें जगाच्या निरनिराळ्या भागांचा संयोग होत आहे; आणि यामुळें परस्परांविषयीं परस्परांच्या मनांत असलेल्या मूर्खपणांच्या कल्पनांचा लय होत आहे. हिंदुस्थानाशिवाय इतर देशांत दैत्यांची मात्र वस्ती आहे असें आपणा हिंदूंस आता

वाटत नाहीं. तसेंच हिंदुस्थानांत मनुष्यभक्षक रानटी लोक मात्र राहतात असें ख्रिस्ती लोकांसही वाटेनासें झालें आहे. आपला देश सोडून आपण बाह्यदेशीं गेलों तर येथल्याप्रमाणेंच तेथेंही बंधुभाव असून तेथेंही आपणास मदत करणारे अनेक आहेत असा अनुभव आपणास येतो. येथल्याप्रमाणेंच तेथेंही मृदुभाषी माणसें असून कित्येक वेळां स्वदेशांतील लोकांपेक्षांही तीं अधिक चांगलीं असल्याचा आपणास अनुभव येतो. त्याचप्रमाणें पाश्चात्य लोक इकडे येतात तेव्हां त्यांसही आमच्या देशाबद्दल असाच अनुभव येतो. अज्ञान हेंच सर्व दुःखांचें मूळ आहे, असें उपनिषद्ग्रंथांनीं सांगितलें आहे. हा सिद्धांत सर्वत्र सारखाच खरा आहे. ऐहिक, सामाजिक अथवा पारलौकिक बाबींतही अज्ञानच आपल्या सुखाचा घात करीत असतें. परस्परांविषयीं अज्ञान असतें ह्मणूनच परस्परांचा द्वेष परस्पर करतात. अज्ञानामुळें दोन मानवकुलांत प्रेमसंबंध घडून येत नाहीं. हा अज्ञानाचा पडदा दूर होऊन परस्परांस परस्परांचें ज्ञान झालें ह्मणजे प्रेम तेथें आपोआपच उत्पन्न होतें. कारण, आपण वस्तुतः सारे एकरूपच आहोंत. अशा रीतीनें सर्व जग हळूहळू एकात्मतेकडे जात आहे. राजकीय विषयांत आणि समाजरचनाशास्त्रांतही आतां असाच बदल होऊं लागला आहे. जुने समाजरचनाशास्त्राचे सिद्धांत केवळ एकदेशीय असून सांप्रतच्या स्थितींत ते लागू पडत नाहींत असें आतां स्पष्ट दिसूं लागलें आहे. सर्व मानवकुलास सारख्याच रितीनें उपयुक्त होईल अशी समाजरचना हवी आहे, ही ओरड आतां चोहोंकडून कानावर येते. कोणतेंही राष्ट्र केवळ आपल्याचपुरता विचार करतांना आतां आढळेनासें झालें आहे. कोणतीही गोष्ट करावयाची झाली तरी तिचा हेतू जगाच्या कल्याणाचा आहे असें प्रत्येक राष्ट्र ह्मणूं लागलें आहे. जगाचें एकीकरण हळूहळू कसें होत चाललें आहे हें या गोष्टीवरून स्पष्ट होतें. जड वस्तूविषयीं भौतिकशास्त्रांनीं जे जे सिद्धांत बांधले आहेत, त्यावरूनही हेंच सर्वव्यापी तत्त्व आतां खरें ठरूं पाहात आहे. सर्व विश्व ह्मणजे जड वस्तूंचा एक समुदाय असून मनुष्यें, सूर्य, चंद्र, तारे इत्यादि वस्तू हे त्या जडवस्तूंच्या समुद्रावरील लहान लहान बुडबुडे मात्र आहेत. विचारसृष्टीसही हाच सिद्धांत लागू आहे. विचारसृष्टी ही समुद्रासारखीच एकरूप असून आपणा सर्वांचीं निरनिराळीं मनें ह्मणजे निरनिराळे बुडबुडे

मात्र होत. या सर्व मतांच्या पाठीमागें एकाच आत्म्याचा वास असून तो कोठें जात येत नाहीं अथवा बदलतही नाहीं. तो अच्छेद्य असून केवळ एकरूप आहे

जगाची नीतिमत्ता सुधारली पाहिजे ही ओरडही आतां सुरू झाली आहे. या नीतिशास्त्राचें मूलही आमच्या ग्रंथांतच आहे. याकरितां या शास्त्राची जगांत सांप्रत गरज आहे. त्यांना जें काय पाहिजे आहे, तें त्यांस हिंदुस्थानांतूनच प्राप्त होईल. या तत्त्वांची जरूर पाश्चात्यांस असेल तर तीं तत्त्वें हजारपट अधिक प्रमाणावर आज आपणांस हवीं आहेत. उपनिषद्ग्रंथ कितीही श्रेष्ठ असले आणि आपला जन्म अति श्रेष्ठ अशा महर्षींच्या कुलांत झाला असला तथापि परकीयांच्या तुलनेनें आज आपण अत्यंत दुर्बळ झालों आहों ही गोष्ट प्रांजलपणें आपण कबूल केली पाहिजे. प्रथम आपण शरिरानें दुबळे झालों आहों. आपणास जीं अनेक दु:खें आज भोगावीं लागत आहेत त्यांतील निदान तिसरा हिस्सा केवळ शारीरिक दुर्बलतेचें फळ आहे. आपण अत्यंत आळशी झालों आहों; काम करण्याचा हुरूप आपणास नाहीं; समुच्चयानें काम करणें आपणास अशक्य झालें आहे; परस्परांबद्दल प्रेमभाव आपल्या ठिकाणीं नाहीं; आपण अत्यंत आपलपोटे झालों आहों; आपणांपैकीं केवळ तीनच माणसें एकत्र जमलीं तर ताबडतोब या त्रयींत द्वेषाचा प्रादुर्भाव दिसून येतो. ताबडतोब एकमेकांचा मत्सर तीं करूं लागतात. रानांत इतस्तत: पळत असलेल्या खिल्लारासारखी आपली स्थिती आहे. अत्यंत आपलपोटेपणामुळें आपण परस्परांच्या छातीवर बसण्यांत आज कित्येक शतकें घालविलीं आहेत. गंध आडवें कोणी लावावें आणि उभें कोणी लावावें असल्या जाड्या विषयांवर वाद करण्यांत कित्येक शतकांचा अपव्यय आपण केला आहे. अमक्याच्या दृष्टीनें आपलें अन्न विटाळतें कीं नाहीं अशासारख्या महत्वाच्या विषयावर गाढवाच्या ओझ्याचे ग्रंथ आपण लिहिले आहेत. गेलीं कांहीं शतकें हाच उद्योग आपण केला आहे. असल्या जाड्या शोधांत ज्यांचे मेंदू कित्येक शतकें गुतून गेले त्यांजपासून एखाद्या महत्वाच्या गोष्टीची अपेक्षा ती काय करावी ? या स्थितीबद्दल आपणास केव्हांच शरम वाटत नाहीं काय ? केव्हां केव्हां आपणास शरम वाटते. पण या मगराची मिठी मात्र सुटत नाहीं.

पुष्कळ गोष्टी कराव्या अशी इच्छा आपणास होते; पण त्यांतील एकही आपल्या हातून प्रत्यक्ष घडत नाहीं. आपली स्थिती पोपटासारखी झाली आहे. पोपटासारखी बडबड आणि कृतीच्या नांवानें शून्य असे आपण बनलों आहों. या स्थितीचें कारण काय ? शारीरिक दुर्बलता हेंच कारण आहे. याकरितां शरीर सबळ करण्याकडे आमच्या तरुणांनीं प्रथम लक्ष्य दिलें पाहिजे. हें साध्य झालें तर धर्ममार्गही मग सुखानें आक्रमण करतां येईल. **'शरीरमाद्यं खलुधर्मसाधनम्'** हें वचन तरुणांनीं कधींही विसरूं नये. माझ्या तरुण मित्रांनों, माझा तुह्मांस एकच उपदेश आहे, तो हाच कीं, शारिरीक बळ प्रथम मिळवा. गीतापाठापेक्षां फुटबॉलचा खेळच तुह्मांस स्वर्गाकडे अधिक लौकर घेऊन जाईल. माझें हें ह्मणणें पुष्कळांस धाष्टर्याचें वाटेल व तें त्यांस कदाचित् रुचणारही नाहीं; पण तसें झालें तरी पुनःपुन्हा तेंच सांगणें मला भाग आहे. तुमच्या ठिकाणीं असलेलें माझें प्रेम मला गप्प बसूं देत नाहीं. दोष कोठें आहे, हें अनुभवानें मला समजलें आहे. तुमच्या शरिरांतील स्नायू अधिक बळकट झाले तरच गीतेचें खरें रहस्य तुमच्या ध्यानीं येईल. तुमच्या शरिरांत रक्ताचा भरपूर सांठा झाला तरच भगवान् श्रीकृष्णाच्या सामर्थ्याचें रहस्य तुह्मांस अधिक चांगलें समजेल. पौरुष तुमच्या रोमरोमांत खेळूं लागलें तरच उपनिषद्ग्रंथ आणि आत्म्याची उज्वलता यांचें खरें स्वरूप तुमच्या ध्यानीं येईल. आपल्या सांप्रतच्या स्थितींत उपनिषद्ग्रंथांचा हाच पउयोग आपणांस करून घ्यावयाचा आहे.

मीं अद्वैतमताचा प्रचार करतों याबद्दल कित्येकांस माझा राग आला आहे. वास्तविक माझा उद्देश द्वैताचा, अद्वैताचा अथवा दुसऱ्या कोणत्याही विशिष्ट मताचा प्रसार करण्याचा नाहीं. आत्मा सर्वशक्तिमान् आहे, तो परमपवित्र आहे आणि तो सदोदित परिपूर्ण आहे याच विशिष्ट मताचा प्रसार होणें आपणास सध्यां इष्ट आहे. मला एखादें मूल असतें तर त्याच्या जन्मदिवसापासून ' तूं अत्यंत पवित्र आहेस ' असा घोष त्याच्या कानांशीं मी केला असता. पुराणांतील मदालसा राणीची कथा आपण वाचली असेलच. मुलाला स्व-हस्तें पाळण्यांत निजवून पाळणा लोटतां लोटतां ती तोंडानें ' तूं पवित्र आहेस, निष्कलंक आहेस, पातकरहित आहेस, सर्वशक्तिमान् आहेस, सर्वश्रेष्ठ आहेस, ' अशा अर्थाचें गाणें ह्मणत असे. या कथेंत फार

मोठें तात्पर्य आहे. आपण मोठे आहों, अशी भावना आपल्या अंत:करणांत आपण सदोदित वागविली तर आपण खरोखरच मोठे होऊं. यूरोपांत मी प्रवास केला त्यांत जो कांहीं अनुभव मला आला त्याचा निष्कर्ष हाच. 'आपण पातकी आहों' असें तोंडानें ह्मणावयास तिकडील धर्मोपदेशक लोकांस शिकवीत असतात. खरोखर सर्व युरोपीय लोक आपण खरेच पातकी आहोंत असें मानीत असते तर त्यांची स्थिती मध्य आफ्रिकेंतील शिद्द्यांच्या स्थितीहून अधिक योग्यतेची खास नसती. आपण पातकी आहों, असें ते मनापासून समजत नाहींत हा परमेश्वराचा मोठा आशीर्वादच होय. उलट आपण जगाचे धनी होण्याकरितांच जन्मलों आहों अशी त्यांची मनापासून भावना असते. आपण मोठे आहोंत आणि आपण वाटेल तें करूं शकूं, अशी त्यांची पक्की आत्मश्रद्धा असते. सूर्यावर किंवा चंद्रावर जाण्याची वेळ आली तरी तेंही आपण करूं शकूं असें त्यांस वाटतें. त्यांच्या या आत्मश्रद्धेच्या पक्क्या भावनेमुळेंच ते आज खरोखर मोठे झाले आहेत. धर्मोपदेशकावर विश्वास ठेऊन आपण खरोखरच पातकी आहों, अशी त्यांची श्रद्धा झाली असती तर त्यांना आजचें मोठेंपण कधींही प्राप्त झालें नसतें. धर्मोपदेशक कांहींही बडबडत असले आणि पाश्चात्य देशांत धर्मभोळेपणा कितीही असला तरी त्यांचें अंतस्थ चैतन्य अद्यापि जीवंत असून स्वत:च्या जिवंतपणाची साक्षही तें पटवितें. आपली आत्मश्रद्धा नष्ट झाली आहे. एखाद्या इंग्रज पुरुषांत अथवा स्त्रींत जी आत्मश्रद्धा आज आढळून येते तिचा हजारावा हिस्साही आपल्या ठिकाणीं नाहीं. माझें हें बोलणें तुह्मांस कडू लागेल; पण वस्तुस्थिति आहे तशी स्पष्ट सांगण्यावांचून दुसरा उपाय काय? एखाद्या इंग्रज गृहस्थाला अथवा स्त्रीला आमचे धर्मसिद्धांत पटले तर त्याच्यामागें लागून ते लोक कसे वेडे होतात व आपण शास्त्यांच्या वर्गांतले आहोंत हा मोठेपणा बाजूस ठेऊन आमच्या हिंदुस्थानांतच त्या सिद्धांताचा प्रसार करण्यास ते कशी मेहनत घेतात तें पहा. त्यांच्या देशबांधवांनीं त्यांची कितीही थट्टा केली तरी त्यांच्या या उद्योगास खळ पडत नाहीं. तुमच्यापैकीं ही गोष्ट कितीसे करूं शकतील? वास्तविक पाहतां ही गोष्ट तुमच्या हातून कां होऊं नये? त्यांच्याइतकें ज्ञान तुह्मांस नाहीं काय? वास्तविक तुमचें ज्ञान अधिक आहे.

पण तुमचें अधिक ज्ञानच तुह्मांस सांप्रत मारक झालें आहे. तुमच्या मार्गांत अडचण ह्मटली तर हीच. तुमचें रक्त पाण्याहून पातळ होऊन गेलें आहे. तुमचा मेंदू नरम आणि तुमचें शरीर अशक्त झालें आहे. देहाच्या या अवस्थेंत तुमच्या हातून काय होणार? ही स्थिती आतां बदलली पाहिजे. देहदुर्बलता हीच या सर्व स्थितीचें कारण आहे. यावांचून दुसरें कोणतेंही कारण नाहीं. समाजसुधारणा आणि दुसऱ्या कित्येक प्रकारच्या सुधारणा यांजबद्दल गेलें सारें शतक तुह्मीं बडबड करीत आहां; पण या बडबडीचा उपयोग प्रत्यक्ष आचरणाकडे करावयाची वेळ आली ह्मणजे दिवाभितांसारखीं तुह्मी आपलीं तोंडें लपवितां. त्रिखंड शोधलें तरीही तुमचा पत्ता लागत नाहीं. तुमच्या या वर्तुणुकीचा साऱ्या जगास आतां अगदीं वीट येऊन गेला आहे. सुधारणा हा शब्द सध्यां थट्टेचा विषय होऊन बसला आहे. अशा स्थितीचें कारण काय? तें कारण तुह्मांस अज्ञात आहे असें नाहीं. तें तुमच्या पक्क्या ओळखीचें झालें आहे. अशक्तता—दौर्बल्य हेंच कारण. तुह्मी जसे शरिरानें दुबळे तसेच मनानेंही पंगू आहां. आत्मश्रद्धा तर थोडीशीसुद्धां तुमच्यापाशीं नाहीं. जातिभेद, परकीयांचा अंमल आणि तुमच्याच लोकांनीं तुह्मांवर गाजविलेली सत्ता या गोष्टींच्या हजारों वर्षांच्या प्रचंड आघाताखालीं तुमच्या सर्व सामर्थ्यांचा चुराडा उडून गेला आहे. माझ्या प्रियबंधूनों, तुमचीं सर्व हाडें मोडून गेलीं आहेत; आणि धुळींतील किड्याच्या योग्यतेस तुह्मीं सांप्रत पोंहोंचलां आहां. आतां हें शक्तिदान तुह्मांला कोण करील? 'सामर्थ्य, सामर्थ्य' हा एकच जप तुह्मांस आतां कोण शिकवील? आपणास या एकाच वस्तूची जरूर आहे. या मार्गांतील पहिली पायरी ह्मटली ह्मणजे उपनिषद्ग्रंथांचा आधार घेऊन 'शिवोऽहं शिवोऽहं' असें ह्मणावयास शिकावयाचें हीच होय. "**नैनं छिंदंति शस्त्राणी नैनं दहति पावकः । न चैनं क्लेदयंत्यापो न शोचयति मारुतः ॥** असा आत्मा मी आहें. मी सर्वव्यापी, सर्वसाक्षी व सर्वशक्तिमान् आहें. या सूत्राचें नित्य पठण करणें यांतच आपला तरणोपाय आहे. 'मी दुर्बल आहें' ही कल्पना आपल्या चित्तास शिवूंही देऊं नका. मी. वाटेल तें करूं शकेन, असें सदोदित आपल्या चित्तास शिकवा. वस्तुस्थिती अशीच आहे. आपणां सर्वांचे आत्मे खरोखर असेच उज्वल आहेत. आपली तशी श्रद्धा नाहीं

यामुळेंच सध्यांच्या दुःखगर्तेत आपण बुचकळ्या खात आहोंत. नाचिकेता-प्रमाणें उत्तम श्रद्धा प्रथम मिळवा. तशी श्रेष्ठ आत्मश्रद्धा तुमच्या सर्वांच्या ठिकाणीं उत्पन्न होवो हीच मागणी मी परमेश्वरापाशीं मागतों. अशी आत्म-श्रद्धा तुह्मांला प्राप्त झाली तर सारें जग हालवून सोडण्याजोगें प्रचंड सामर्थ्यही तुमच्या ठिकाणीं येईल. तुह्मीं प्रत्यक्ष परमेश्वरच बनून जाल. तसें तुह्मीं व्हावें एवढीच माझी इच्छा आहे. अशा प्रकारची आत्मश्रद्धा आणि अशा प्रकारचें श्रेष्ठ प्रतीचें बल हीं तुह्मांस उपनिषद्ग्रंथांतूनच प्राप्त होतील.

उपनिषद्ग्रंथ हे केवळ संन्याशाकरितां आहेत काय ? ते संन्याशाकरितां आहेत असा समज एकेकाळीं होता. पूर्वी संन्याशीच या ग्रंथांचा अभ्यास करीत आणि अभ्यासानंतर ते अरण्याचा आश्रय करीत. श्रीशंकराचार्य थोडे अधिक कनवाळू होते. उपनिषद्ग्रंथांचा अभ्यास गृहस्थांनी करणें हें वाईट नसून त्यापासून त्यांचाही फायदाच होईल असें आचार्यांनीं सांगि-तलें. तथापि उपनिषद्ग्रंथ संन्याशांच्याच उपयोगाचे आहेत व त्यांत अरण्यवासाचाच मार्ग सांगितला आहे ही कल्पना आपला पिच्छा अद्यापीही सोडित नाहीं. ज्यानें वेदग्रंथांस चालन दिलें त्याच भगवान् श्रीकृष्णांनीं गीतेच्याद्वारें श्रुतींचा खरा निष्कर्ष सांगितला आहे हें आपण पक्कें ध्यानांत धरा. श्रुतींचें खरें रहस्य जर कोठें पहावयाचें असेल तर तें भगवद्गीतेंत मात्र आढळून येईल. सर्व धंद्याच्या आणि सर्व आश्रमांच्या लोकांसाठीं भगवद्गीता अवतीर्ण झाली आहे. श्रुतिरहस्यें अरण्यांतून आतां आपल्या घरांत आणलीं पाहिजेत. त्यांना त्यांच्या गुहांतून बाहेर काढून गरिबांच्या झोंपडींत आणि कोळ्यांच्या घरीं व विद्यार्थ्यांच्या खोलींत त्यांचा प्रवेश करून दिला पाहिजे. कोणी कोणताही धंदा करीत असो अथवा कसल्याही स्थितींत राहात असो, भगवद्गीतेनें सर्वांस सारखाच उपदेश केला आहे. उपनिषद्ग्रंथांचीं रहस्यें कोळ्यामाळ्यांस कशीं उपयोगी पडतील याचा मार्ग भगवद्गीतेनें दाखविला आहे. धर्माचा विस्तार अनंत आहे. धर्म अनंतरूप आहे. धर्माच्या कक्षेबाहेर कोणाचाही वास नाहीं. धर्मप्रसारार्थ जो थोडा फार उद्योग तुह्मीं कराल तो तुह्मांस अवश्य फलद्रूप होईल. एखादीच चांगली गोष्ट तुह्मीं मनापासून केली तर तिजपासूनही कल्पनेबाहेर फळ येतें. या-करितां प्रत्येकानें आपल्या हातून होईल तेवढेंच कार्य करण्यास मागेंपुढें

पाहूं नये. गीतेचें रहस्य एखाद्या कोळ्यास सांगितलें तर तो अधिक चांगल्या प्रकारचा कोळी होईल. तें एखाद्या विद्यार्थ्यास समजलें तर तो अधिक चांगला विद्यार्थी होईल. हें तत्त्व सर्वत्र सारखेंच लागू पडतें. या मार्गानें खऱ्या जाती निर्माण होऊं लागतील. समाजांत निरनिराळ्या जाती असाव्या ही गोष्ट केवळ स्वाभाविकच आहे. त्यांतून फक्त विशिष्ट हक्क मात्र नष्ट होतील. जातिभेद उत्पन्न होणें हें स्वाभाविक आहे. समाजांत एखाद्याला एक गोष्ट साध्य होते तर दुसऱ्याला दुसरी साधते. एकच गोष्ट सर्वांस सारखीच साध्य होत नाहीं. समाजाचें अनुशासन करण्याची कला तुह्मांस साध्य झाली तर फाटके जोडे शिवण्याची कला मला साध्य होईल. पण असें असलें तरी एकाहून दुसऱ्यानें अधिक श्रेष्ठ ह्मणण्याचें कारण नाहीं. कारण, परस्परांची कला परस्परांस सारखीच दुःसाध्य आहे. मला जसें अनुशासनाचें कार्य साधणार नाहीं त्याचप्रमाणें जोडे शिवण्याची माझी कला तुह्मांस येणार नाहीं. मी जोडे शिवूं शकतों तर तुह्मीं श्रुतिग्रंथ वाचूं शकतां. पण एवढ्यामुळें तुह्मीं माझ्या मस्तकावर पाय द्यावे असें होत नाहीं. असे विशिष्ट हक्क नष्ट होणें इष्टच आहे. तथापि जातिभेद असणेंही इष्ट आहे. संसारमार्ग सु-कर होण्याचा हाच स्वाभाविक रस्ता आहे. जातिभेद हे सदोदित राहाणारच. ते तुह्मांस कधींही नष्ट करतां येणार नाहींत. ज्या ज्या ठिकाणीं मनुष्यें समाज करून राहतील त्या त्या ठिकाणीं जातिभेद असावयाचाच. तथापि असें असलें तरी विशिष्ट जातींस विशिष्ट हक्क देण्याचें कांहीं कारण नाहीं. हें हक्काचें खूळ साफ मोडून टाकिलें पाहिजे. एखादा मनुष्य कोळ्याचा धंदा करीत असला आणि दुसरा वेदांततत्त्वज्ञाता असला तरी दोघांतही एकाच परमेश्वराचा वास आहे. आपणांस सध्यां जर कशाची जरूर असेल तर ती याच मताच्या प्रसाराची होय. समाजांत सर्वांस सारखेच हक्क मिळाले पाहिजेत. सर्वांच्या ठिकाणचें चैतन्य एकाच स्वरूपाचें आहे, ही गोष्ट सर्वांस शिकविली पाहिजे. हें साध्य झालें ह्मणजे जो तो आपापल्यापरी मुक्तीचा मार्ग आपणच शोधून काढतो. स्वातंत्र्य हा सर्व उन्नतीचा मूळ पाया होय. 'अमक्या मनुष्याला मी मुक्तीचा मार्ग दाखवीन' असें तुह्मांपैकीं कोणी एखादा ह्मणत असेल तर तें त्याचें ह्मणणें सर्वथा चुकीचें आहे. विधवा स्त्रियांच्या स्थितीबद्दल आणि एकंदरीनें सर्व स्त्रियांच्या स्थितीबद्दल माझें मत

काय आहे असा प्रश्न मला वारंवार विचारण्यांत येत असतो. या प्रश्नास मी आतां एकदांच उत्तर देऊन टाकतों. विधवांबद्दल माझें मत तुह्मीं मला विचारतां तें मी विधवा आहें ह्मणून काय? तसेंच स्त्रियांच्या स्थितीबद्दल-ही मला तुह्मीं माझें मत काय ह्मणून विचारावें? मी स्वतः स्त्री आहें काय? स्त्रियांच्या प्रश्नाबद्दल चर्चा करणारे तुह्मीं कोण? सर्व स्त्रीजातीची वासलात तुह्मीं लावूं ह्मणतां पण तसें करण्यास त्यांची सर्व मुखत्यारी तुह्मांकडे आली आहे काय? त्यांचें बरें अथवा वाईट करण्यास तुमच्या आंगीं परमेश्वराचें सामर्थ्य आलें आहे काय? स्त्रिया आपली उन्नति स्वतःच करून घेतील. त्या भानगडींत तुह्मीं पडूं नये हेंच चांगलें. मी अमक्याचें बरें करूं शकेन अथवा वाईट करूं शकेन असें वाटणें हा तुमचा निव्वळ जुलूम आहे. अशी सुलतानी सत्ता तुमच्या हातीं कोणीही दिलेली नाहीं. सर्वांची काळजी परमेश्वरास सारखीच आहे. आपण सर्वज्ञ आहों, असा समज करून घेण्यास तुह्मांस काय अधिकार आहे? परमेश्वराच्या हातांतील सत्ता अशा रीतीनें काढून घेण्यास तुमची छाती तरी कशी होते? असें कर-णारा मनुष्य ईश्वरद्रोहीच समजला पाहिजे. प्रत्येक आत्मा हा परमेश्वराचाच आत्मा आहे ही गोष्ट तुह्मांस ठाऊक नाहीं काय? तुह्मीं आपल्या स्वतःच्या कर्मापुरताच विचार करावा; व स्वतःपुरताच मुक्तीचा मार्ग चोखाळावा हें योग्य आहे. तुमच्या राष्ट्रानें तुमची थोरवी गाइली, तुमच्या समाजानें तुमची मोठी स्तुति केली आणि मूर्खांनीं तुह्मांस धन्यवाद दिले तरी तुमच्या मुक्तीचा मार्ग तुह्मीं स्वतःच चोखाळला पाहिजे. परमेश्वर डोळे मिटून बसलेला नाहीं. तो सदा जागृत आहे; आणि प्रत्येकाला त्याच्या त्याच्या कर्मांच्या फळांची वांटणी तो केव्हां ना केव्हां करीत असतोच.

या जगांतील प्रत्येक पुरुष आणि प्रत्येक स्त्री हीं ईश्वररूप आहेत हें नित्य ध्यानांत धरीत जा. त्यांना मदत करण्याचें सामर्थ्य तुह्मांस नाहीं. फक्त त्यांची नोकरी बजाविण्याचा अधिकार मात्र तुह्मांस आहे. परमेश्वराच्या मुलांची नोकरी बजाविणें हेंच तुमचें कर्तव्य आहे. परमेश्वराची नोकरी बजाविणें हा एक मोठा हक्क आहे. तो हक्क तुह्मांस प्राप्त झाला असेल तर त्याची अंमलबजावणी तुह्मीं करा. परमेश्वराच्या एखाद्या लेंकराला मदत कण्याची पात्रता त्यानें तुमच्या आंगीं ठेविली असेल तर ती त्याची तुह्मांवर मोठीच

कृपा होय. आपण सर्वज्ञ आहों असली वेडी घमेंड कधींही बाळगूं नका. कोणास मदत करण्याची पात्रता तुमच्या आंगीं असेल, तर इतरांच्या आंगीं तीं पात्रता नाहीं ह्मणून तुह्मीं परमेश्वराचे उपकार माना. आणि या हक्काची अंमलबजावणी करितांना आपण त्याचें पूजन मात्र करीत आहों अशी भावना धरा. एखादा अत्यंत दरिद्री मनुष्यही परमेश्वर आहे असेंच समजून केवळ माझ्या स्वतःच्या मुक्तीसाठींच मी मदतीच्या रूपानें त्याचें पूजन करीन. जगांतील गरीब आणि दुःखीकष्टी लोक हे आपल्या मुक्तीसाठींच निर्माण झालेले आहेत. त्यांची नोकरी आपण बजाविली तर परमेश्वराच्या पूजनाचें श्रेय आपणास प्राप्त होईल. रोगांनीं पिडलेले, वेडे झालेले, महारोगी आणि पापी लोक हे याकरितांच निर्माण झालेले आहेत. या सर्वांच्या रूपानें दृश्य होणाऱ्या परमेश्वराची नोकरी बजावतां येणें हा आपल्या जीवितांतील एक मोठा हक्क होय. माझे हे शब्द आपणास धाष्टर्याचे वाटत असतील पण मी आपणास त्रिवार बजावून सांगतों कीं यांची नोकरी बजावितां येणें हा विशेष हक्क आपणास मोठ्या भाग्यानें प्राप्त झाला आहे. इतर लोकांवर सुलतानी अंमल गाजवून तुह्मी त्यांचें बरें करूं शकाल असें तुह्मांस वाटत असेल तर तो तुमचा भ्रम होय. हा भ्रम तुह्मी आतां टाकून द्या. एखाद्या वाढत्या झाडाला खत वगैरे घालून त्याच्या वाढीला ज्याप्रमाणें आपणास हातभार लावतां येतो त्याचप्रमाणें मनुष्यांच्या वाढीलाही अशाच रीतीनें आपणास हातभार लावितां येईल. एखादा वृक्ष ज्याप्रमाणें भूमींतून, पाण्यांतून आणि हवेंतून स्वतःच्या पोषणास लागणारीं द्रव्यें आपणच शोधून घेतो त्याचप्रमाणें प्रत्येक मनुष्यही स्वतःच्या वाढीस आवश्यक असा मार्ग आपणच शोधून काढतो.

सर्व जग प्रकाशमय करून सोडा. जगाला प्रकाशाची जरूर आहे. जगांतील प्रत्येक व्यक्तीला प्रकाश प्राप्त करून द्या. प्रत्येक व्यक्ति परमेश्वराला पोहोंचेपर्यंत आपलें प्रकाशदानाचें कार्य चालू राहिलें पाहिजे. प्रकाशाची जरूर ज्याप्रमाणें गरिबाला आहे त्याचप्रमाणें ती श्रीमंतालाही आहे. किंबहुना श्रीमंताला अधिक प्रकाशाची जरूर आहे. अज्ञ जनांना ज्याप्रमाणें प्रकाशाची जरूर आहे त्याचप्रमाणें सुशिक्षितांनाही ती आहे. किंबहुना हल्लींच्या सुशिक्षितांत दांभिकपणा भयंकर प्रमाणावर वाढला असल्यामुळें त्यांना तर

अधिकच प्रकाश पाहिजे. जग प्रकाशमय करून सोडणें इतकेंच तुमचें कर्तव्य आहे. तेवढें तुह्मीं केलें ह्मणजे त्याचा परिणाम काय होतो हें पाहाण्याचें काम तुमचें नाहीं. त्याचें फळ परमेश्वराकडे सोंपवा.

" **कर्मण्ये वाधिकारस्ते मा फलेषु कदाचन** " असें भगवान् श्रीकृष्णांनीं स्वतःच तुह्मांस सांगितलें आहे. सदोदित कर्तव्य-रत राहून त्याचीं फळें न घेणें हेंच तुह्मांस योग्य आहे.

आमच्या पूर्वजांच्या चित्तांत असल्या उज्ज्वल कल्पना ज्यानें उत्पन्न करून दिल्या तोच आमचा मदतगार होवो, व त्याच्या आज्ञांचें अनुशासन करण्यास आम्हांस सामर्थ्य देवो अशी मी त्याची प्रार्थना करतों.

## आर्यावर्तांतील महर्षी.

आर्यावर्तांतील प्राचीन महर्षींचा उल्लेख करण्याची जेव्हां जेव्हां वेळ मला येते तेव्हां तेव्हां ऐतिहासिक कालाच्याही मागें कित्येक शतकें माझें मन भराऱ्या मारूं लागतें. या कालाचा कसलाही इतिहास आपणास उपलब्ध नाहीं. या कालाच्या पोटांत काय होतें ती दंतकथाही सांगूं शकत नाहींत. प्राचीन आर्यावर्तांत असंख्य महर्षी होऊन गेले. वस्तुतः त्या कालीं आर्यावर्तानें महर्षी उत्पन्न करण्याशिवाय दुसरा उद्योग केलाच नाहीं. याकरितां त्यांतील कांहीं थोड्यांचा नामनिर्देश मात्र मी आपणासमोर आज करणार आहे. ज्यांची बुद्धिमत्ता अत्यंत उज्ज्वल होती व धर्माच्या राज्यांत जे शककर्ते होऊन गेले त्यांजबद्दल माझें ह्मणणें काय आहे तें मी आज आपणास सांगणार आहें. याकरितां प्रथम आपल्या धर्मग्रंथांचीही थोडीशी माहिती करून घेणें इष्ट आहे. सत्यप्रमेयाचे दोन आदर्श आपल्या धर्मग्रंथांनी आपणासमोर ठेविले आहेत. यांपैकीं एक आदर्श अनंतकालाकरितां असून दुसरा आदर्श काल, स्थल आणि परिस्थिति यांस अनुलक्षून आहे. यांपैकीं दुसरा आदर्श पहिल्याप्रमाणें चिरस्थायी स्वरूपाचा नसल्यामुळें त्याचा अधिकारही केवळ परिस्थितीपुरताच आहे. पण असें असलें तरी तेवढ्या परिस्थितीपुरता त्याचा अधिकार सर्वगामी आहे हें

मात्र खरें. आत्मा आणि परमात्मा यांचे चिरकाल संबंध व मनुष्यें आणि परमेश्वर यांजमधील संबंध ज्या धर्मग्रंथांत ग्रथित केले आहेत त्यांना श्रुति असें ह्मणतात. श्रुतींत सांगितलेल्या तत्त्वांचें व्यावहारिक सत्यस्वरूप ज्यांत सांगितलें आहे त्यांस स्मृति असें ह्मणतात. मनु, याज्ञवल्क्य आणि इतर स्मृतिकार यांनीं स्मृतींच्या द्वारें मूलतत्त्वांचें परिस्थित्यनुरूप व्यावहारिक स्वरूप आपल्या ग्रंथांच्या द्वारें सांगितलें आहे. त्याचप्रमाणें त्या सत्य प्रमेयाचें हें दुसरें स्वरूप पुराणग्रंथ आणि तंत्रग्रंथ यांत आढळून येतें. हे दुसऱ्या पायरीचे ग्रंथ श्रुतींहून कमी दर्ज्याचे असून जेव्हां त्यांत व श्रुतींत विरोध येतो तेव्हां त्यांस बाजूस ठेवून श्रुतीच प्रमाण मानल्या जातात. हा नियम सर्वत्र एकसारखाच लागू आहे. यांतील मूळ कल्पना अशी आहे कीं, मनुष्याचा उच्चतम आदर्श आणि तो प्राप्त करून घेण्याच्या साधनाची रूपरेखा एवढी मात्र श्रुतींनीं सांगितली असून त्यांचा तपशील सांगण्याचें काम स्मृती व पुराणें यांजवर सोंपविलें आहे. सामान्यतः श्रुती या आदर्शांचा अंगुलिनिर्देश मात्र करितात. मनुष्याचें अखेरचें साध्य काय आहे व त्याच्या ज्ञानाची परिसीमा कोठें आहे हें श्रुतीनें सांगितलें आहे. मनुष्याला जाणण्यासारखें जें ह्मणून कांहीं आहे तें सर्व श्रुतींनीं सांगितलें असून आत्म्याला पूर्णत्वाकडे मिळणारा मार्गही त्यांनीं पूर्णपणें आंखून ठेविला आहे. परिस्थितीप्रमाणें बदलणारा निरनिराळा तपशील मात्र त्यांनीं सांगितला नाहीं. आणि हा तपशील स्मृतींनीं कालानुरूप अनेक प्रकारें वर्णिला आहे. दुसरी एक विशेष लक्ष्यांत ठेवण्यासारखी गोष्ट ही कीं, श्रुतींचे मंत्रद्रष्टे ऋषि पुष्कळ आहेत. यांत बहुतेक पुरुष व थोड्या स्त्रियाही आहेत. श्रुतिग्रंथ कसे निर्माण झाले याबद्दल कोणतीही माहिती उपलब्ध नाहीं. मंत्रद्रष्टे कोण होते, त्यांचा जन्म कोठें आणि केव्हां झाला याजबद्दल आज आपणास माहिती कळण्यास कांहीं मार्ग नाहीं. तथापि त्यांचे उत्तमोत्तम विचार आणि त्यांचे अत्युच्च शोध यांचें रक्षण श्रुतींच्या द्वारें झालें असून श्रुति हेच आमच्या देशाचे धर्मग्रंथ होत. स्मृतिकर्ते कोण होते याजबद्दल आपणास अधिक माहिती उपलब्ध आहे. हे पुरुषही अत्यंत विशाल बुद्धीचे व जगावर छाप पाडणारे होते. आपल्या धर्मासंबंधीं आणखीही एक गोष्ट विशेष लक्ष्यांत ठेवण्यासारखी आहे, ती ही कीं, आमच्या

धर्मानें परमेश्वर दोन स्वरूपांनीं वर्णिला आहे. त्यांत परमेश्वराचें परस्वरूप जसें सांगितलें आहे तसेंच अपरस्वरूपही सांगितलें आहे. केवळ तत्त्वांचें वर्णन जसें त्यांनीं केलें आहे तसेंच साकार रूपाचेंही वर्णन त्यांनीं केलें आहे. असें आहे तथापि आमचे मूल धर्मग्रंथ जे श्रुति त्यांनीं फक्त निराकाराचेंच वर्णन केलें आहे. साकाराचें वर्णन फक्त स्मृती आणि पुराणें यांत असून त्यांत परमेश्वराचे अवतार व इतर अवतारी पुरुष यांचें वर्णन आहे. येथें आणखीही एक गोष्ट लक्ष्यांत ठेविली पाहिजे ती ही कीं, आपल्या धर्मांवांचून जगांतील इतर धर्मांच्या इमारती कोणातरी व्यक्तीभोंवतीं उभारल्या गेल्या आहेत. त्या धर्मांचे उत्पन्नकर्ते ह्मणून कोणी पुरुष होते. त्या धर्मांची रचना त्या त्या पुरुषाच्या चरित्राबरहुकूम झाली आहे. ख्रिस्तीधर्मांची उभारणी येशूख्रिस्ताच्या जीवनचरित्रानुरूप झाली आहे. तसेंच मुसलमानी धर्मांची रचना महंमदाच्या चरित्रास अनुसरून असून बौद्ध आणि जैन हे धर्म बुद्ध आणि जिन यांच्या चरित्रांस अनुलक्षून रचिले आहेत. अशाच रीतीनें हिन्दुधर्माशिवाय जगांतील इतर साऱ्या धर्मांची उभारणी कोणा ना कोणा व्यक्तीच्या चरित्रास अनुलक्षून झालेली आहे. यामुळें या व्यक्तींच्या व त्यांनीं केलेल्या गोष्टींच्या ऐतिहासिक सत्यतेबद्दल नेहमीं झगडे चालावे हें रास्तच आहे. प्रसंगीं या मोठया व्यक्तींपैकीं एखाद्या व्यक्तीच्या अस्तित्वाबद्दलचा ऐतिहासिक पुरावा कमकुवत झाला तर त्या व्यक्तिगत धर्मांची सारी इमारत धाड् करून ढांसळून पडेल. आमच्या धर्माला मात्र अशा प्रकारची भीति नाहीं. याचें कारण हेंच कीं, आमच्या धर्माची उभारणी व्यक्तीवर झालेली नसून ती तत्त्वांवर झालेली आहे. अमुक एका व्यक्तीनें एखादी गोष्ट सांगितली ह्मणूनच ती आह्मीं खरी मानीत नाहीं. फार काय, पण परमेश्वराच्या प्रत्यक्ष अवतारांनींही एखादी गोष्ट सांगितली तर ती अवतारानें सांगितली एवढ्याचकरितां ती आह्मी खरी मानीत नाहीं. श्रुतींनीं भगवान् श्रीकृष्णांचें वचन आधारादाखल कधींही घेतलें नसून भगवान् श्रीकृष्णांनी मात्र श्रुतींचा आधार घेतला आहे. जें ज्ञान अनंत कालापासून श्रुतींनीं सांठवून ठेविलें होतें तेंच ज्ञान भगवान् श्रीकृष्णांनीं अधिक विशद करून सांगितलें, यांतच त्यांची थोरवी आहे. ते अवतारी होते एवढ्याचकरितां त्यांचें वचन आह्मीं खरें

मानीत नसून त्यांनीं श्रुतींचा अनुवाद केला ह्मणूनच त्यांचें वचन आह्मी प्रमाण मानतों. हीच गोष्ट सर्व अवतारी पुरुषांस सारखी लागू आहे. त्याचप्रमाणें महाज्ञानी ऋषींसही हेंच तत्त्व आह्मी प्राचीन कालापासून लागू केलें आहे. मनुष्याला पूर्णत्व पावण्यास ज्या ज्ञानाची आवश्यकता आहे तें सारें ज्ञान श्रुतींत सांठविलें असून श्रुतिबाह्य असें ज्ञान कोणतेंही उरलेलें नाहीं, हें आमचें पहिलें तत्त्व आहे. कोणीही झाला तरी श्रुतींत नाहीं असें नवें ज्ञान त्याला सांगतां येणार नाहीं. सर्व ज्ञानाचा शेवट पूर्ण एकात्मतेंत होतो. यापलीकडे ज्ञानाची मर्यादा जाणें शक्य नाहीं. ही अखेरची परिसीमा श्रुतींनीं गांठली असल्यामुळें आतां त्यापलीकडे नवें ज्ञान उपलब्ध होणें शक्यच नाहीं. '**तत्त्वमसि**' या महावाक्याचा शोध ज्या दिवशीं लागला त्याच दिवशीं सर्व धर्मज्ञान पूर्णत्व पावलें. '**तत्त्वमसि** या महावाक्याचा शोध श्रुतींनींच लावला आहे. ज्ञानाच्या पूर्णत्वाची सिद्धि अशा रीतीनें झाल्यावर एकच कार्यभाग शिल्लक उरला. देशकालवर्तनानुरूप श्रुतिसिद्धांतांचें व्यवहार्य रूप लोकांस सांगावयाचें इतकेंच काम बाकी राहिलें. मार्ग पूर्वीं आंखून ठेविलाच होता. त्या मार्गानें जावयाचें कसें हें दाखविणारे महापुरुष मात्र हवे होते. हे महापुरुष स्मृतिकार आणि महात्मे यांच्या रूपानें अवतरले. भगवान् श्रीकृष्ण गीतेंत ह्मणतात, '**यदायदाहि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत अभ्युत्थानमधर्मस्य, तदात्मानं सृजाम्यहम् ॥ परित्राणाय साधूनां विनाशायच दुष्कृताम् धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ॥** या वचनांतच अवतारी पुरुषांचें सारें कार्य वर्णिलें आहे. हिंदु धर्माचें स्वरूप याप्रमाणें थोडक्यांत सांगतां येईल.

या विवेचनावरून पुढें काय निष्पन्न होतें त्याचा विचार आतां करूं. एका पक्षीं आमच्या धर्माची उभारणी मुख्यतः सनातन तत्त्वावर झाली असून तीं तत्वें पूर्णपणें स्वावलंबी आहेत. तीं कोणा विशिष्ट पुरुषाच्या अस्तित्वावर अवलंबून नाहींत. एवढेंच नव्हे तर तीं बुद्धिवादावरही अवलंबून नाहींत. त्यांचें सत्यत्व बुद्धिवादानें स्थापन करण्याचीही जरुरी नाहीं. तीं तत्त्वें बुद्धिवादातीत आहेत. आमच्या हिंदुधर्माचें हेंच विशिष्ट स्वरूप आहे. यामुळें वेदांत हाच सर्व जगाचा धर्म होऊं शकेल किंबहुना साऱ्या विश्वाचा धर्म तोच होऊं शकेल असें आह्मी निश्चितपणें मानतों.

किंबहुना विश्वव्यापि धर्म साऱ्या जगांत तोच एक आहे असें आह्मी ठांसून सांगतों. कारण, तो धर्म कोणाही व्यक्तीची महति गात नसून फक्त तत्त्वांचें दर्शन मात्र तो करतो. एखाद्या विशिष्ट व्यक्तीभोंवतींच ज्या धर्माची सारी रचना झाली असेल तो धर्म साऱ्या मानवकुलास सारखाच ग्राह्य होणें शक्य नाहीं. केवळ आपल्याच देशापुरता विचार केला तरीही हाच प्रकार आढळून येतो. आजपर्यंत आमच्या एकाच देशांत कितीतरी महात्मे होऊन गेले आहेत. पण या सर्वांस सर्व जनता सारखीच पूज्य समजते काय? एखाद्या लहानशा गांवांतही एकाच व्यक्तीला सारा गांव पूज्य समजत नाहीं. तेथेंही निरनिराळ्या व्यक्तींचे निरनिराळे भजक आढळून येतात. मनुष्यस्वभावच असा आहे. मग अशा स्थितींत महंमद किंवा बुद्ध किंवा ख्रित यांपैकीं कोणताही एकच महात्मा साऱ्या जगास कसा पूज्य होणार? किंबहुना एकाच मनुष्यानें सांगितलेलीं नीतितत्त्वें आणि धर्म हीं खरीं असतीलच असा काय भरंवसा आहे? वेदान्तधर्मासंबंधीं पाहातां त्यांतील तत्त्वांचा सत्यपणा अशा रीतीनें कोणत्याही एकाच व्यक्तीवर अवलंबून नाहीं. मानवजातीच्या अनंत स्वभावावर त्या धर्माची उभारणी झाली आहे. मानवी मनांत अनंत कालापासून ज्या तत्त्वांचा संभव आढळून येतो, त्या तत्त्वांवरच वेदान्ताचें नीतिशास्त्र रचिलें गेलें आहे. त्यांत जें कांहीं सांगितलें आहे तें सर्व पूर्वींच्या जुन्या अनुभवाचेंच आहे. त्यांतील कोणत्याही तत्त्वाचा अनुभव आतां नवीन घ्यावयाचा आहे असें नाहीं. दुसरीही एक गोष्ट आमच्या प्राचीन ऋषिवर्यांच्या मनांत प्राचीनकालींच येऊन चुकली होती. ती गोष्ट ही कीं, मानवजातीच्या बऱ्याचशा भागास कोणीतरी व्यक्ति इष्ट ह्मणून असावी लागते. कोणत्या ना कोणत्यातरी स्वरूपाच्या व्यक्त परमेश्वरावांचून अव्यक्तरूपाची ओळख मनुष्यजातीच्या बऱ्याच भागास होणें शक्य नाहीं. याकरितां व्यक्त परमेश्वराची आवश्यकता आपोआपच उत्पन्न होते. अशा स्थितींत परमेश्वराचें भलभलतें रूप कल्पून त्याची पूजा करण्यापेक्षां आपणांतील चालत्या बोलत्या आणि जिवंत अवतारी पुरुषांची पूजा करणें अधिक इष्ट नाहीं काय? केवळ परमेश्वराचीं कल्पिलेलीं रूपें कित्येक वेळीं इतकीं हिडिस असतात कीं, त्यांची पूजा करणें अगदीं अनिष्ट असतें. असल्या स्वरूपांची पूजा करण्यापेक्षां अवतारी

पुरुषच पूजेला शतपट अधिक योग्य आहेत. तुह्मां आह्मां सारख्या सामान्य लोकांच्या मनांत परमेश्वरस्वरूपाची केवढीही उच्च कल्पना उत्पन्न झाली तरी भगवान् श्रीकृष्ण हे त्या कल्पनेहूनही अधिक उच्च आहेत, यांत संशय नाहीं. अशाच रीतीनें भगवान् बुद्धही अत्यंत उच्च पुरुष होत. याकरितां केवळ काल्पनिक देवदेवतांची पूजा करीत बसण्यापेक्षां अशा अवतारी पुरुषांची पूजा करणें अधिक चांगलें. ही गोष्ट मनुष्यस्वभावालाही पटलेली असल्यामुळें अशा अवतारी पुरुषांच्या मागें झुंडीच्या झुंडी धांवतात हें आपण नित्य पाहतों. मनुष्यस्वभावाचा हा विशेष आमच्या पूर्वकालीन ऋषींच्या लक्ष्यांत आला होता. यामुळें आमच्या धर्मांत अवतारी पुरुषांचें पूजन करण्यास त्यांनीं आगाऊच परवानगी देऊन ठेविली आहे. महाअवतारी भगवान् श्रीकृष्ण तर याही पुढें गेले आहेत. ते ह्मणतात, '**यद्यत् विभूति मत्सत्वं श्रीमदूर्जितमेव वा। तत्तदेवावगच्छत्वं मम तेजोंश संभवम्**' ज्या ज्या ठिकाणीं विशेष तेज आढळून येईल त्या त्या ठिकाणीं माझ्याच तेजाचा संभव झाला आहे असें श्रीकृष्णांनीं ह्मटलें आहे. यावरून जगांतील कोणत्याही अवताराची पूजा करण्याची मोकळीक आमच्या प्राचीन ऋषिवर्यांनीं व अवतारी पुरुषांनीं कशी ठेविली आहे हें दिसून येईल. जगांतील कोणीही महात्मा कोणत्याही देशांत जन्मला असला तरी आह्मां हिंदूंस त्याचें पूजन करण्यास आडकाठी नाहीं; आणि आजमितीसही प्रत्यक्ष अनुभव असाच आहे. आमच्यापैकीं कितीतरी हिंदुलोक नित्यशः कितीतरी मुसलमानी आणि ख्रिस्ती महात्म्यांस प्रत्यक्ष भजत असतात. असें असणें हें सर्वथा योग्यच आहे. कारण, आमचा धर्म हा विश्वव्यापी धर्म आहे. तो साऱ्यांसच आपल्या पोटांत घेण्यास तयार आहे. जगांतील सर्व आदर्श आपले ह्मणणें, इतकें त्याचें अंतःकरण उदार आहे. जगांतील सर्व आदर्श आमचे ह्मणण्याइतकेंच औदार्य आमच्या धर्मापाशीं आहे असें नसून जगांतील पुढें होणारे आदर्शही आमच्यांत अंतर्भूत करण्याची त्याची तयारी आहे. पूर्वीच्या, सांप्रतच्या आणि भविष्यत् कालच्या सर्व आदर्शांस आणि धर्मांस आलिंगन देण्याइतके वेदान्तधर्माचे बाहु विशाल आहेत.

महात्मे आणि अवतारी पुरुष यांजबद्दल आमच्या धर्माचें काय मत आहे हें येथवर सांगितलें. आतां येथून खालच्या प्रतीच्या व्यक्तीविषयीं

त्याचें काय ह्मणणें आहे, याचा विचार करूं. ऋषि हा शब्द श्रुतींत वारंवार आढळून येतो. सांप्रतकाळीं ऋषि हा शब्द अगदीं सामान्य होऊन बसला आहे. ऋषि याचा अर्थ अधिकारयुक्त पुरुष असा आहे. ऋषि ह्मणजे मंत्र-द्रष्टा. धर्मतत्त्वांच्या खरेपणाला पुरावा काय ? हा प्रश्न फार प्राचीनकाळीं उत्पन्न झाल्याचें दिसून येतें. या प्रश्नाला ' इंद्रियगम्य असा पुरावा नाहीं' असें स्पष्ट उत्तर देण्यांत आलें आहे. **'यतो वाचो निवर्तंते अप्राप्य मनसा-सह' ' न तत्र चक्षुर्गच्छति न वाग् गच्छति नो मनः '** ज्या ठिकाणीं डोळे पाहूं शकत नाहींत, जिव्हा बोलूं शकत नाहीं आणि मन पोहोंचूं शकत नाहीं असें तें तत्त्व आहे असें उत्तर अनंत कालापासून देऊन ठेवण्यांत आलें आहे. आत्म्याच्या अस्तित्वाविषयीं, परमेश्वराच्या अनंतत्वाविषयीं आणि मनुष्याच्या अंतिम साध्याविषयीं बाह्य जगाला केलेल्या प्रश्नांचीं उत्तरें ते देऊं शकत नाहींत. मानवी मन सदोदित बदलत असतें. त्याला स्थैर्य कसें तें ठाऊकच नाहीं. दरक्षणीं त्याचे शतशः तुकडे होत असल्यानें तें मर्यादित आहे. मग तें अमर्यादास कसें जाणार ? तसेंच बाह्य जगही मर्यादित आणि क्षणोक्षणीं बदलणारें असल्यामुळें तें तरी अनंत, अविभाज्य आणि केव्हांही न बदलणाऱ्या अशा स्वरूपाबद्दल काय सांगणार ? त्याला कांहीं सांगतां येणें शक्यच नाहीं. केवळ बाह्य जगांत गुरफटून राहून या प्रश्नाचें उत्तर देण्याची खटपट ज्यांनीं ज्यांनीं केली त्यांची अवस्था किती शोचनीय झाली हें इतिहास आपणास स्पष्टपणें सांगत आहेच. मग श्रुतींनीं सांगितलेल्या ज्ञानाचा प्रत्यय कसा येणार ? स्वतः ऋषि होऊनच असा प्रत्यय घेतां येईल. कारण, हें ज्ञान इंद्रियगत नाहीं. इंद्रियलोलुपता हेंच मानवजातीचें अंतिम साध्य आहे काय ? तें आहे असें ह्मणण्याची छाती कोण करील ? आपणासारख्या सामान्य मनुष्यांच्या चरित्रक्रमांतही कित्येक वेळां मोठे विलक्षण प्रसंग येत असतात. कित्येक वेळां आपल्या प्रेमाचा विषय मृत्युमुखीं जात आहे असें उघड्या डोळ्यांनीं आपणास पहावें लागतें. कित्येक वेळां आनंदाचा सोहळाही आपण उपभोगितों. कित्येक वेळां आपल्या चित्तांत शांतीचें साम्राज्य असतें तर दुसऱ्या कित्येकवेळां एखाद्या भयंकर आघातानें त्याची खळबळ उडून गेलेली असते. त्याचप्रमाणें कित्येक वेळां क्षणैक आपलें चित्त अत्यंत शांत होत्सातें आपल्या खऱ्या रूपाचा

अनुभव घेतें. ज्याठिकाणीं शब्द अथवा मन पोहोंचूं शकत नाहीं अशा ठिकाणीं क्षणैक आपण गमन करितों. आपल्या सामान्य आयुष्यक्रमांतही असा अनुभव आपणास येत असतो. या वेळीं क्षणैक आपण ऋषींच्या पदवीला पोहोंचत असतों. अभ्यासानें हेंच क्षण अधिकाधिक लांबविण्याचें काम आपणास करावयाचें आहे. आत्मा हा इंद्रियांनीं बद्ध केलेला नाहीं, ही गोष्ट फार प्राचीनकाळीं आमच्या ऋषींच्या लक्ष्यांत आली होती. आत्मा मनानें अथवा बुद्धीनेंही बद्ध झालेला नाहीं. तो नुसत्या जाणीवनेंही बद्ध झालेला नाहीं. जाणीव ही अनंत सांखळींतील केवळ एका दुव्याप्रमाणें मात्र आहे. जाणीव ह्मणजे आत्मा नसून आत्म्याचा तो एक भाग मात्र आहे. धीर पुरुषच या जाणीवेपलीकडे उड्डाण करून आत्मरूपीं तल्लीन होतात. जाणीव इंद्रियबद्ध आहे. याकरितां चिन्मय जगाची ओळख करून घेऊन त्यांतील सत्यें आपणास जाणावयाचीं असतील तर इंद्रियें आणि जाणीव यांच्यापलीकडे आपण गेलें पाहिजे. यांच्यापलीकडे जाणारे पुरुष आजमितीलाही हयात आहेत. सत्यप्रमेयांशीं त्यांची प्रत्यक्ष भेट झाली असल्यानें त्यांस ऋषि अथवा मंत्रद्रष्टे अशी संज्ञा प्राप्त झाली.

याकरितां आमच्या ज्ञानरत्नांचें सत्यत्व अनुमानाच्या अथवा तर्कांच्या पुराव्यावर अवलंबून नसून तें प्रत्यक्ष पुराव्यावर अवलंबून आहे. माझ्यासमोर असलेल्या या टेबलाच्या अस्तित्वाविषयीं मला अनुमान करावें लागत नाहीं. कारण, तें मी प्रत्यक्ष पाहात आहें. त्याचप्रमाणें ज्यांनीं हीं ज्ञानतत्त्वें प्रत्यक्ष पाहिलीं त्यांनींच तीं सांगून ठेविलीं आहेत. ज्याप्रमाणें माझ्या इंद्रियद्वारा या टेबलाचें ज्ञान मला होतें त्याचप्रमाणें मानवी आत्म्याच्या विचारातीत स्थितींत त्याला धर्मतत्त्वांचें प्रत्यक्ष ज्ञान होतें. ही ऋषित्वाची स्थिति कालस्थलानें अथवा लिंगादि भेदानें निगडित नाहीं. कोणत्याही काळीं, कोणत्याही स्थळीं आणि कोणत्याही वयाच्या अथवा जातीच्या मनुष्यास ती प्राप्त करून घेतां येते. या स्थितीवर आर्य, अनार्य आणि म्लेच्छ या सर्वांचा सारखाच हक्क आहे, असें श्री वात्स्यायनांनीं स्पष्ट सांगितलें आहे. वेदांत ज्या ऋषींचें वर्णन आहे त्यांनीं अशी स्थिति प्राप्त करून घेतली होती. आमच्या हिंदु धर्माचें अखेरचें साध्य हेंच आहे, हें नित्य लक्ष्यांत ठेविलें पाहिजे. आमचें अखेरचें साध्य काय आहे हें जगांतील इतर देशांनींही लक्ष्यांत ठेविलें तर

जगांतील पुष्कळशा धार्मिक तंट्याबखेड्यांस आळा बसेल. धर्म हा कोठें पुस्तकांत गुंतून राहिलेला नाहीं. तो नुसत्या उपपत्तींत अथवा मतांतही नाहीं. त्याचप्रमाणें केवळ शाब्दिक वादविवाद करून अथवा बुद्धीच्या आणि तर्कांच्या पगडा चालवून तो प्राप्त होणारा नाहीं. धर्म ह्मणजे प्रत्यक्ष अनुभव. आपणापैकीं प्रत्येकजण ऋषि होऊन धर्मतत्त्वांची व आपली प्रत्यक्ष भेट होईपर्यंत आपण धर्ममार्गास लागलोंच नाहीं हें नित्य लक्ष्यांत ठेवावें. जोंपर्यंत विचारातीत स्थितीच्या मंदिराचे दरवाजे खुले झाले नाहींत, तोंपर्यंत धर्म ह्मणजे वायफळ बडबड मात्र होय; तोंपर्यंत ती केवळ आगाऊ तयारी होय. आपण तोंपर्यंत केवळ उसन्या आणलेल्या तत्त्वावर वादविवाद करीत असतों. भगवान् बुद्ध यांचा कांहीं ब्राह्मणाशीं एकावेळीं वादविवाद झाला. त्याचा विषय ब्रह्मस्वरूप हा होता. भगवान् बुद्धांनीं एका ब्राह्मणाला विचारलें, " ब्रह्म तूं स्वतः पाहिलें आहेस काय ? " ब्राह्मणानें उत्तर दिलें, ' नाहीं. ' बुद्ध ह्मणाले, ' तुझ्या वडिलांनीं तरी तें पाहिलें होतें काय ? ' ब्राह्मणानें पुन्हां ' नाहीं ' असेंच उत्तर दिलें. यावर भगवान् बुद्ध पुन्हाः ह्मणाले, ' बरें; तें तुझ्या आजोबांनीं तरी पाहिलें होतें काय ? ' ब्राह्मण ह्मणाला, ' त्यांनींही पाहिलें नसावें असें वाटतें. ' ब्राह्मणाचीं हीं उत्तरें ऐकून भगवान् बुद्ध त्याला ह्मणाले, ' माझ्या मित्रा, जें तूं स्वतः, तुझ्या बापानें अथवा तुझ्या आजानेंही पाहिलें नाहीं, आशाबद्दल शुष्क वादविवाद तुह्मी कसा करतां, याचेंच मला मोठें नवल वाटतें. आज सारें जग अशाच प्रकारचीं भांडणें भांडत आहे. नुसत्या बहुभाषणानें आत्मप्राप्ती होत नाहीं; किंवा ती अत्यंत विशाल बुद्धीनेंही होत नाहीं किंवा ती प्रत्यक्ष श्रुतीच्या अभ्यासानेंही होत नाहीं, असें खुद्द श्रुतींनींच सांगितलें आहे. आमचीं सारीं धार्मिक भांडणें फुकट आहेत. परमेश्वराबद्दल मोठमोठीं व्याख्यानें आह्मी झोडतों, पण त्याची प्रत्यक्ष भेट आह्मीं घेतली आहे काय ? जर तशी प्रत्यक्ष भेट आह्मीं घेतली नसेल तर आमचा सारा धर्मोपदेश ह्मणजे तोंडाची नुस्ती वाफ होय. आह्मीं काय बोलतों, हें वस्तुतः आमचें आह्मांसच ठाऊक नाहीं. ज्या दिवशीं परमेश्वराशीं आमची प्रत्यक्ष भेट होईल त्या दिवशीं धर्मप्रचाराच्या कार्यार्थ तंटे करण्याचें आह्मीं आपोआपच सोडून देऊं. कारण, त्या दिवशीं आमच्या चेहऱ्यावर सत्य स्वतःच प्रगट होईल.'

एकेवेळीं एका ऋषिवर्यांनीं आपल्या मुलास ब्रह्मज्ञान संपादन करण्यासाठीं बाहेर पाठविलें. मुलगा परत आल्यावर बापानें त्याला विचारलें, ' मुलां, तूं काय शिकलास ? ' मुलानें अनेक शास्त्रांचीं नांवें सांगितलीं. त्याचें उत्तर ऐकून बाप ह्मणाला, ' तर मग तूं कांहींच शिकला नाहींस. याकरितां परत जाऊन आणखी शीक. ' बापाच्या आज्ञेप्रमाणें मुलगा परत गेला आणि कांहीं काळानें पुन्हां बापाकडे आला. बापानें तोच प्रश्न त्याला केला आणि मुलानेंही तेंच उत्तर पुन्हां दिलें; पण त्यानें बापाचें समाधान न होतां त्यानें आणखी एकवार आपल्या मुलाला परत पाठविलें. तिसऱ्या खेपेस मुलगा परत आला; तेव्हां त्याच्या चेहऱ्यावरून ब्रह्मतेज स्पष्ट उमटून राहिलें होतें. मुलाकडे पाहून बाप ह्मणाला, ' मुला, आज मात्र तूं ज्ञाता झालास ही गोष्ट खरी.' ज्या वेळीं परमेश्वराची व आपली भेट होईल त्यावेळीं आपला सारा नूर बदलून जाऊन आपल्या आवाजांतही फरक पडेल. आपलें अस्तित्व हें मानवजातीला कल्याणप्रद होईल. ऋषीच्या विरुद्ध जाण्यास कोणासही सामर्थ्य उरणार नाहीं. हें ऋषित्व संपादन करणें हेंच आमच्या धर्माचें अखेरचें साध्य होय. हाच आमचा आदर्श होय. याखेरीज दुसरें जें कांहीं शिल्लक राहील त्याची किंमत आगाऊ तयारीहून अधिक नाहीं. चौदा विद्या आणि चौसष्ट कला हीं सारीं धुळपाटीच्या शिक्षणासारखीं आहेत. तात्त्विक वादविवाद आणि द्वैत अथवा अद्वैताचे वादविवाद यांना आगाऊ तयारीवांचून दुसरी अधिक किंमत नाहीं. या गोष्टी केवळ दुसऱ्या-प्रतीच्या आहेत. ब्रह्मज्ञान हेंच काय तें मुख्य महत्त्वाचें आहे. ज्या ज्ञानानें आह्मांस आत्मदर्शन प्रत्यक्ष होतें तेंच ज्ञान खरोखर विद्या या संज्ञेस पात्र असून बाकीचीं सारीं शास्त्रें कमी प्रतीचीं होत. अशा रीतीनें जे प्रत्यक्ष ब्रह्मवेत्ते झाले होते त्यांनाच ऋषि अशी संज्ञा श्रुतींत दिली आहे. आपल्या चालू आयुष्यांत हें ऋषिपण प्राप्त करून घेणें हेंच आह्मां हिंदूंचें कर्तव्य आहे. कोणत्याही विशिष्ट मतावर भरंवसा ठेवला अथवा हजारों देवळांत आपण गेलों अथवा जगांतल्या साऱ्या नद्यांत आपण बुड्या मारल्या तरी आपण धार्मिक होऊं शकणार नाहीं. ऋषि अथवा मंत्रद्रष्टे होणें हेंच आपलें अखेरचें साध्य; हाच धर्म, हेंच खरें स्वातंत्र्य आणि हीच खरी मुक्ति.

श्रुतिकालानंतरचा विचार करतां त्यापुढील कालांतही जग हालवून सोडणारे अनेक अवतार जन्मास आल्याचें आढळून येतें. असे अवतार

अनंत असल्याचें भागवतांत सांगितलें आहे. या अनेक अवतारांपैकीं राम आणि कृष्ण यांचें पूजन हिंदुस्थानांत मोठया प्रमाणावर केलें जातें. राम हा जुन्या काळचा अवतार आहे. राम हा सत्याचा आणि नीतीचा आदर्श आहे. तसेंच पुत्र कसा असावा, पति कसा असावा आणि पिता कसा असावा हें-ही रामचरित्रानें दर्शित झालें आहे. तसेंच राजाचा आदर्शही रामचरित्रांत स्पष्ट दिसून येतो. हें रामचरित्र श्रीवाल्मीकि नांवाच्या महर्षीनीं आपणांस सांगितलें आहे. रामायणाइतकी सुंदर, सोपी, शुद्ध आणि पवित्र भाषा दुसऱ्या कोणत्याही ग्रंथांत सांपडणार नाहीं. सीतेचें जें चित्र श्रीवाल्मीकीनें रेखाटलें आहे त्याबद्दल तर बोलावयासच नको. जगांत आजपर्यंत जितके लेख लिहिले गेले असतील ते सारे धुंडाळून पालथे घातले तरी त्यांत दुसरी सीता आढळावयाची नाहीं असें मी निश्चयानें ह्मणतों. सीता ही जगांत एकदांच होऊन गेली आणि तिची प्रतिमा पुन्हां केव्हांही जगांत निर्माण झाली नाहीं. आजपर्यंत राम अनेक होऊन गेले असतील पण सीता मात्र एकच झाली. खरी आर्य-स्त्री कशी असावी याचा नमुना पाहणें असेल तर सीतेकडे पहा. स्त्रीचें पूर्णत्व कोणत्या गुणांत आहे हें जाणावयाचें असेल तर तें सीतेच्या चरित्रांतून शिका. आज हजारों वर्षें आ–सेतु–हिमाचल सीता ही आर्यावर्तांतील लहानथोरांच्या पूजेचा विषय होऊन बसली आहे. या स्थितींतच ती सदोदित राहील. स्वतः पवित्रतेहून पवित्र आणि शांत-तेहून शांत अशी ही सीतेची मूर्ति आहे. तोंडांतून एक ब्र सुद्धां न काढतां जन्मभर तिनें दुःखें भोगिलीं. अशा स्थितींतही साऱ्या जन्मभर ती पतिपरा-यण राहिली. आर्यावर्तांतील जनतेसमोर ती आदर्शवत् होऊन राहिली आहे. ती प्रत्यक्ष देवांसही आदर्शवत् आहे. सीता कशी होती हें आमच्या हृदयांत इतकें भिनून गेलें आहे कीं, तिजबद्दल आतां अधिक बोलण्याचें कारणच कोणास उरलें नाहीं. आमचे सर्व पुराणग्रंथ नष्ट झाले, आमचे श्रुतिग्रंथ काळाच्या पोटांत गेले आणि संस्कृत भाषा समूळ नाहींशी झाली तथापि जोंपर्यंत पांच चार हिंदु तरी जिवंत असतील तोंपर्यंत सीतेची कथा त्यांच्या तोंडून तुह्मांस ऐकावयास मिळेल. सीतेचें चरित्र हिंदु कुलाच्या रोमरोमांत भिनून गेलें आहे. हिंदु स्त्रीपुरुषांच्या हृदयांत सीतेनें कायमचें स्थान मिळविलें आहे. आह्मीं सर्व तिचींच लेंकरें आहोंत. सीतेहून भिन्न

अशा आदर्शांच्या नमुन्यावर आमच्या स्त्रीजातीची सुधारणा करण्याचा यत्न कोणी केला तर तो यत्न निष्फळ होईल या गोष्टीचा प्रत्यय आपणास प्रत्यहीं येत आहेच. हिंदुस्थानांतील स्त्रियांनीं सीतेच्या मार्गानें जावें आणि अखेर सीता व्हावें हेंच युक्त आहे.

यानंतर भगवान् श्रीकृष्ण हेही अनेकप्रकारें आमच्या पूजनाचा विषय होऊन बसले आहेत. हा अवतार हिंदुस्थानांत आबालवृद्धांस सारखाच पूज्य आहे. इतर अवतार हे परमेश्वराचे केवळ अंशावतार असून भगवान् श्रीकृष्ण हे पूर्णावतार आहेत असें भगवद्गीताकारांनीं ह्मटलें आहे. भगवान् श्रीकृष्णांच्या चरित्रांतील अनेक भागांचें अवलोकन केलें तर भगवद्गीता-कारांचें हें ह्मणणें अतिशयोक्तीचें नाहीं असें लक्ष्यांत येईल. भगवान् श्रीकृष्ण हे जसे पूर्ण संन्याशी होते तसेच ते पूर्ण गृहस्थाश्रमीही होते. त्यांच्या ठिकाणीं रजोगुणांचें अस्तित्व पुष्कळ मोठया प्रमाणावर सांपडत असूनही ते पूर्ण त्यागी होते. भगवद्गीतेचा सांगोपांग अभ्यास केल्याशिवाय श्रीकृष्ण-चरित्राचें रहस्य समजणें कधींही शक्य नाहीं. कारण, भगवद्गीतेंत जो उ-पदेश त्यांनीं केला आहे त्याचें प्रत्यक्ष स्वरूप खुद्द त्यांनीं आपल्या चरित्रांत स्पष्ट करून दाखविलें आहे. प्रत्येक अवताराची हीच गोष्ट आहे. ज्या तत्त्वांचा उपदेश त्या अवतारांनीं केला तीं तत्त्वें आपल्या अवतारकार्यांत त्यांनीं प्रत्यक्ष आचरून दाखविलीं. भगवान् श्रीकृष्णांनीं गीता उपदेशिली आणि सर्व आयुष्यभर त्यांतील तत्त्वांचा आचारही प्रत्यक्ष करून दाखविला. कर्मफल-त्यागी कसा असावा याचा इतका उत्कृष्ट नमुना दुसरा कोठेंही सांपडावयाचा नाहीं. त्यांनीं सिंहासनाचा त्याग केला आणि राज्याबद्दलचा विचार त्यांस कधीं शिवलाही नाहीं. त्यांच्या एका शब्दाबरोबर हिंदुस्थानांतील राजमुकुट ढांसळून पडत होते; असें असतांही स्वतः राजा होण्याची इच्छा त्यांनीं केली नाहीं. गोपगोपींबरोबर खेळणारा लहानपणाचा साधा कृष्ण अखेरपर्यंत तसाच साधा राहिला. गोपींब-रोबर त्यांनीं केलेल्या क्रीडा हा त्यांच्या चरित्रांतील अत्यंत रहस्य-मय भाग आहे. स्वतः अत्यंत शुद्ध आणि पवित्र होईपर्यंत हें रहस्य जाण-ण्याचा यत्नही कोणी करूं नये. वृंदावनांत त्यांनीं केलेल्या क्रीडा ह्मणजे प्रेमाचें अत्यंत उज्ज्वल रूप होय. प्रेमामृताचें आकंठ पान करून जो शुद्ध

वेडा बनून गेला असेल त्यालाच हें रहस्य समजेल. हें रहस्य सामान्य मनुष्याच्या लक्ष्यांत कधींही यावयाचें नाहीं. गोपींच्या प्रेमाचें स्वरूप जाणणें कोणास शक्य आहे ? तें प्रेम ह्मणजे प्रेमाचा शुद्ध आदर्श आहे. ज्या प्रेमाला दुसऱ्या कशाचीही जरूर नाहीं, ज्या प्रेमाला स्वर्गाचीही आसक्ति नाहीं आणि ज्या प्रेमाला ऐहिक अथवा कोणत्याही पारलौकिक सुखाची अपेक्षा नाहीं असें तें निर्व्याज प्रेम आहे. व्यक्त आणि अव्यक्त यांजमधील भांडणांस गोपींच्या या प्रेमानें अखेरचा तिलांजुली दिला आहे. व्यक्त परमेश्वर हा मानवकोटींचें अखेरचें साध्य होय. तसेंच अव्यक्त परमेश्वर हा फक्त तत्त्वदृष्टया मात्र जाणतां येतो. सर्व विश्व हें अव्यक्त परमेश्वराचें व्यक्तरूप आहे, असें तत्त्वज्ञान सांगतें. तत्त्वदृष्टया हें अव्यक्त रूप खरें असलें तरी आमच्या मानवी मनाची रचना अशी आहे कीं, आह्मांस कोणतेंही रूप व्यक्त झाल्यावांचून त्याची प्रचीती होत नाहीं. आमचें अंतःकरण कोणत्यातरी व्यक्त रूपाच्या पादारविंदीं वाहिल्यावांचून आह्मां मनुष्याचें समाधानच होत नाहीं. याकरितां सामान्य मानवीमनाच्या दृष्टीनें पाहतां व्यक्त परमेश्वर हेंच त्याचें अखेरचें साध्य असावें असें त्यांस वाटतें. असें असलें तथापि पुष्कळ वेळां त्यामुळें आमच्या बुद्धीला विलक्षण घोंटाळाही पडतो. हा फार पुरातन कालाचा प्रश्न आहे. याचा वादविवाद ब्रह्मसूत्रांतही आढळतो. याच प्रश्नावर द्रौपदीनें युधिष्ठिराशीं वाद केला आहे. व्यक्त परमेश्वराचें अस्तित्व सत्य असेल आणि तो परमेश्वर दयामय आणि सर्वशक्तिमान् असेल तर या जगाला जें नरकाचें स्वरूप प्राप्त झालेलें दिसतें तें कां ? त्यानें हें जग उत्पन्न कां केलें ? तसेंच या जगांत एक लहान आणि एक मोठा, असा भेद कां दिसतो ? अशा प्रकारच्या अनेक प्रश्नांनीं आमची बुद्धि घोटाळ्यांत पडते. या पश्नाला गोपींनीं उत्तर दिलें आहे. गोपींच्या प्रेमांत या अनेक प्रश्नांचा उलगडा सांपडतो. भगवान् श्रीकृष्णांच्या ठिकाणीं कोणत्याही गुणांचा आरोप त्यांनीं केला नाहीं. ते ह्या जगाचे उत्पन्नकर्ते होते कीं काय ? तसेंच ते सर्वशक्तिमान् होते कीं काय ? इत्यादी अनेक प्रश्नांचा विचार गोपींच्या चित्तास कधीं शिवलाही नाहीं. भगवान् श्रीकृष्ण प्रेमस्वरूप होते एवढीच गोष्ट त्यांना कळत होती. वृंदावनांतील प्रेममय खेळगडी या एकाच स्वरूपाची त्यांनीं ओळख करून घेतली. भगवान् श्रीकृष्ण, राजांचे महाराजे असले

अथवा प्रचंड दळभारांचे सेनानी असले तरी गोपींच्या दृष्टींनीं ते केवळ वृंदावनांतील साधे गोप मात्र होते. मुत्सद्दी कृष्ण, सेनानी कृष्ण, राज्यांच्या घडामोडी करणारा कृष्ण इत्यादि कृष्ण त्यांस ठाऊक नसून फक्त गोपाल-कृष्ण मात्र त्या जाणत होत्या. त्यांना संपत्तीची जरूर नव्हती, त्यांना विद्वत्तेची जरूर नव्हती अथवा त्यांना स्वर्गसुखाचीही आकांक्षा नव्हती. फार काय, पण मुक्तीचीही इच्छा त्यांस नव्हती. पुनःपुनः जन्म घ्यावा लागला तरी तुझ्या प्रेमाचें सुख दे इतकीच परमेश्वरापाशीं त्यांची मागणी होती. त्यांचें प्रेम केवळ प्रेमासाठींच होतें. त्यांच्या मोबद-ल्यांत दुसऱ्या कशाचीही अपेक्षा त्यांनीं केली नाहीं. कोणतेंही कार्य केवळ कर्तव्य ह्मणून करा आणि त्यापासून कोणत्याही फलाची अपेक्षा करूं नका असा उपदेश भगवान् श्रीकृष्णांनींच प्रथम केला. मानवकुलाच्या इतिहा-सांत आर्यावर्ताच्या कर्मभूमीवर हा उपदेश भगवान् श्रीकृष्णाच्या मुखानें यावेळीं प्रथम अवतीर्ण झाला. भीतिमूलक आणि लोभमूलक धर्म या वेळे-पासून निःशेष नाहींसे झाले. नरकाची प्राप्ती होऊं नये या भीतीनें अथवा स्वर्गाची प्राप्ती व्हावी या लोभानें केलेलें धर्माचरण हा खरा धर्मच नव्हे, हें तत्त्व प्रथम या वेळीं पुढें आलें. कर्तव्य ह्मणून काम करावें आणि केवळ प्रेमासाठींच प्रेम करावें हा धर्माचा उच्चतर आदर्श प्रथम यावेळीं अस्ति-त्वांत आला.

हें प्रेमाचें स्वरूप किती गंभीर आहे ! गोपींच्या प्रेमाचें स्वरूप समजणें अत्यंत कठिण आहे, असें मी नुकतेंच ह्मटलें आहे. वृंदावनांतील हें अत्यंत रहस्यमय चरित्र न समजणारे असे शेंकडों मूर्ख लोक आमच्यांत आहेत. स्वतः अत्यंत अशुद्ध असल्यामुळें या चरित्रांतूनही विकृत असें प्रेमाचें स्वरूप ते पाहातात. असल्या मूर्खांना मला इतकेंच सांगावयाचें कीं, बाबांनों, अगोदर तुह्मीं स्वतः पवित्र व्हा. गोपींच्या प्रेमाची कथा शुकदेवानें गाइली आहे हें प्रथम ध्यानांत ठेवा. व्यासपुत्र शुक हा जन्मादारभ्यच पवित्र होता. इंद्रियजन्य सुखाचा स्पर्श त्याला जन्मापासून केव्हांच झाला नाहीं. अखेर-पर्यंत तो सारखाच पवित्र राहिला. अशाप्रकारच्या शुकदेवानें हें प्रेममय चरित्र गाइलें आहे. लोभाचा यत्किंचितही अंश आपल्या अंतःकरणांत शिल्लक असेल तोंपर्यंत ईश्वरी प्रेमाचें रहस्य आपणास कधींही समजणार

नाहीं. तोंपर्यंत आपण केलेल्या भक्तीला केवळ बाजारी स्वरूप असतें. भक्तींत 'दे वाण घे वाण' करण्याची आपली इच्छा असते. "परमेश्वरा, मी तुझी भक्ति करतों, त्याअर्थी तिच्या बदल्यांत तूं मला अमुक अमुक दे." अशी मागणी आपलें अंतःकरण नित्य करीत असतें. ज्यांची भक्ति अशा प्रकारची लोभमूलक नसते त्यांच्याठिकाणीं पुष्कळ वेळां भीतिमूलक भक्ति आढळते. परमेश्वराची भक्ति आपण न केली तर आपणास दुःखें प्राप्त होतील अथवा मरणानंतर आपणास नरकप्राप्ती होईल या भीतीनें पुष्कळ लोक परमेश्वराची भक्ति करीत असतात. असल्या प्रकारच्या कल्पना मेंदूंत शिल्लक आहेत तोंपर्यंत गोपींच्या प्रेमाचा आवेश आपणास कसा समजणार ? कीर्ति, मोठें नांव, पुष्कळ पैसा, इत्यादिकांचा विसर आपणास प्रथम पडला पाहिजे. कोणत्याही लौकिक वस्तूची आकांक्षा आपल्या चित्तांत असतां उपयोगी नाहीं. हे सारे मळ आपल्या चित्तांतून साफ धुवून गेले ह्मणजेच गोपींच्या प्रेमाचें रहस्य आपणास समजेल. तोंपर्यंत हें रहस्य जाणण्याचा यत्नही आपण करूं नये. आपला आत्मा अत्यंत पवित्र झाल्यावांचून गोपींच्या प्रेमास आपल्या विचाराचा स्पर्शही करूं नये. कनककामिनीच्या विचारानें ज्यांचें चित्त भ्रष्ट झालें आहे आणि क्षणोक्षणीं लौकिक लोभानें ज्यांचें अंतःकरण उचंबळत आहे अशा अपवित्र व क्षुद्र लोकांनीं गोपींच्या निर्व्याज प्रेमाची मीमांसा करण्याचें धाडस करावें काय ? भगवान् श्रीकृष्णांच्या चरित्रांतील हाच भाग अत्यंत महत्त्वाचा आहे. प्रत्यक्ष गीतेचीही तुलना या भागाशीं होऊं शकत नाहीं. कारण या अखेरच्या आदर्शाकडे कसें पोहोंचावें हें मात्र गीतेनें सांगितलें आहे. पण या भागांत प्रेमाचा शुद्ध आवेश आणि भक्तीची धुंदी यांचा पूर्ण सांठा सांपडतो. या ठिकाणीं गुरु आणि शिष्य, भक्त आणि परमेश्वर हे सर्व एकरूपच होऊन गेलेले आढळतात. येथें द्वैताला वाव नसल्यामुळें भीति अथवा लोभ यांचा मागमूसही या भागांत लागत नाहीं. सर्व लौकिक कल्पना याठिकाणीं पार बुडून गेल्या आहेत. याठिकाणीं शुद्ध प्रेमामृताचा कल्लोळ मात्र शिल्लक उरला आहे. याठिकाणीं कृष्णावांचून इतर साऱ्या विश्वाचा पूर्ण लोप झाला आहे. याठिकाणीं सर्व कृष्णमय झालें आहे. याठिकाणीं सर्व आत्मे कृष्णस्वरूप झाले आहेत. भगवान् श्रीकृष्णांच्या चरित्राचा हा भाग अशा स्वरूपाचा आहे.

भगवान् श्रीकृष्णांच्या चरित्रांतील बारिकसारिक तपशिलाचा खल करून आपला वेळ फुकट दवडूं नका. चरित्रांतील मुख्य मुद्याचा आणि रहस्याचा मात्र विचार करा. ऐतिहासिकदृष्ट्या त्या चरित्रांत विसंगतता दिसेल, तसेंच त्यांत कांहीं मागाहून घुसडलेलाही भाग असेल; पण या सर्व गोष्टी खऱ्या असल्या तरी या चरित्राला मूळ पाया ह्मणून कांहीं असलाच पाहिजे. श्रीकृष्णाच्या वेळेपासून धर्माचा जो नवाच मनू उदय पावला त्याला कांहींना कांहीं पाया असलाच पाहिजे. दुसऱ्या कोणत्याही अवतारी पुरुषाचें अथवा ऋषीचें चरित्र आपण पाहिलें तर तो स्वतःच्या वेळीं प्रसार पावलेल्या धर्मतत्त्वांचेंच फक्त शिक्षण देत असल्याचें दिसून येईल. त्याच्या चरित्रांत नव्या धर्ममनूचा उदय दिसून येणार नाहीं. श्रीकृष्ण चरित्रासंबंधीं मात्र अशी गोष्ट नाहीं. श्रीकृष्ण या नांवाचा अवतार खरोखरच होऊन गेला कीं नाहीं या बद्दलही कोणाला कदाचित् शंका असेल. पण कर्तव्य दृष्टीनें कर्म करणें आणि केवळ प्रेमासाठींच प्रेम करणें हीं तत्त्वें भगवान् श्रीकृष्णाच्या पूर्वीं कोणीही अस्तित्वांत आणलीं नव्हतीं. या तत्त्वांचा उदय श्रीकृष्णकालापूर्वीं झाला होता असें कोणासही दाखवितां येणार नाहीं. हीं तत्त्वें त्या कालापूर्वीं ज्याअर्थीं उदय पावलीं नव्हतीं त्याअर्थी तीं पुढें आणणारा असा कोणीतरी अवतारी पुरुष असलाच पाहिजे. तीं तत्त्वें दुसऱ्या कोठून चोरून घेतलेलीं असणें शक्य नाहीं. भगवान् श्रीकृष्णांचा जन्म झाला त्या वेळीं तीं तत्त्वें अस्तित्वांत नव्हतीं. भगवान् श्रीकृष्णानींच तीं प्रथम उदयास आणलीं. आणि त्यांचे शिष्य महर्षि व्यास यांनीं तीं सामान्य जनतेस उपदेशिलीं. वृंदावनांतील गोपींच्या प्रेमविषयापासून आपणास जो मोठा धडा शिकण्यासारखा आहे तो हाच. तुह्मांस गोपींसारखेंच भक्तीचें वेड लागून तुमचा मेंदू भक्तीच्या आवेशानें भडकून गेला ह्मणजेच गोपींच्या प्रेमाचें रहस्य तुमच्या ध्यानांत येईल. ज्याक्षणीं जगाचें सर्व अस्तित्व तुमच्या दृष्टीनें नाहींसें होईल, ज्या क्षणीं प्रेमाखेरीज इतर सर्व विषय तुमच्या चित्तांतून नाहींसा होतील, ज्याक्षणीं तुमचें अंतःकरण अत्यंत पवित्र होईल आणि ज्याक्षणीं सत्यशोधनाची इच्छाही नाहींशी होईल, त्याच क्षणीं तुमच्या अंतःकरणांत भक्तीचा पूर लोटेल. गोपींच्या ठिकाणीं जें अनंत आणि निर्व्याज प्रेम होतें त्या प्रेमाच्या सामर्थ्याचा उदय तुमच्या अंतःकर-

णांत होईल. तुमचें अखेरचें साध्य हेंच होय. तें तुह्मांस प्राप्त झालें ह्मणजे सर्व कांहीं मिळालें असें होईल.

भगवान् श्रीकृष्णाच्या चरित्राचा हा अति उदात्त भाग सोडून आतां आपण इतर भागाकडे वळूं. त्यांनी गीतेंत काय उपदेश केला आहे हें आपण पाहूं. भगवान् श्रीकृष्णांच्या चरित्रासंबंधीं बरीच उलथापालथ करण्याची प्रवृत्ति आह्मां हिंदु लोकांतही अलीकडे रूढ होऊं पाहात आहे. गोपींचा वल्लभ श्रीकृष्ण, हें कृष्णस्वरूप पुष्कळांस चमत्कारिक वाटूं लागलें आहे. पुष्कळ युरोपियांस हें स्वरूप पसंत पडत नाहीं. डॉ. अमुक अमुक यांना तें आवडत नाहीं. बस्स ! अशा स्थितींत बिचाऱ्या गोपींना हद्दपार करण्याची आमची तयारी आहे. युरोपियांच्या अनुमतीवांचून कृष्ण आणि गोपी यांनीं काय ह्मणून जिवंत राहावें ? छे ! छे ! तसें करण्याची त्यांची छाती नाहीं. महाभारतांत एकदोन ठिकाणांखेरीज गोपींचा उल्लेख कोठें आढळत नाहीं. आणि हीं एक दोन ठिकाणेंही विशेष महत्वाचीं नाहींत. द्रौपदीनें केलेल्या धाव्याचे वेळीं तिनें वृंदावनाचा उल्लेख केला आहे आणि दुसऱ्या एका ठिकाणीं शिशुपालानेंही वृंदावनाचा उल्लेख केला आहे. युरोपियांना ज्या अर्थीं वृंदावनाचा हा भाग आवडत नाहीं त्याअर्थीं तो मागाहूनच घुसडला असला पाहिजे ! युरोपियांना जें आवडत नाहीं, त्याची उचलबांगडी झालीच पाहिजे. याच तत्त्वावर गोपी आणि श्रीकृष्ण यांस तिलांजुली देण्यास आह्मी सिद्ध झालों आहों. धर्म ही सुद्धां ज्यांनीं क्रयविक्रयाची बाजारी वस्तू करून टाकली आहे, येथें केलेल्या पुण्यकर्मांचा मोबदला स्वर्गांत मिळावा ह्मणून जे खटपट करितात, स्वर्गांत चक्रवाढ व्याजरूपानें फलें मिळावीं याच दृष्टीनें जे येथें पुण्यकर्में करितात, त्यांच्या दृष्टीनें गोपींचें प्रेम नालायख ठरावें हें अगदीं रास्त आहे. असल्या प्रकारच्या विचारसरणींत बिचाऱ्या गोपींच्या प्रेमाचा नंबर लागला नाहीं हें रास्तच झालें. आतां हा विषय इतकाच सोडून देऊन श्रीकृष्णचरित्राच्या दुसऱ्या भागाकडे आपण वळूं. श्रुतींनीं सांगितलेल्या धर्मतत्वांत गीतेहून अधिक चांगल्या दर्ज्यांची दुसरी कोणतीही टीका उपलब्ध नाहीं. फार काय, पण तिजहून अधिक चांगली टीका लिहितां येणें शक्यही नाहीं. ' **सर्वोपनिषदो गावो दोग्धा गोपालनन्दनः । पार्थो वत्सःसुधीर्भोक्ता दुग्धं गीतामृतं महत् ॥**

हेंच वचन अक्षरशः खरें आहे. सर्व श्रुतींचें आणि उपनिषद्ग्रंथांचें रहस्य समजणें दुरपास्त आहे. याजवर अनेक टीका झाल्या आहेत, आणि ज्यानें त्यानें आपल्या मताप्रमाणें हें रहस्य सांगितलें आहे. यानंतर परमेश्वरानें श्रीकृष्णरूपानें स्वतःच अवतार घेतला. ज्यानें श्रुती निर्माण केल्या त्यानेंच गीतेच्या रूपानें त्यांचा अर्थही सांगितला भगवान् श्रीकृष्णांनीं ज्या रीतीनें हें श्रुतिरहस्य कथन केलें आहे तीवांचून हिंदुस्थानास अथवा जगास दुसऱ्या कशाचीही जरूर नाहीं; भगवान् श्रीकृष्णांच्या नंतर जे श्रुतींचे टीकाकार झाले त्यांनीं गीतेवरही भाष्यें लिहिलीं आहेत. पण पुष्कळ वेळां गीतेचें खरें रहस्य आणि तिचा ओघ त्यांच्या ध्यानांत आला नाहीं हें मोठें आश्चर्य होय. एखादा टीकाकार अद्वैतमतप्रवर्तक असला ह्मणजे एखादें उपनिषद् हातीं घेऊन यांतील द्वैतमतदर्शक सूत्रें शोधून काढून आणि त्यांचा चेंदामेंदा करून त्यातून अद्वैतमताचा अर्थ कसाबसा पिळून काढण्याचा यत्न करीत असतो. उलटपक्षीं दुसरा एखादा टीकाकार द्वैतमताचा भोक्ता असला ह्मणजे स्वतःच्या मताविरुद्ध असलेल्या श्रुतिसूत्रांची अशीच दशा करून त्यांतून द्वैतदर्शक अर्थ पिळून काढतो. पण असला धांगडधिंगा भगवद्गीतेनें कोठेंही घातलेला नाहीं. सर्व सूत्रें आपापल्या जागीं योग्यच आहेत असें भगवान् श्रीकृष्णांचें मत आहे. मानवी आत्मा हळूहळू पायरी पायरीनें आणि पिपीलिका मार्गानें आपल्या उच्चतम आदर्शांकडे जात असतो. व्यक्तांतून बाहेर निघून हळूहळू पावलें टाकीत तो अव्यक्ताकडे जात असतो. स्थूलांतून हळूहळू तो सूक्ष्मांत प्रवेश करितो; सूक्ष्मांतून सूक्ष्म-तरांत आणि त्यांतून सूक्ष्म-तमांत प्रवेश करून अखेरीस केवलरूपाची मजल तो मारतो. भगवद्गीतेंतील टीकेचें हें रहस्य आहे. प्रथम गीतेनें कर्मकांडाचा विचार केला आहे. केवळ कर्मानें प्रत्यक्ष मोक्ष मिळत नसला तरी त्या मार्गाला जाण्यासाठीं कर्में अप्रत्यक्षपणें मदत करतात असें त्यांत दाखविलें आहे. प्रथमावस्थेंत कर्में हीं उचित होत. याच दृष्टीनें मूर्तिपूजादि कर्में, यज्ञयागादि कर्में आणि दुसरीं कोणतींही कर्में उचित आहेत असेंच ह्मटलें पाहिजे. मात्र हीं कर्में करतांना अंतःकरण शुद्धीवर लक्ष्य ठेविलें पाहिजे एवढीच अट येथें सांगितली आहे. अंतःकरण पवित्र असेल आणि मुक्तीची खरी आवड त्याच्या ठिकाणीं असेल तर

पूजाविधीही त्याला मोक्षाचा मार्ग दाखवितील. या दृष्टीनेंच पूजनाच्या सर्व प्रकारांची जरूर आहे. तसें नसतें तर ते निर्माणही झाले नसते. जगांतील नानाधर्म आणि नानापंथ हे दांभिक लोकांनीं अथवा दुष्ट मनुष्यांनीं निर्माण केलेले नाहींत. दव्यार्जनासाठीं हे पंथ कोणीही निर्माण केलेले नाहींत. अर्वाचीन सुशिक्षितांनीं त्यांजवर कोणतेही घाणेरडे आरोप केले तरी हे पंथ कोणत्याही नीच इच्छेच्या तृप्तीसाठीं निर्माण झालेले नाहींत. सुशिक्षितांनीं बुद्धिवादानें ही गोष्ट सिद्ध केली तरीसुद्धां या धर्माचारांत कोणताही वाईट हेतू नव्हता. आणि ते अशारीतीनें निर्माणही झालेले नव्हते हें आपण पक्कें लक्ष्यांत ठेवा. मानवी आत्म्याला स्वतःच्या उत्क्रांतीसाठीं ज्या ज्या वस्तूंची गरज पडली त्या त्या वस्तू त्यानें आपल्या गरजेसाठींच निर्माण केल्या असून त्यांतूनच हे पंथही निर्माण झाले आहेत. मानवी मनांत नाना विध प्रकार आढळून येतात. सर्व मनुष्यांच्या मनाची घटना एकाच प्रकारची नसल्यामुळें प्रत्येकास अनुरूप असा मार्गही वेगळा असतो. आणि त्यात्या मार्गाच्या पूर्तीसाठीं अनेक पंथ साहजिकपणेंच अस्तित्वांत येतात. या करितां या पंथाविरुद्ध डोकेंफोड करीत बसण्यांत शाहाणपणा नाहीं. त्यांची जरुरी भासेनाशी झाली ह्मणजे त्यांचें अस्तित्वही आपोआपच संपेल. पण त्यांची जरूरी आहे तोंपर्यंत तुह्मी कितीही आकाशपाताळ एक केलें तरी त्याच्या अस्तित्वास यत्किंचितही बाधा होणार नाहीं. तरवारींची आणि प्रचंड तोफखान्याची मदत तुह्मीं घेतली आणि ही पृथ्वी मानवी रक्तानें माखून टाकली तरी निरनिराळ्या पंथांची जरूर मनुष्यजातीस जों पर्यंत आहे तोंपर्यंत त्यांचें अस्तित्व राहाणारच; आणि असें होणें हें अगदीं साहजिक आणि रास्त आहे, असें भगवान् श्रीकृष्णांनीं स्पष्टपणें सिद्ध करून दिलें आहे.

यानंतर हिंदुस्थानाच्या इतिहासांतील खेदजनक काळास सुरवात झाली. निरनिराळ्या पंथांच्या भांडणाचा अस्पष्ट ध्वनि गीतेच्या काळींही उमटूं लागला होता. या निरनिराळ्या पंथांची एकवाक्यता करण्याकरितांच भगवंतानें अवतार धारण केला. अनेक वेगवेगळ्या पंथांची ज्यांनीं एकवाक्यता केली त्या साऱ्यांत भगवान् श्रीकृष्ण अति श्रेष्ठ पुरुष होते. भगवान् ह्मणतात, **मयिसर्वमिदं प्रोतं सूत्रे मणि गणाइव।** या वेळीं निरनिराळ्या

पंथांत तंटे सुरू झाल्याचें दिसून येतें. यानंतर थोडा वेळ शांतीचें साम्राज्य पसरलें; पण कांहीं काळानें तंट्यांस पुन्हां सुरवात झाली. हे तंटे केवळ धार्मिक पंथांतच होते असें नाहीं. तर त्यांत कांहीं जातिविषयक तंटेही होते. विशेषत: आर्यकुलांतील क्षत्रिय आणि ब्राह्मण या दोन बलिष्ट वर्णांत भांडण सुरू झालें. यानंतर बऱ्याच काळानें आणखी एक अवतारी पुरुष निर्माण झाल्याचें आढळतें. याचें नांव शाक्यमुनी गौतम हें होय. यांचीं धार्मिक मतें आणि यांचा धर्म याबद्दल आपणा सर्वांस माहिती आहेच. यालासुद्धां आह्मी परमेश्वराचा अवतार मानून त्याची पूजा करतों. जगांतील अत्यंत श्रेष्ठ कर्मयोगी ह्मटला ह्मणजे भगवान् शाक्यमुनी हाच होय. यांच्या इतका असामान्य धैर्यानें नीतितत्त्वांचें शिक्षण मनुष्यजातीस दुसऱ्या कोणीही दिलेलें नाहीं. कर्मयोगाबद्दल भगवान् श्रीकृष्णांनीं ज्या उपपत्ती सांगितल्या त्यांचें व्यवहार्य रूप स्पष्ट करून दाखविण्याकरितां जणूं काय त्यांनींच पुन्हां शाक्यमुनीचा अवतार घेतला. '**स्वल्पमप्यस्य धर्मस्य त्रायते महतो भयत्** ।' या वचनांचें स्पष्ट स्वरूप सिद्ध करण्याकरतांच जणूं काय ते पुन्हां अवतरले. '**स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रा स्तेऽपि यांति परांगतिम्।**' असें जें भगवान् श्रीकृष्णांनीं सांगितलें त्याचेंच व्यवहार्य रूप स्पष्ट करण्याकरितां शाक्यमुनीच्या रूपानें जणूं काय ते पुन्हां अवतरले. सर्वांचे निर्बंध तोडण्याकरितां, सर्वांस शृंखलामुक्त करण्याकरितां व मनुष्यजातीच्या अत्युच्च साध्यास पोहोंचण्याची मुभा सर्वांस आहे हें सांगण्याकरितां त्यांनीं पुन्हा अवतार धारण केला. ज्यांचीं मनें परमेश्वराच्या ठिकाणीं लीन झालीं असतील ते याच जन्मांत मुक्त होतील. कारण, परमेश्वराच्या ठिकाणीं उच्चनीच हा भेद नाहीं, असें त्यांनीं पुन्हा सांगितलें. भगवद्गीतेनें सांगितलेल्या तत्त्वांचें जिवंत स्वरूप लोकांस दाखवावें व गीतेचा निदान एक भाग तरी व्यवहार्य करावा याकरितांच भगवान् श्रीकृष्ण शाक्यमुनीच्या रूपानें अवतरले. भगवान् शाक्यमुनींनीं दरिद्री आणि दु:खी यांस उपदेश केला. आपल्या उपदेशांत त्यांनीं गीर्वाणवाणीचा उपयोग केला नाहीं. आपला उपदेश त्या काळच्या लोकांच्या चालू भाषेंत ते करीत असत. अगदीं खालच्या दर्ज्यांच्या लोकांच्या हृदयांतही आपला उपदेश बाणावा याकरितांच त्यांनीं अशी योजना केली होती. गरिबांबरोबर मिसळून राहातां यावें

ह्मणून जन्मदत्त सिंहासनाचाही त्यांनीं त्याग केला. भगवान् श्रीरामाप्रमाणें अंत्यजालाही त्यांनीं पोटाशीं धरिलें.

भगवान् शाक्यमुनींचें चरित्र आणि त्यांनीं केलेलें कार्य हीं आपणा सर्वांस अवगत आहेतच. त्या कार्यांत फक्त एकच दोष राहिला होता आणि त्याचीं कटु फळें आह्मीं आजही भोगीत आहों. यांत भगवान् शाक्यमुनींचा कांहीं अपराध होता असें नाहीं. तो स्वतः अत्यंत पवित्र आणि उज्ज्वल रूपाचाच होता. पण त्यानें सांगितलेलीं धर्मतत्त्वें अत्यंत उच्च असल्यामुळें आर्यवंशीय लोकांत घुसलेल्या रानटी आणि असंस्कृत जातींच्या लोकांच्या पचनीं तीं पडलीं नाहींत. या असंस्कृत जातींचा प्रवेश आर्यांत झाला तेव्हां कांहीं कालपर्यंत ते संस्कृत झाल्याचा देखावा दिसला. पण यास्थितीस पुरतें एक शतक लोटलें नाहीं तोंच त्या जातींच्या जुन्या भोळसर कल्पना आणि त्यांची सर्पांची व भूतांची पूजा इत्यादि प्रकार आर्यांत घुसले. यामुळें सारा हिंदुस्थान ह्मणजे धर्माच्या मूर्खपणाच्या कल्पनांचें एक साम्राज्यच बनून गेला. आरंभीं ज्यांनीं बौद्ध धर्माचा स्वीकार केला त्यांनीं वेदांतील होमहवनावर प्रचंड हल्ला केला. यज्ञांत पशुहनन होत असल्यामुळें आणि बौद्ध धर्म त्या विरुद्ध असल्यामुळें यज्ञांचा निषेध ते अट्टाहासानें करूं लागले. अशाप्रकारचे यज्ञ त्याकाळीं घरोघर होत असत. बौद्ध धर्मानें हे यज्ञ बंद पाडले आणि त्या जागीं प्रचंड देवळें आणि थाटामाटाचे पूजासमारंभ हीं प्रचारांत आणलीं. हिंदुस्थानांतील सांप्रतचा पूजाविधि आणि प्रचंड देवळें हीं बौद्ध कालाचीं निदर्शक आहेत. बुद्धांनीं ब्राह्मणी धर्माच्या प्रतिमापूजनाचा उच्छेद केला असें जेव्हां कांहीं पंडितही ह्मणतात तेव्हां मला खरोखर फार हंसूं येतें. उलट भगवान् बुद्धांनीं ब्राह्मणी धर्म आणि प्रतिमापूजन यांची स्थापना केली हें या पंडितंमन्यांच्या लक्ष्यांत येत नाहीं. एक दोन वर्षांपूर्वीं एका रशियन पंडितानें लिहिलेलें एक ख्रिस्तचरित्र माझ्या वाचनांत आलें. त्यांत येशू ख्रिस्ताबद्दल त्यानें एक विलक्षणच शोध लाविला आहे. येशू ख्रिस्त जगन्नाथाच्या देवळांत धर्मतत्त्वांचा अभ्यास करण्यासाठीं कांहीं ब्राह्मणांकडे गेला. तेव्हां तेथील पूजनाचे प्रकार पाहून त्याला ब्राह्मणी धर्माचा तिरस्कार आला आणि नंतर तो तिबेटांतील लामाकडे गेला व तेथें पूर्णत्व पावून परत गेला. हिंदुस्थानच्या इतिहासाबद्दल ज्याला यत्किंचितही माहिती असेल त्याला या

कथेची असत्यता तेव्हांच पटेल. कारण, जगन्नाथाचें देऊळ हें पुरातन काळचें बौद्ध देऊळ आहे. हें हिंदूनीं आपल्या ताब्यांत घेतलें आणि पुढें त्याचें रूपांतर केलें. अशा प्रकारच्या गोष्टी पुढेंही आणखी घडण्याचा संभव आहे. येशूख्रिस्ताच्या काळीं जगन्नाथ हें बौद्ध देऊळ असल्यामुळें तेथें एकही ब्राह्मण असण्याचा संभव नव्हता. मग येशूनें तेथल्या ब्राह्मणांजवळ अभ्यास केला असें ह्मणणें ही वंध्यासुताची कहाणी नव्हे तर काय? भगवान् बुद्धांनीं सांगितलेलीं तत्त्वें सामान्य जनांच्या पचनीं न पडल्यामुळें त्या धर्माची उभारणी भूतदयेवर झाली असतांही तो धर्म कोसळून पडला त्यानंतर त्याचें मोडकें रूप अधिकच हिडिस् दिसूं लागलें. हें स्वरूप किती घाणेरडें होतें हें विस्तारानें सांगण्यास मला वेळ नाहीं व तसें करण्याची माझी इच्छाही नाहीं. बुद्ध धर्माच्या मोडतोडीच्या काळीं अत्यंत भयंकर पूजेचे प्रकार आणि अत्यंत बीभत्स पुस्तकें यांचा इतका सुळसुळाट झाला कीं, त्याचें वर्णन करणेंही मर्यादे बाहेर आहे.

बुद्धकालानंतर हिंदुस्थानाची अशी मोडतोड झाली असतांही तो देश जिवंत रहावा असा ईश्वरीसंकेत असल्यामुळें परमेश्वरानें त्या भूमींत पुन्हां अवतार घेतला. ‘ **धर्मसंस्थापनार्थाय, संभवामि युगे युगे।** ’ असें वचन ज्यानें दिलें त्यानें तें पुन्हां एकवार खरें करून दाखविलें. या वेळचा अवतार दक्षिणेंत झाला. आपल्या वयाच्या सोळाव्या वर्षापर्यंतच त्यानें आपले सर्व ग्रंथ लिहून पुरे केले अशी आख्यायिका आहे. या अवतारी पुरुषाचें नांव श्री शंकराचार्य असें आहे. सोळा वर्षांच्या वयाच्या या मुलानें लिहिलेले धर्मग्रंथ ह्मणजे जगांतील एक अप्रतिम चमत्कार आहे. या अवतारांचें सारेंच कार्य चमत्कारासारखें आहे. हिंदुस्थानांतील मानववंशास पूर्वीच्या पवित्र धर्माकडे परत नेणें हें यांचें अवतार कार्य होतें. पण त्यावेळच्या परिस्थितींत हें कार्य किती अवघड होतें याचा तुह्मींच विचार करा. हिंदुस्थानच्या त्या वेळच्या स्थितीचें थोडेंसें वर्णन मी आतांच केलें आहे. आज ज्या सुधारणा अमलांत आणण्याकरितां तुह्मी धडपडत आहां ती स्थिति त्या काळच्या स्थितीचा अवशेष मात्र आहे. तार्तार आणि बलुची इत्यादि अनेक रानटी जाति हिंदुस्थानांत घुसल्या होत्या आणि बौद्धधर्माचा स्वीकार करून आर्य लोकांतही त्यांनीं स्वतःचा प्रवेश करून घेतला होता. या रानटी जाती हिंदु-

स्थानांत आल्या तेव्हां पूर्वीच्या घरच्या घाणेरड्या चालीरीति त्यांनीं हिंदुस्थानांत आणल्या. बौद्ध धर्मांत झालेल्या या भयंकर संकटाचे परिणाम श्री शंकराचार्यांच्या काळीं अत्यंत भयप्रद दशेस पोहोंचले होते. ही सर्व घाण काढून टाकण्याचें काम श्रीशंकराचार्यांस करावयाचें होतें. त्यांनीं आपल्या वेदान्तधर्माच्या प्रचारानें मोडक्या बौद्ध धर्माचा पाडाव करून त्याच्या सर्व घाणींचा निःपात करून टाकला. हें कार्य अद्यापीही सुरू आहे. अझूनही तें पूर्ण झालें आहे असें ह्मणतां येत नाहीं. भगवान् शंकराचार्य हे महातत्त्ववेत्ते होते. बौद्ध धर्माच्या आदितत्त्वांत आणि वेदान्ततत्त्वांत फारसा फरक नाहीं हें त्यांनीं दाखविलें. बुद्धांनीं सांगितलेल्या धर्माचा उमज त्यांच्या शिष्यांस न पडल्यामुळें ते अवनत स्थितीस पोहोंचून निरीश्वरवादी बनले असें श्रीशंकराचार्यांनीं सिद्ध केलें. वेदान्तधर्माच्या प्रचारानें सर्व बौद्धांचें मन त्यांनीं सनातन आर्यधर्माकडे पुन्हां वळविलें. तथापि पूर्वींच्या चालीरिती त्यांनीं सोडल्या नव्हत्या. त्या नाहींशा करण्यास काय उपाय योजावा हा प्रश्न ह्यावेळीं शिल्लकच राहिला.

यानंतर श्रीरामानुजांचा जन्म झाला. श्रीशंकराचार्य विलक्षण बुद्धिमान् होते ही गोष्ट खरी; तथापि त्यांचें अंतःकरण तसेंच उदार नव्हतें असें मला वाटतें. श्रीरामानुज त्यांच्याहून अधिक दिलदार होते. खालच्या प्रतीच्या जनतेबद्दल श्रीरामानुजांच्या मनांत सहानुकंपा वसत होती. त्यांनीं पूजनाचे प्रकार होते तसेच घेऊन त्यांत शक्य तितकी सुधारणा केली आणि नवे पूजनाचे प्रकार अस्तित्वांत आणले. ज्या लोकांना अशा प्रकारच्या पूजन प्रकारांची आवश्यकता होती त्यांच्यासाठीं हे बाह्य पूजाविधि श्रीरामानुजांनीं निर्माण केले; आणि त्याबरोबरच अत्युच्च उपासनामार्गही त्यांनीं खुला करून दिला. अशा रीतीनें ब्राह्मणापासून अतिशूद्रापर्यंत धर्माचा मार्ग श्रीरामानुजांनीं आंखला. श्रीरामानुजांनीं केलेल्या कार्याची रूपरेखा अशा प्रकारची आहे. हा धर्ममार्ग हळूहळू दक्षिणेकडून उत्तरेकडे पसरत चालला. मुसलमानांच्या अमदानींत श्रीरामानुज पंथाला कांहीं उत्तरेकडील महात्म्यांनीं हातीं धरिलें. या महात्म्यांपैकींच श्रीचैतन्य हे मोठे प्रसिद्ध महात्मे होऊन गेले. श्रीरामानुजांच्या कालापासून धर्ममार्ग सर्वांस खुला झाला, हें विशेष लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे. श्रीरामानुजकालानंतर जितके महात्मे होऊन

गेले त्या सर्वांनीं या बाबतींत रामानुजांचेंच अनुकरण केलें. श्रीशंकराचार्य तरी या बाबतींत आकुंचित वृत्तीचे होते असें ह्मणण्याचें कारण नाहीं. त्यांची वृत्ति आकुंचित् होती असें त्यांच्या ग्रंथांवरून दिसत नाहीं. भगवान् बुद्धांच्या शिक्षणाचा परिणाम जसा विपरीत झाला तशीच गोष्ट श्रीशंकराचार्यांचीही झाली असावी असें मला वाटतें. त्यांच्या शिष्यांच्या अनुदारतेमुळें आचार्यांबद्दल गैरसमज पसरला असावा. श्री चैतन्य हे भक्तिमार्गी होते. गोपींच्या भक्तीचा आवेश कसा होता हें श्रीचैतन्यांनीं दाखविलें. त्यांचा जन्म ब्राह्मण कुलांत झाला होता. ते न्यायशास्त्रांत प्रवीण असून त्यांनीं बुद्धिवादांत अनेक जयपत्रें मिळविलीं होतीं. अशा प्रकारें हे मोठे विख्यात पंडित असतांही एका सत्पुरुषाच्या कृपेनें त्यांच्या चरित्राचा ओघ बदलला. बुद्धिवाद करण्याचें त्यांनीं सोडून दिलें; न्यायशास्त्राला त्यांनीं फांटा दिला; आणि ते शुद्ध भक्तिमार्गी बनले. त्यांच्या भक्तीचा आवेश असा दांडगा होता कीं, लोक त्यांना वेडा चैतन्य ह्मणूं लागले. त्यांच्या भक्तिमार्गाची लाट साऱ्या बंगालभर पसरली. आणि कित्येक तळमळणाऱ्या जीवांस तिनें शांति दिली. त्यांची भक्ति अमर्याद होती; ते सर्वत्र एकाच ईश्वराचा वास पहात असत. कोणी पुण्यात्मा असो अगर पापी असो, हिंदू असो अगर मुसलमान असो, एखादी स्त्री शुद्धचारिता असो अगर वेश्या असो, कोणी श्रीमंत असो अगर भिकारी असो, सर्वांवर त्यांचें सारखेंच प्रेम असे. त्यांच्या पंथांतील लोक आज धर्मदृष्ट्या अवनत स्थितीस पोहोंचले असले तरी आज मितीसही गरीब दुबळ्यांस आणि जनतेंतील खालच्या प्रतीच्या लोकांस ते आश्रय देत आहेत. आतां खरें बोलावयाचें ह्मटलें ह्मणजे आणखीही एका गोष्टीचा उल्लेख येथें करणें अवश्य आहे. जे धर्मपंथ शुद्ध तत्त्वांवर रचिले गेले आहेत त्यांच्या ठिकाणीं मानसिक औदार्य अधिक प्रमाणावर आहे हें कबूल करणें अवश्य आहे. श्रीशंकराचार्यांचा मार्ग अनुसरणारा कोणीही मनुष्य हिंदुस्थानांतील पंथांत वास्तविक भेद आहे असें कधींही ह्मणणार नाहीं. पण त्याच्या बुद्धीनें या अभेदाचें ग्रहण केलें असलें तरी जातिबंधनाच्या संबंधांत तो जुनाट संकुचित वृत्तीचा असतो, हेंही खरें आहे. उलटपक्षीं वैष्णवांसंबंधीं पाहतां त्यांच्यांत जातिबंधनें इतकीं निष्ठुर नाहींत; पण त्यांचीं धर्मतत्त्वें मात्र विलक्षण संकुचित आहेत असें दिसून येतें.

श्री शंकराचार्य विलक्षण बुद्धिमान् होते तसेच श्रीरामानुजाचार्य विलक्षण दिलदार होते. आतां विलक्षण बुद्धि आणि विशाल अंतःकरण या दोहों-चाही संगम होण्याचा काळ होता. श्रीशंकराचार्यांची बुद्धिमत्ता आणि चैत-न्यांचें विशाल अंतःकरण हीं जेथें एकवटलीं असतील असा पुरुष हवा होता. निरनिराळया पंथांच्या द्वारें एकच चैतन्य काम करीत आहे असें स्पष्ट क-रून दाखविणारा महात्मा हवा होता. गरीब व दुबळे आणि हिंदुस्थांनातील अथवा त्याबाहेरील लोकही एकाच परमेश्वराचे अंश आहेत असें सांगणारा कोणी हवा होता. निरनिराळ्या पंथांची एकवाक्यता करून दाखविण्याजो-ग्या विशालबुद्धीचा पुरुष हवा होता. अशा रितीनें जेथें बुद्धि आणि अंतः-करण हीं एकजीव होतात असा विश्वधर्म निर्माण करणारा पुरुष हवा होता. असा पुरुष यावेळीं जन्मास आला. याच महात्माच्या पादारविंदीं देह समर्पण करण्याचें भाग्य मला प्राप्त झालें. अशा महात्माच्या जन्मा-ला हा काल अगदीं योग्य होता. विशेष आश्चर्याची गोष्ट ही कीं, ज्या शह-रांत पाश्चात्य विद्या भरून वाहात होती त्याच शहराशेजारीं या महात्माचा जन्म झाला. या शहरानें पाश्चात्य विचार पूर्णपणें आपलेसे करून घेतले असून तें पूर्णपणें युरोपीय वळणावर गेलें होतें. अशाप्रकारच्या शहरांत या महा-त्म्याचें वसतिस्थान होतें. त्याला पुस्तकी विद्येचा गंधही नव्हता. फार काय, पण त्याला सहीही करतां येत नव्हती. अशाप्रकारचा तो महात्मा विलक्षण बुद्धिमान् होता असें मोठमोठया पदवीधरांनींही ह्मटलें. या चमत्कारिक महा-त्म्यांचें नांव श्रीरामकृष्ण परमहंस असें होतें. ह्यांच्या आयुष्यक्रमाची कथा खुलासेवार सांगण्यास आज मला वेळ नाहीं. पूर्वापार चालत आलेला धर्म-मार्ग श्रीरामकृष्णांच्या द्वारें अत्यंत परिणतावस्थेस पोहोंचला एवढेंच मी आज सांगतों. याच मार्गाची अपेक्षा आज जगाला होती. त्यांच्या पाठी-मागें केवढी दिव्य शक्ति उभी होती पहा ! श्रीरामकृष्णांचे वडील हे एक दरिद्री भिक्षुक होते. त्यांचा जन्म एका आड बाजूच्या खेड्यांत झाला होता. असल्या प्रकारच्या मनुष्याचें पूजन युरोपांत आणि अमेरिकेंत आज हजारों लोक करीत आहेत. यापुढें आणखीही लक्षावधि लोक त्यांचें पूजन करीत राहतील. परमेश्वरी सत्ता कशी आहे हें कोणी सांगावें ? माझ्या प्रियबंधूनों, परमेश्वरी इच्छेचा वारा कोणत्या दिशेनें वाहत आहे, हें तुह्मांस

अद्यापीही दिसत नसेल तर खरोखर तुह्मीं जन्मांध आहां असेंच ह्मटलें पाहिजे. आणखी एखाद्या प्रसंगीं श्रीरामकृष्णचरित्राचें कथन मी तुह्मांस करीन. सांप्रत मी इतकेंच ह्मणतों कीं, माझ्या तोंडांतून एखादा तरी सत्य शब्द निघाला असेल तर तो श्रीरामकृष्णांमुळेंच होय. आणि मी जें कांहीं असत्य सांगितलें असेल अथवा मनुष्यजातीस अकल्याणकर असें जें कांहीं सांगितलें असेल तें सारें माझें असून त्याची जबाबदारी मजवरच आहे.

## आल्मोरा येथील मानपत्र व त्यास उत्तर.

( 'स्वामीजी आल्मोरा येथें गेले असतां तेथील रहिवाशांनीं त्यांस पुढील मानपत्र दिलें. )

पाश्चात्य देशांतील आपला दिग्विजय संपवून आपल्या मातृदेशास परत येण्यासाठीं आपण इंग्लंडांतून निघालां असें आह्मी ऐकिलें तेव्हांपासून आपल्या दर्शनाची उत्कृष्ट लालसा आह्मांला साहजिकच झाली. परमेश्वराच्या कृपेनें तो शुभदिवस आज उगवला आहे. ज्यावर आपलें अत्यंत प्रेम असतें त्याची व आपली भेट केव्हांतरी होतेच, असें भगवद्भक्त श्री तुलसीदासांनीं ह्मटलें आहे. त्यांचें तें वचन आमच्या प्रत्ययास आज येत आहे. आपलें स्वागत करण्याकरितां खऱ्या भक्तीनें आज आह्मी येथें जमलों आहों. आपण आमच्या शहराला भेट देण्याची तसदी घेतली याबद्दल आह्मी आपले अत्यंत ऋणी आहों. आपल्या या दयाळुपणाबद्दल आपले कितीही आभार मानले तरी ते थोडेच. आपण धन्य आहांत आणि ज्या गुरुदेवानें आपल्याला या योगमार्गास लाविलें ते आपले गुरुदेवही धन्य होत. सांप्रतच्या कलियुगाच्या भयंकर कालींही ज्या भरतभूमींत असे नरश्रेष्ठ जन्मास येतात ती भूमीही धन्य होय. आपल्या साध्या आचरणानें, मन:पूर्वकतेनें, उत्तम दानतीनें, परोपकारानें आणि ज्ञानदानानें आपण आपलें नांव सर्वतोमुखीं करून टाकिलें आहे. आपल्याबद्दल आह्मांस फार अभिमान वाटतो.

श्रीशंकराचार्यांच्या कालानंतर जें बिकट कार्य हातीं घेण्यासही कोणी धजावला नाहीं तें कार्य आज आपण प्रत्यक्ष करून दाखविलें आहे. प्राचीन हिंदू आर्यकुलांतील कोणी पुरुष आपल्या तप:प्रभावानें इंग्लंड, अमेरिका

या देशांत जाऊन तेथील विद्वज्जनांसमोर सनातन हिंदुधर्माचें वर्चस्व स्थापील असें आमच्या कधीं स्वप्नांतही आलेलें नाहीं. शिकागो शहरीं भरलेल्या महाधर्मपरिषदेंत अनेक धर्मांचे आचार्य जमले असतां त्यांजसमोर आपण प्राचीन हिंदुधर्माचें वर्चस्व अशा रीतीनें स्थापन केलें कीं, आपलीं व्याख्यानें ऐकून त्यांचे डोळे खाड्कन् उघडले. त्या महापरिषदेंत निरनिराळ्या धर्मांच्या आचार्यांनीं आपापल्या धर्मांची महती अनेक प्रकारें गाइली; तथापि त्या साऱ्यांस मागें टाकून आपण विजय संपादन केला. वेदांतर्गत धर्माशीं टक्कर मारण्यास जगांतील दुसरा कोणताही धर्म समर्थ नाहीं असें आपण पूर्णपणें शाबित केलें आहे. इतकेंच नव्हे, पण पाश्चात्य देशांतील पुष्कळ विद्वज्जनांचें मन आर्यधर्माकडे आणि आर्यतत्त्वज्ञानाकडे वळविलें आहे. प्राचीन हिंदुधर्माची पताका आपण इंग्लंडांत इतक्या दृढतेनें रोविली आहे कीं तेथून तिचें उच्चाटन होणें आतां शक्य नाहीं.

सांप्रतच्या कालापर्यंत आमच्या धर्माचें खरें रहस्य काय आहे याजबद्दल युरोपांत आणि अमेरिकेंत गाढ अज्ञान पसरलें होतें. पण आपल्या प्रवचनांनीं त्यांचे डोळे आतां उघडले असून ज्या धर्माला ते लोक केवळ मूर्खांची बडबड समजत होते तोच धर्म दिव्य रत्नांची खाण आहे असें त्यांस दिसून आलें. ' **वरमेकं गुणी पुत्रो नच मूर्ख शतान्यपि । एकश्चंद्रस्तमोहंती नच तारागणोऽपिच**' असें जें एक सुभाषित आहे तें किती खरें आहे? आपणासारख्या एकाच सुपुत्राचा उपयोग साऱ्या जगाला आज किती झाला आहे ! आपणासारख्या सत्पुत्रांकडे बघूनच भरतभूमि आपल्या अवनतावस्थेचें दुःख क्षणभर विसरते. आजपर्यंत शेंकडोजणांनीं समुद्रोल्लंघन केलें असेल पण प्राचीन धर्माचा दिग्विजय संपादण्या इतकें उज्वल पूर्वकर्म फक्त आपल्याच पदरीं होतें. कायेनें, वाचेनें आणि मनानें मनुष्यजातीस धर्मज्ञान-दान करावयाचें एवढा एकच संकल्प आपण केला आहे. धर्मज्ञान देण्याची आपली सदा तयारी असते.

येथें एक मठ स्थापन करावा असा आपला विचार असल्याचें ऐकून आम्हांस फार संतोष झाला आहे. या बाबतींत आपणास पूर्ण यश मिळावें अशी आम्ही परमेश्वराची मनःपूर्वक प्रार्थना करितों. भगवान् श्रीशंकराचार्यांनींही दिग्विजयानंतर प्राचीन धर्माचें रक्षण करण्याकरितां हिमाल-

यांतील बद्रिकाश्रमीं एक मठ स्थापन केला. अशाच रीतीनें आपणही एखादा मठ स्थापन केला तर या आर्यभूमीचें मोठें कल्याण होणार आहे. या मठानें विशेषत: आमच्या जिल्ह्यांतील लोकांस तर विशेषच फायदा होणार आहे. यामुळें आमच्यांतून प्राचीन धर्माचें ज्ञान नाहींसें होणार नाहीं.

आर्यभूमीच्या या भागांत त्यागी माणसें निर्माण होतात असा फार जुन्या काळापासून अनुभव आहे. आमच्या देशांतील मोठमोठ्या ऋषिवर्यांनीं याच भागांत तपश्चर्या करून शुद्धाचरणांत आपलें आयुष्य घालविलें. पण ही कहाणी सांप्रत जुनी होऊन गेली आहे. येथें मठ–स्थापना करून या भूमीचें प्राचीन महत्व आपण पुन्हां प्रज्ज्वलित कराल असा आम्हांस भरंवसा आहे. खऱ्या धर्माची जन्मभूमि या नात्यानें आमच्या या भागाची प्रसिद्धि सर्व हिंदुस्थानभर झाली होती. पण कालवशात् हें सर्व ज्ञान मागें पडलें. आतां त्या भूमीला पूर्वीचें महत्व आपल्या श्रमानें पुन्हां प्राप्त होईल अशी आम्हांस आशा आहे.

आपण येथें आल्यामुळें आम्हांस किती आनंद झाला आहे, हें वाचेनें व्यक्त करणें शक्य नाहीं. परमेश्वरानें आपणांस दीर्घायुरारोग्य देऊन परोपकाराचीं अनेक कार्यें आपल्या हातून करवावीं इतकीच त्यापाशीं आमची प्रार्थना आहे. आपलें दिव्य सामर्थ्य दिवसेंदिवस वृद्धिंगत व्हावें व त्यायोगें आर्यभूमीचे दुर्दिन संपावे एवढीच आमची इच्छा आहे.

या मानपत्रास स्वामीजींनीं पुढील उत्तर दिलें:—हिंदुस्थानाची माता पार्वतीमाई ज्या भूमींत जन्मली आणि ज्या भूमींत आमच्या प्राचीन पूर्वजांना सुखस्वप्नें पडत होतीं ती भूमि हीच. ज्या भूमींत अखेर जन्म घेऊन प्रत्येक उत्सुक जीव अखेरची मुक्ति मिळवितो ती पवित्र भूमि हीच. याच पवित्र भूमींतील अत्युच्च पर्वत-शिखरावर अती खोल दऱ्यांत आणि सपाट्यानें वाहाणाऱ्या नद्यांच्या तटाकीं अत्युज्ज्वल विचार निर्माण झाले. या विचारांच्या अल्पांशाच्या श्रवणानें पाश्चात्यलोकही आश्चर्यानें थक्क होऊन गेले. या विचारमौक्तिकांशीं तुलना करण्याजोगें ज्ञान जगांत दुसऱ्या कोठेंही आढळत नाहीं असें अति विद्वान् पंडितांनींही प्रांजलपणें कबूल केलें आहे. हिंदुस्थानाच्या याच भागांत राहून आपलें आयुष्य घालवावें अशीं सुखमय स्वप्नें मला माझ्या लहानपणापासूनच पडत होतीं. येथें चिरस्थायी होण्या-

करितां मी अनेकवार खटपट केली हें आपणास ठाऊक असेलच. तथापि तो काल अनुकूल नव्हता आणि माझें कार्यक्षेत्र या पवित्र भूमीच्या बाहेर होतें यामुळें मी तिच्याबाहेर ओढला गेलों. तथापि ज्याठिकाणीं प्राचीन तत्त्वज्ञानानें जन्म घेतला आणि ज्याठिकाणीं अनेक ऋषिवर्यांनीं आपला आयुर्दाय संपविला त्याच या पर्वतराजाच्या उदरांत वास करण्याची माझी इच्छा केव्हांही कमी झाली नाहीं. माझ्या प्रिय मित्रांनों, माझी ही इच्छा पूर्ण होण्याचा समय कदाचित् अझूनही प्राप्त झाला नसेल. ज्या रीतीनें राहिलेलें आयुष्य येथें घालविण्याचा माझा संकल्प होता तसें तें घालविण्याचा काल अझूनही कदाचित् आला नसेल; तथापि याच भूमींत राहून निदान आपले अखेरचे दिवस तरी येथेंच संपवावे अशी मी परमेश्वराची प्रार्थना करितों. ही माझी इच्छा परमेश्वर पूर्ण करील असा मला भरंवसा आहे.

या पवित्र भूमींतील रहिवाशांनों, पाश्चात्य देशांत मी केलेल्या अल्प कामगिरीबद्दल जो स्तुतीचा वर्षाव आपण मजवर केला आहे त्याबद्दल मी आपले फार उपकार मानतों. तथापि त्या कामगिरीबद्दल आतां एकही शब्द बोलण्याची इच्छा मला राहिली नाहीं. या पर्वतराजाचीं शिखरांमागून शिखरें जों जों माझ्या दृष्टीसमोर दिसूं लागलीं तों तों माझी कर्म-प्रवणता मंदावत चालली. माझ्या मेंदूंतील खळबळ शांत होऊं लागली आणि गत कर्मांचा विचार अथवा उच्चार न करतां भविष्यत् कालाकडे माझी नजर लागली. जें अनंत ज्ञान हा हिमराज आपणास प्राचीन कालापासून शिकवीत आहे त्या अनंतत्त्वाकडे माझें मन ओढ घेऊं लागलें. तें एकच अनंतत्त्व येथील वातावरणांत घुमत आहे असें मला ऐकूं येऊं लागलें. येथील निर्झरांच्या खळखळाटांतही त्या एकाच तत्त्वाचा उच्चार माझ्या कानांस ऐकूं येऊं लागला. तें तत्त्व ह्मणजे त्याग. **'सर्वं वस्तु भयान्वितं भूवि नृणांवैराग्य मेवा भयम्।'** जगांतील साऱ्या वस्तूंच्या पोटीं भय आहे. अभय देण्यास समर्थ असें एक वैराग्य मात्र आहे. आणि या वैराग्याची जन्मदात्री भूमि हा हिमनगराजच होय. माझें मन पूर्णपणें उघडें करण्यास सध्यां वेळ नाहीं; आणि परिस्थितीही अनुकूल नाहीं. याकरितां सध्यां मी इतकेंच ह्मणतों कीं, या हिमनगराजानें वैराग्याचा एकच धडा आपणास शिकविला आहे आणि हाच उज्ज्वल

धडा साऱ्या मनुष्यजातीस आपण शिकवीत राहूं. आयुष्याच्या अखेरच्या दिवसांत आपले पूर्वज याच भागांत वस्ति करीत असत. भविष्यत्कालीं साऱ्या जगांतील उत्सुक आत्मे याच पर्वतराजाकडे धांव घेणार आहेत. त्याकालीं पंथांपंथांतील सर्व भांडणें मिटतील, अनेक मतमतांतरांचें स्मरण कोणास राहाणार नाहीं, धर्माधर्मातील तंट्यांचा लय होईल; वास्तविक सनातन धर्म एकच आहे अशी मनुष्यजातीची खात्री पटेल. अशी खात्री पटणें हेंच खरें धर्मज्ञान; बाकीचें ज्ञान हें नुसत्या फेंसाच्या किमतीचें आहे. जग हें केवळ मायिक आहे अशी ज्यांची खात्री पटेल, असे पुण्यात्मे या भागाकडे धांव घेतील. परमेश्वराच्या चिंतनाशिवाय इतर सर्व कर्मे निरुपयोगी आहेत असें ज्यांस पटेल ते इकडेच धांवत येतील.

मित्रमंडळी हो, हिमालयांत एखादा मठ स्थापन करावा अशाबद्दलचा उल्लेख आपण केला आहे. अशा प्रकारच्या मठाची किती आवश्यकता आहे याचा खुलासा पूर्वी मी केला आहे. विश्वव्यापी धर्माचें शिक्षण देणारा मोठा मध्यवर्ती मठ स्थापण्यास हीच जागा योग्य आहे असें मला वाटतें. आमच्या आर्यकुलाची अत्युच्च स्मृति याच पर्वतराजाशीं निगडित झाली आहे. आमच्या धर्माच्या इतिहासांतून हिमालयाचें नांव गेलें तर बाकीच्या राहिलेल्या भागाला फारच थोडें महत्व उरेल. याकरितां याच जागीं मध्यवर्ती मठ असणें योग्य आहे. याठिकाणीं या कार्याचीं सूत्रें हालविण्याचेंच काम करावयाचें असें नव्हे, तर या जागीं शांति आणि ध्यान यांचेंही साम्राज्य असावें. या माझ्या कल्पनेला मूर्तस्वरूप येण्याचा दिवस उगवेल असा मला भरंवसा आहे. पुन्हां एखाद्या प्रसंगीं आपली भेट होऊन आपणांशीं संभाषण करण्याचा प्रसंग यावा अशी माझी इच्छा आहे. सध्याच्या प्रसंगीं आपण दाखविलेल्या प्रेमाबद्दल मी आपले पुन्हां आभार मानतों. आपल्या वर्तनानें केवळ खुद्द माझ्यावरच आपण प्रेम दाखविलें असें नसून धर्माबद्दलही या द्वारें आपण आपला आदर व्यक्त केला असें मला वाटतें.असेंच प्रेम आपणां सर्वांच्या अंतःकरणांत सदैव वास करो. चालू क्षणाप्रमाणेंच आपण सदैव पवित्र राहू या; आणि चालू क्षणाप्रमाणेंच धर्माबद्दल आपणा सर्वांच्या मनांत उत्साह राहो.



# भक्तियोग.

**सतन्मयोह्यमृत ईशसंस्थो ज्ञः सर्वगो भुवनस्यास्य गोप्ता।**
**य ईशे अस्य जगतो नित्यमेव नान्यो हेतुर्विद्यते ईशनाय॥**
**यो ब्रह्माणं विदधाति पूर्वं यो वै वेदान् प्रहिणोति तस्मै।**
**तं ह देवं आत्मबुद्धिप्रकाशं मुमुक्षुर्वै शरणमहं प्रपद्ये॥**

तो ह्या विश्वाचा आत्मा आहे; तो अमर आहे; तो शास्ता आहे; तो सर्वज्ञ, सर्वांतरात्मा आणि सर्वांचा पालनकर्ता आहे; तो अनाद्यनंत शास्ता आहे; या जगाचें शासन करण्यास त्यावांचून दुसरा कोणीही समर्थ नाहीं.

ज्यानें आरंभीं महत् निर्माण केलें आणि ज्यानें त्याला वेद दिले, त्याजकडून मी मुमुक्षु होत्साता आश्रय मागतों. तो आत्मबुद्धिप्रकाश आहे; आणि त्याच्यामुळें बुद्धि आत्म्याकडे वळते.

**श्वेताश्वतरोपनिषद् ६-१७,१८.**

## प्रकरण १ लें.

## भक्तीची व्याख्या

भक्तियोग ह्मणजे परमेश्वराचा अंतःकरणपूर्वक शोध करणें. या शोधाचा आरंभ जसा प्रेमांत होतो, त्याचप्रमाणें त्याचें अस्तित्वही प्रेमांत असून त्याचा शेवटही प्रेमांत होतो. आपल्या भक्तिसूत्रांत नारद ह्मणतात, " परमेश्वराच्या ठिकाणीं आत्यंतिक प्रेम " " जेव्हां हें प्रेम एखाद्याला प्राप्त होतें तेव्हां तो सर्वांवर प्रेम करतो. तो कोणाचाही द्वेष करीत नाहीं. तो सदा तृप्त असतो. " " या प्रेमापासून कांहीं ऐहिक फायदा करून घेतां येणें शक्य नाहीं; कारण जोंपर्यंत ऐहिक आशा मनांतून गेली नाहीं, तोंपर्यंत ईश्वरविषयक प्रेम प्राप्त होणें शक्यच नाहीं. " " भक्ति ही कर्माहून मोठी आहे; आणि योगाहूनही मोठी आहे. कारण या दोहोंच्याही आचरणांत कोणंता तरी हेतु साध्य करावयाचा असतो. पण भक्तीचा

हेतु भक्ति, आणि तिचें फलही भक्तीच. भक्ति साध्य करावयाचा मार्ग भक्ति, आणि या मार्गाचें अंतिम फलही भक्ति. भक्ति हा आमच्या सत्पुरुषांचा एक निरंतरचा विषय आहे. भक्तीवर शांडिल्य अथवा नारद यां सारख्यांनीं स्वतंत्र ग्रंथ निर्माण केले आहेत, ते वेगळेच; पण त्यांशिवाय व्यास-सूत्रांवरील टीकाकार वस्तुतः ज्ञानमार्गी असतांही त्यांनीं भक्तीविषयीं लिहिलें आहे. व्यासांच्या भक्तिसूत्रांवर टीका करितां, त्यांतही शुद्ध ज्ञान आहे, असें दाखविण्याचा यत्न टीकाकारानें कितीही केला तथापि कांहीं सूत्रें अशीं आहेत कीं, त्यांतून अशा प्रकारच्या अर्थाचा निष्कर्ष काढणें शक्यच नाहीं. वास्तविक पाहतां लोक समजतात तसा फरक ज्ञान आणि भक्ति यांत मुळींच नाहीं. तीं दोन्हीही शेवटीं एकाच साध्यांत पर्यवसान पावतात, असें पुढें आपल्या लक्ष्यांत येईल. त्याचप्रमाणें राजयोगाचीही गोष्ट आहे. मुक्तीसाठीं राजयोगाचा अभ्यास केला तर शेवटीं त्याचें पर्यवसानही याच साध्यांत होतें. आतां कित्येक छां छू करणारे त्याचा उपयोग भोळ्याभाबड्या लोकांस फसविण्याकडे करतात, ही गोष्ट वेगळी.

भक्तिमार्गाचा विशेष हा आहे कीं, तो अत्यंत सोपा मार्ग आहे. आणि आपणास ज्या साध्याकडे शेवटीं पोंचावयाचें आहे, त्याजकडे जाण्याचा तो स्वाभाविक मार्ग आहे. तथापि या मार्गांत एक भीतीचेंही ठिकाण आहे, तें हें कीं, खालच्या पायरीच्या भक्तींतून पुष्कळवेळां धर्मवेड निपजत असतें. हिंदुधर्मांत, मुसलमान अथवा ख्रिस्ती लोकांत जे कित्येक वेळां धर्माच्या नांवावर अत्याचार करणारे लोक आढळून येतात, त्यांपैकीं बहुतेक सारे भक्तिमार्गाच्या खालच्या पायरीचे असतात. आपल्या प्रीतिविषयक वस्तूंविषयीं आत्यंतिक निष्ठा असल्यावांचून खरी भक्ति निर्माण होऊं शकत नाहीं. पण स्वतःच्या वस्तूंच्या विषयींचा हा पूज्यभाव इतर लोकांच्या पूज्य वस्तूविषयीं अनादर उत्पन्न करण्यास कित्येक वेळां कारण होतो. ज्यांचें मन उन्नतावस्थेस पोहोंचलेलें नाहीं असे प्रत्येक धर्मांतील लोक आपल्या देवतेविषयींचा आदर दुसऱ्यांचा द्वेष करून व्यक्त करीत असतात. आपल्या स्वतःच्या ईश्वरविषयक कल्पना अत्यंत पूज्य असतां व स्वतःच्या धर्मावर अत्यंत प्रेम असतां परकीयांबद्दल इतकी जाज्वल द्वेषबुद्धि त्यांच्या चित्तांत उपजते, त्याचेंही कारण हेंच होय. आपल्या

धन्याच्या वस्तूला कोणालाही स्पर्श करूं न देण्यांत कुत्रा जें प्रेम दाखवितो तशाच जातीचें हें प्रेम होय. अशा स्थितींत कुत्र्याची उपजत बुद्धि ही माणसाच्या विचारवती बुद्धीपेक्षां अधिक श्रेष्ठ ह्मटली पाहिजे. कारण आपला धनी कोणत्याही पोषाखांत आला, तरी कुत्रा त्याला शत्रू लेखीत नाहीं. धर्मवेड अंगांत शिरलें ह्मणजे दुसरेंही एक नुकसान होतें तें हें कीं, त्याची बरें वाईट जाणण्याची तारतम्यबुद्धि नष्ट होते. व्यक्तिविषयक विचारांचा त्याच्या चित्तावर इतका पगडा बसलेला असतो कीं, दुसरा मनुष्य ह्मणतो हें बरोबर कीं चूक हें पहाण्याची जरूरीसुद्धां त्याला भासत नाहीं. तें ह्मणणें कोणत्या व्यक्तीचें आहे हें तो पहात असतो. त्याला पूज्य असलेल्या एखाद्या व्यक्तीचें तें ह्मणणें असलें तर तें बरोबर; पण तेंच दुसऱ्या कोणी ह्मटलें तर तें चुकीचें. अशाप्रकारची त्याची विचारसरणी असते. आपल्याशीं ज्यांचीं मतें जुळतां असतील, त्यांच्याशीं वागतांना असा गृहस्थ अत्यंत प्रेमळपणें वागतांना दिसतो; पण स्वतःच्या पंथाच्या बाहेरच्या इतर लोकांविरुद्ध कसलेंही अघोर कर्म करावयास हा गृहस्थ मागें पुढें पहात नाहीं.

भक्तिमार्गांतील ही अगदीं खालची पायरी असून हिला गौणी भक्ति असें ह्मणतात. भक्ति अत्यंत परिपक्व झाली ह्मणजे तिला परा असें नांव प्राप्त होतें. या स्थितीला जो भक्त पोहोंचतो तो अत्याचारांच्या मार्गांत कधींही पडावयाचा नाहीं. अशा प्रकारचा भक्त परमेश्वराच्या अत्यंत सन्निध असल्यामुळें द्वेषाचीं बीजें पेरण्याचें काम त्याजकडून होणें शक्य नाहीं. आपणा सर्वांचे आयुष्यक्रम सारखेच बांधले जावे अशा प्रकारची विद्या आपणास प्राप्त झालेली नाहीं; तथापि ज्याच्या ठिकाणीं ज्ञान, भक्ति आणि योग या त्रयींची सांगड एकत्र बांधलेली असेल तो पुरुष अत्यंत श्रेष्ठ होय, हें मात्र आपणा सर्वांस समजतें. पक्ष्याला अंतराळीं उडण्यास दोन पंख आणि एक शेंपूट या त्रयीची जोड लागत असते. हवेंत तरण्यास जसे पंख लागतात, त्याचप्रमाणें इष्ट दिशेनें जाण्यास शेंपटाचा सुकाणूंसारखा उपयोग होतो. ज्ञान हें एका पंखाच्या जागीं असून भक्ति ही दुसऱ्या पंखाच्या जागीं आहे व या दोहोंस समतोल ठेवण्याचें काम योग करीत असतो. ज्यांना या वस्तुत्रयाचा एकदम उपयोग करतां येत नाहीं आणि यासाठींच जे केवळ भक्तिमार्गाचा उपयोग करतात, त्यांनीं एक गोष्ट नित्य लक्ष्यांत बाळगिली

पाहिजे, ती ही कीं, बाह्य आचार आणि विधि यांची धर्ममार्गांत अत्यंत आवश्यकता असली तरी परमेश्वराबद्दल आपल्या मनांत अत्यंत भक्ति उत्पन्न करण्यापलीकडे त्यांचा दुसरा उपयोग नाहीं. ज्ञानमार्गाचे प्रवर्तक आणि भक्तीचे प्रवर्तक यांच्या मतांमध्यें थोडासा फरक आहे. तथापि भक्तीचें सामर्थ्य दोघांसही कबूल आहे. ज्ञानमार्ग्यांच्या मताप्रमाणें भक्ति हें मुक्तीचें एक साधन मात्र आहे, आणि भक्तांच्या मतांप्रमाणें भक्ति हें मुक्तीचेंच साधन आणि साध्य आहे. याच मतास अनुलक्षून '**घोंटवीन लाळ ब्रह्मज्ञान्या हातीं । मुक्ता आत्मस्थिती सांडवीन ॥**' असे उद्गार ते काढीत असतात. माझ्या मताप्रमाणें हा दिसणारा फरक फारसा महत्वाचा नाहीं. भक्ति हें केवळ साधन आहे; या दृष्टीनें पाहतां ती भक्ति खालच्या दर्जाची ठरते. भक्ति वाढत जाऊन ती पक्कदशेस आली ह्मणजे ती मुक्तीच्या जवळ जवळ पोंचते. या मतांच्या प्रवर्तकांपैकीं प्रत्येकजण आपापल्या विशिष्ट मार्गासंबंधीं अभिमान बाळगितो. पण भक्ति पक्क झाली ह्मणजे इच्छा नसतांही ज्ञानाची प्राप्ति अवश्य होतेच; आणि त्याचप्रमाणें पूर्णज्ञान आणि खरी भक्ति हीं एकमेकांपासून अविभाज्य आहेत, ही गोष्ट दोघेही विसरतात.

हें तत्त्व लक्ष्यांत ठेवून या विषयाबद्दल वेदान्त्यांचें काय ह्मणणें आहे, याचा विचार करूं. '**आवृत्तिरसकृदुपदेशात्**' या सूत्रावर व्याख्या करतांना भगवान् शंकराचार्य ह्मणतात, " तो राजभक्त आहे अथवा तो गुरुभक्त आहे, असें एखाद्याबद्दल लोक बोलत असतात. केवळ आपल्या गुरूच्या मार्गानेंच जावें इतक्याच इच्छेनें प्रेरित होत्साता जो कोणी गुरुमार्गानें जात असतो त्याच्याचबद्दल लोक असें बोलत असतात. त्याच प्रमाणें 'प्रेमळ पत्नी आपल्या पतीचें चिंतन करिते.' ह्या उदाहरणांतही चिंतनाची क्रिया एकसारखी व अखंड चालत असते, असा भावार्थ आहे." शंकराचार्यांच्या मताप्रमाणें ही भक्तीची व्याख्या '**अथातो ब्रह्मजिज्ञासा**' या सूत्रावर टीका करतांना भगवान् रामानुज ह्मणतात, 'ध्यान ह्मणजे सतत स्मरण. एका भांड्यांतून दुसऱ्या भांड्यांत ओतल्या जाणाऱ्या तैलधारेचा प्रवाह ज्याप्रमाणें अखंड असतो, त्याचप्रमाणें ध्येय वस्तूचें जें अखंड चिंतन तें ध्यान. परमेश्वराचें असें ध्यान होऊं लागलें ह्मणजे सर्व पाश तुटतात. अखंड ध्यान हें मुक्तीचें साधन आहे,

असें श्रुतिवचन आहे. अखंड ध्यान हें अखंड प्रेक्षणासारखेंच आहे. 'जो लांब आहे आणि जवळही आहे, त्याला आपण पाहतों. त्यावेळीं अंतःकरणाचे पाश तुटतात, सर्व संशय दूर होतात आणि सर्व कर्मविपाक लय पावतात.' या वचनांत 'पाहाणें' याचा वास्तविक अर्थ अखंड चिंतन असाच आहे. जो जवळ आहे, त्याला आपण पाहूं शकतों; पण जो दूर अंतरावर आहे, त्याचें स्मरण करणें मात्र आपणास शक्य आहे. असें असतां-ही 'जो लांब आहे आणि जो जवळही आहे, त्याला आपण पाहिलें पाहिजे' अशी भाषा श्रुतीनें वापरली आहे. यावरून चिंतन आणि दर्शन हीं एकाच किमतीचीं आहेत, असा श्रुतीचा अभिप्राय दिसतो. चिंतन अत्यंत उत्कट झालें ह्मणजे त्याला दर्शनाचेंच स्वरूप येतें. पूजन ह्मणजे अखंड चिंतन होय, असाही श्रुतीचा अभिप्राय आहे. एकसारखें अखंड पूजन ह्मणजेच परमेश्वराचें ज्ञान; आणि ज्ञान हें अखंड चिंतनच होय असें त्याचें वर्णन केलेलें आहे. या हेतूनें जें चिंतन प्रत्यक्ष ज्ञानाच्या योग्यतेस पोहोंचलेलें असेल, तें मुक्तीचें साधन होऊं शकतें. 'अनेक शास्त्रांच्या अभ्यासानें अथवा बुद्धिगम्य मार्गानें अथवा वेदपठणानें आत्मलाभ होत नाहीं. आत्म्याचीच ज्यावर कृपा होईल, त्याला आत्मलाभ होतो. त्याच्या ठिकाणीं आत्मा स्वतः-च प्रकट होतो.' अशारीतीनें केवळ ऐकण्यानें, विचारानें अथवा ध्यानानें आत्मलाभ होत नाहीं असें ह्मटल्यानंतर 'आत्म्याची कृपा ज्यावर होईल त्याला आत्मलाभ होतो' असें ह्मटलें आहे. ज्यावर आपलें अत्यंत प्रेम असतें त्याच्याच भेटीची इच्छा आपणास होते. याचरीतीनें आत्म्याच्या ठिकाणीं ज्याचें अत्यंत प्रेम जडलें आहे त्याजवरच आत्म्याचेंही प्रेम जडतें. आत्मलाभाची इच्छा अत्यंत उत्कट झाली ह्मणजे तो लाभ त्याला करून द्यावा यासाठीं परमेश्वरच स्वतः मदत करतो. 'जो कोणी माझ्या ठिकाणीं भक्ति ठेवतो आणि प्रेमानें माझें पूजन करतो, त्याला मी अशी बुद्धि देतों कीं, तिच्या मदतीनें तो माझ्याकडे येईल.' असें भगवंतांनीं ह्मटलें आहे. या-करितां अविरत ध्यान हें प्रत्यक्ष दर्शनाच्या योग्यतेचें असल्यामुळें आत्म्या-ला प्रिय आहे. जो कोणी असें ध्यान करतो, त्याजवर परमात्म्याची कृपा होते, आणि त्याला परमात्मलाभाची प्राप्ती होते. अशाप्रकारचें जें अविरत स्मरण त्यालाच भक्ति असें नांव आहे.

**ईश्वरप्रणिधानाद्वा ।** या भगवान् पतंजलींच्या सूत्रावर टीका करतांना श्रीभोज म्हणतात 'ज्या भक्तीमध्यें कोणत्याही प्रकारच्या इंद्रियजन्य सुखांच्या तृप्तीची आशा नाहीं अथवा जिच्यामध्यें दुसऱ्या कोणत्याही प्रकारचा हेतु नाहीं आणि जींत सर्व प्रकारचीं कर्में कृष्णार्पण होतात, त्या भक्तीला प्रणिधान असें ह्मणतात.' याच सूत्रावर टीका करतांना श्रीव्यास ह्मणतात, ज्या भक्तीमुळें परमात्म्याची कृपा योग्यावर होते, आणि जीमुळें त्याच्या सर्व इच्छा परमात्मा पूर्ण करितो, त्या भक्तीला प्रणिधान असें म्हणतात. 'भक्ति ह्मणजे परमेश्वराच्या ठिकाणीं अत्यंत प्रेम' असें श्रीशांडिल्यांनीं ह्मटलें आहे. भक्तीच्या ज्या अनेक व्याख्या आहेत त्यांत भक्तशिरोमणि प्रल्हाद यानें केलेली व्याख्या सर्वांत श्रेष्ठ आहे.'**या प्रीतिरविवेकानां विषयेष्वनापायिनि । त्वामनुस्मरतस्सा मेहृदयान् मापसर्पति ।**' इंद्रियजन्य सुखांच्या ठिकाणीं अविवेकी लोकांचें जें अमर प्रेम असतें, तशा प्रकारचें प्रेम तुझें ध्यान करीत असतां माझ्या हृदयांतून कधींही नाहींसें न होवो. प्रेम हें फक्त ईश्वराच्याच ठिकाणीं अर्पण करण्याचें आहे. दुसरा कोणी कितीही मोठा असला, तरी त्याजवर केलेलें प्रेम भक्तीच्या स्वरूपास पोहोंचूं शकत नाहीं.आपल्या श्री भाष्यांत भगवान् रामानुज ह्मणतात,'**आब्रह्मस्तम्बपर्यन्ताः जगदन्तर्व्यवस्थिताः। प्राणिनः कर्मजनित संसारवशवर्तिनः॥ यतस्ततो न ते ध्याने ध्यानिनामुपकारकाः।अविद्यान्तर्गतास्सर्वे ते हि संसार गोचराः॥**' ब्रह्मापासून गवताच्या पातीपर्यंत जें जें कांहीं या संसारांत आहे, तें सर्व कर्मानें निर्माण केलेल्या जन्ममृत्यूस वश आहे. याकरिता त्यांचें ध्यान मुक्तीकरितां उपकारक होऊं शकत नाहीं; कारण हे सर्व वस्तुजात अज्ञानांतर्गत असून, ते वारंवार बदलण्यास पात्र आहेत. श्रीशांडिल्यांनीं 'अनुरक्ति' या शब्दाचा उपयोग केला आहे. त्यावर टीका करतांनां स्वप्नेश्वर ह्मणतात, 'अनु' ह्मणजे 'पाठीमागून जाणारी.' आणि 'रक्ति' ह्मणजे 'प्रेम.' 'परमेश्वराच्या थोरवीचें ज्ञान झाल्यानंतर त्याच्याबद्दल जें प्रेम उद्भवतें तिला अनुरक्ति किंवा भक्ति असें ह्मणतात. तसें नसेल तर पुत्रकलत्रादिकांवरील अज्ञानजन्य प्रेम भक्ति होऊं शकेल.

येथवर केलेल्या विवेचनावरून भक्ति या शब्दाचा अर्थ अनेकांनीं कसा केला आहे हें आपल्या लक्ष्यांत आलेंच असेल. सामान्य पूजनाच्या पायरी-

पासून तों परमेश्वराच्या ठिकाणीं शुद्ध एकनिष्ठ प्रेम उद्भवेपर्यंत मनोभूमिकेची जी वाढ होत जाते, तिला भक्ति असें ह्मणतात.

---

## प्रकरण २ रें.

## ईश्वर म्हणजे काय ?

परमेश्वर ह्मणजे कोण ? **जन्माद्यस्य यत:** । ‘ ज्यापासून उत्पत्ति, स्थिति आणि लय हीं निर्माण होतात, त्याला परमेश्वर असें ह्मणावें.’ तो अनादि, पवित्र आणि सर्वकालमुक्त असा आहे. तसेंच तो सर्वशक्तिमान्, सर्वज्ञ आणि दयाळु आहे. तो सर्व गुरूंचा गुरु आहे. **स ईश्वरः अनिर्वचनीय प्रेमस्वरूपः** । असें त्याचें स्वरूप वर्णिलें आहे.

या व्याख्या परमेश्वराच्या व्यक्त स्वरूपास अनुलक्षून केल्या आहेत. मग दोन परमेश्वर आहेत कीं काय असा प्रश्न येथें उद्भवतो. ‘ नेति नेती ’ या वर्णनानें सांगितलेला तत्त्ववेत्त्यांचा सच्चिदानंद रूप परमेश्वर, आणि भक्तांचा प्रेमस्वरूप परमेश्वर हे भिन्न भिन्न आहेत कीं काय ? नाहीं; या दोन स्वरूपांत यत्किंचितही भेद नाहीं. तत्त्वज्ञांचा अव्यक्त परमेश्वर आणि भक्तांचा व्यक्त परमेश्वर हे वस्तुत: एकरूपच आहेत. भक्तांनीं पूजिलेला व्यक्त परमेश्वर आणि तत्त्वज्ञांचें ब्रह्म हे वेगवेगळे नाहींत हें नेहमीं लक्ष्यांत ठेविलें पाहिजे. ‘ **सर्वं खल्विदं ब्रह्म** ’ असा तत्त्वज्ञांचा अखेरचा सिद्धांत आहे. त्यांत द्वैत संभवतच नाहीं. ब्रह्मस्वरूप हें अत्यंत परोक्ष असल्यामुळें त्यावर प्रेम करणें अथवा त्याची पूजा करणें सामान्य मनुष्यास शक्य नाहीं. याकरितां ब्रह्माचें जें दुसरें स्वरूप ईश्वर तें भक्तांनीं पसंत केलें आहे, ही गोष्ट सामान्य उदाहरणांनीं व्यक्त करावयाची ह्मटली तर ब्रह्म हें मातीच्या गोळ्यासारखें असून त्यापासून असंख्य आकाराच्या निरनिराळ्या वस्तू निर्माण केल्या आहेत. केवळ गोळ्याच्या स्वरूपांत असतां त्या सर्व वस्तू एकरूपच असतात. पण त्याच निरनिराळ्या आकारानें व्यक्त झाल्या ह्मणजे परस्पर भिन्न दिसूं लागतात. त्यांपैकीं एकही वस्तू आकार रूपानें भिन्नत्व पावण्यापूर्वीं अव्यक्त रूपानें त्या मातीच्या गोळ्यांत होतीच; आणि मूल द्रव्याच्या

दृष्टीनें पाहतां त्या अनेक वस्तु एकरूपाच्याच आहेत हें उघड आहे; पण त्यांचीं वेगवेगळीं रूपें व्यक्त झाल्यानंतर तीं व्यक्त आहेत तोंपर्यंत त्या वस्तु भिन्न असतात. एकाच मातीच्या गोळ्यांतून एक उंदीर आणि एक हत्ती असे दोन आकार निर्माण केले तर ते दोन्ही व्यक्त स्वरूपांत असेपर्यंत एकरूप न होतां भिन्नच राहतील. त्याच आकारांचा पुन्हां एक मातीचा गोळा केला तर ते पुन्हां एकरूप होतील. हीच गोष्ट व्यक्त आणि अव्यक्त परमेश्वरास लागू आहे. परमेश्वर हें अव्यक्त ब्रह्माचें अत्यंत उच्च दर्ज्याचें व्यक्त रूप आहे. अथवा हीच गोष्ट थोड्या निराळ्या भाषेंत सांगावयाची ह्मटली तर मानवीमनाला आकलन करतां येण्याजोगें अव्यक्त ब्रह्माचें जें व्यक्त रूप तें परमेश्वर. परमेश्वर ज्याप्रमाणें अनाद्यनंत आहे, त्याचप्रमाणें सृष्टीही अनाद्यनंत आहे.

मुक्त आत्म्याला सर्वप्रकारच्या शक्ती आणि सर्व ज्ञान प्राप्त होतें, असें वर्णन श्रीव्यासांनीं आपल्या सूत्राच्या चवथ्या अध्यायाच्या चवथ्या पाद्यांत दिलें आहे. असें वर्णन केल्यानंतर श्री व्यास एका सूत्रांत ह्मणतात, उत्पत्ति, स्थिति आणि लय करण्याचा अधिकार फक्त परमेश्वरास मात्र असून तो दुसऱ्या कोणासही मिळणार नाहीं. या सूत्रावर भाष्य करतांना द्वैतवादी ह्मणतात कीं, जीव हा सदोदित सेवक असल्यामुळें सेव्य परमेश्वराच्या शक्ति त्याला प्राप्त होणें अगदीं अशक्य आहे. याच सूत्रावर द्वैतवाद्यांचे मुकुटमणी श्री मध्वाचार्य यांनीं आपल्या नेहमींच्या रीतीस अनुसरून कडक टीका केली आहे; आणि स्वतःच्या टीकेला पुष्टिकारक ह्मणून वराह पुराणांतले कांहीं श्लोकही दिले आहेत. याच सूत्रावर टीका करतांना श्रीरामानुज ह्मणतात, " उत्पत्तिस्थितिलयादि कार्याचें जें सामर्थ्य एकट्या परमेश्वरासच आहे, तें मुक्त आत्म्यास प्राप्त होतें कीं नाहीं, किंवा हें सामर्थ्य प्राप्त न होतां केवळ प्रत्यक्ष दर्शन हीच मुक्तीची परमावधि आहे कीं काय, असा प्रश्न उपस्थित करून पूर्वपक्षकार ह्मणतो, ' मुक्त आत्म्याला विश्वावर सत्ता चालविण्याचें सामर्थ्य प्राप्त व्हावें हें युक्तीस धरून आहे. ' कारण श्रुतींत असें सांगितलें आहे कीं, मुक्त आत्मा परमेश्वराशीं समानधर्मत्व पावतो; आणि त्याच्या सर्व वासना तृप्त होतात. ज्याअर्थीं श्रुतींनीं सर्व वासना तृप्त होतात असें ह्मटलें आहे, त्याअर्थीं

परमेश्वराची सर्व सत्ताही त्याला प्राप्त झाली पाहिजे; कारण विश्वावर सत्ता चालविण्याचें सामर्थ्य त्याला प्राप्त झालें नाहीं तर त्याच्या इच्छाही तृप्त होणार नाहींत. याकरितां सर्व इच्छा तृप्त होतील असें मानलें तर विश्वावर सत्ता चालविण्याचें सामर्थ्यही त्याला प्राप्त होईल, असें मानलें पाहिजे. यावर आह्मीं असें उत्तर देतों कीं, विश्वावर सत्ता चालविण्याच्या सामर्थ्याखेरीज बाकीच्या सर्व शक्ति मुक्त आत्म्याला प्राप्त होतात. विश्वावर सत्ता चालविणें याचा अर्थ सजीव आणि निर्जीव अशा प्राण्यांच्या इच्छा त्यांचे देह आणि त्यांचा जीवनक्रम यांचें नियमन करणें हा होय. या नियमनांतून मुक्त आत्मा वेगळा असतो ही गोष्ट खरी. कारण त्याच्या स्वरूपावरील पडदा निघून गेल्यामुळें ब्रह्मस्वरूपाच्या स्पष्ट दर्शनाचा आनंद त्याला प्राप्त झालेला असतो. श्रुति ह्मणते, ‘ ज्यापासून सर्व विश्व उत्पन्न झालें आहे, ज्याच्यामुळें त्याचें अस्तित्व असतें, आणि ज्याच्यामध्यें तें लय पावतें तें ब्रह्म. जर विश्वावर सत्ता चालविण्याचें सामर्थ्य सर्व मुक्त आत्म्यांस प्राप्त झालें असतें तर ब्रह्माचीही व्याख्या योग्य झाली नसती. कारण, या व्याख्येंत उत्पत्तिस्थितिलयादि कार्याचें सामर्थ्य त्याच्यांतच आहे असें स्पष्ट केलें आहे.’ ‘ आरंभीं फक्त एकच होतें, त्यानें सभोंवतीं पाहिलें आणि त्याला अनेक व्हावें अशी इच्छा झाली. त्यापासून तेज उत्पन्न झालें.’ ‘ आरंभीं फक्त ब्रह्म मात्र होतें. तेंच ब्रह्म उत्क्रांतीस पावलें; त्यापासूनच वरुण, सोम, रुद्र, पर्ज्यन्य, यम, मृत्यु, ईशान इत्यादि देवता झाल्या.’ ‘ आत्म्यावांचून आरंभीं कांहीं नव्हतें. त्यावांचून कोणताही स्पंद स्फुरण पावत नव्हता. त्यांतूनच जग उत्क्रांत झालें.’ ‘ आरंभीं फक्त नारायण होता; ब्रह्म, ईशान, द्यावा पृथिवी, तारे, पाणी, अग्नि, सोम आणि सूर्य, यांपैकीं कोणीही नव्हतें. या मूल स्वरूपांतून एक कन्या निर्माण झाली. नंतर दशेंद्रियें निर्माण झालीं इत्यादि.’ ‘ जगांत असूनही तो जगाहून निराळा आहे,’ इत्यादि. या सर्व श्रुतींच्या तात्पर्यावरून विश्वावर सत्ता चालविणें हें कार्य करण्याकरितांच परमेश्वर निर्माण झाला आहे, असें स्पष्ट होतें. तसेंच वरील सर्व स्पष्टीकरणांत विश्वावर सत्ता चालविण्याचें सामर्थ्य मुक्त आत्म्याला आहे असें कोठेंही वर्णन नाहीं. यांत वर्णिलेल्या कोणत्याही पदाचा तसा अर्थ करतां येत नाहीं.”

या पुढील सूत्रावर भाष्य करतांना श्रीरामानुज ह्मणतात, 'अशा प्रकारचें सामर्थ्य मुक्त आत्म्याला प्राप्त होतें' अशा अर्थाची श्रुति आहे, असें तुमचें ह्मणणें असेल तर श्रुतींतील तीं वर्णनें खालच्या प्रतीच्या देवतांस अनुलक्षून आहेत.

श्रीरामानुज हे विशिष्टाद्वैती असल्यामुळें सर्व आत्मे भिन्न भिन्न आहेत असें ह्मणतात. या दृष्टीनें त्यांचें मत द्वैतवाद्यांहून फारसें भिन्न नाहीं असें ह्मणावयास हरकत नाहीं. यामुळें व्यक्त आत्मा आणि व्यक्त परमात्मा यांतील भेद कायम ठेवणें हेंच श्रीरामानुजांस इष्ट वाटलें.

अद्वैतमतवाद्यांचें यासंबंधीं काय मत आहे, याचा विचार आपण आतां करूं. द्वैतवाद्यांच्या ज्या सर्व इच्छा व आकांक्षा आहेत, त्या सर्व कायम राखूनहीं आपलें ह्मणणें अद्वैतवादी कसें स्थापन करतात, व मनुष्याच्या उत्क्रांतीची परमसीमा आणि द्वैतवाद्यांचें मत यांची एकवाक्यता कशी करतात याचा विचार करूं. मुक्तीच्या प्राप्तीनंतरही स्वतःचें विशिष्टत्व कायम राखावें अशी ज्यांची इच्छा असेल त्यांची ती इच्छा तृप्त होऊन ब्रह्माच्या सगुण रूपाचा आनंद त्यांस प्राप्त होईल. भागवत पुराणांत त्यांजविषयीं असें सांगितलें आहेः—' हे राजा, परमेश्वराचे असे उज्ज्वल गुण आहेत. आत्मसंतुष्ट आणि ज्यांचे सर्व पाश तुटले आहेत, असे साधुजनही केवळ भक्तीच्या हेतुसाठीं परमेश्वराची भक्ति करतात. ' त्यांजविषयीं सांख्यांचें असें मत आहे, ' एका प्रलयानंतर हे मुक्त आत्मे जगाचे शास्ते ह्मणून पुन्हां उदय पावतात. तथापि ईश्वरत्व पावूं शकत नाहींत.' ज्या ठिकाणीं सृष्टि आणि स्रष्टा, ज्ञाता, ज्ञेय आणि ज्ञान इत्यादि भेद लय पावलेले असतात, अशा स्थितीला ते लय पावलेले असतात. ज्या ठिकाणीं मीं, तूं, तो इत्यादि भेद नाहींत अथवा ज्या ठिकाणीं कर्ताही नाहीं आणि कर्मही नाहीं, त्या ठिकाणीं कोण कोणाला पाहाणार ? ' **यतो वाचो निवर्तन्ते अप्राप्य मनसा सह** ' किंवा ' नेति नेति ' या शब्दांनीं श्रुतीनें या स्थितीचें वर्णन केलें आहे; परंतु जे या स्थितीस पोंहोंचूं शकत नाहींत अथवा ज्यांची पोहोंचण्याची इच्छा नाहीं, त्यांना प्रकृति, आत्मा आणि ईश्वर या विविध रूपानेंच ब्रह्म प्रतीत होईल. प्रल्हाद ज्यावेळीं स्व-त्व विसरला, त्यावेळीं हें विश्व अथवा त्याचें कारण या दोहोंचाही त्याच्या दृष्टीनें लोप झाला. जें कांहीं आहे, तें

अनंत आणि नामरूपविरहित असें आहे, असा अनुभव त्याला आला; पण ' मी प्रल्हाद आहें ' अशी जाणीव त्याच्या ठिकाणीं उत्पन्न झाल्याबरोबर विश्व आणि विश्वाचा शास्ता ईश्वर असा भेद त्याला दिसू लागला. अशीच गोपींचीही स्थिति झाली होती. आत्मभाव जोंपर्यंत त्या विसरल्या होत्या, तोंपर्यंत त्या सर्व कृष्णरूप झाल्या होत्या; पण ' हा कृष्ण आहे ' इतकी जाणीव होण्याबरोबर त्या पुन्हां स्वतः गोपी झाल्या. त्यांना कृष्णाच्या मुखकमलावरील हास्य दिसूं लागलें. त्यानें पीतांबर परिधान केला असून त्याच्या गळ्यांत माळा आहेत व तो साक्षात् मदनाचा मदन आहे, असें त्यांना दिसूं लागलें.

ह्या मुद्यावर श्रीशंकराचार्य काय ह्मणतात याचा आतां विचार करूं. आचार्य ह्मणतात, स्वतःचें वेगळें अस्तित्व कायम राखून जे उपासक सगुणब्रह्माच्या जवळ पोंचतात त्यांचें उच्चत्व सांत आहे कीं अनंत आहे असा प्रश्न उपस्थित करून पूर्वपक्ष ह्मणतो, ' त्यांची शक्ति अनंत असली पाहिजे असें श्रुतिवचनांवरून दिसतें. सर्व देव त्याची पूजा करतात, सर्व लोकांत त्याच्या इच्छा तृप्त होतात, इत्यादि, श्रुतीवचनांवरून त्यांना अनंत सामर्थ्यांची प्राप्ती होते, असें ह्मटलें पाहिजे. यावर श्रीव्यास ह्मणतात, विश्वावर सत्ता चालविण्याचें जें ईश्वराचें सामर्थ्य आहे त्याखेरीज बाकीचें सर्व प्रकारचें सामर्थ्य त्याला प्राप्त होतें. त्याला अणिमादि अष्ट सिद्धींची प्राप्ति होते. पण सृष्टि निर्माण करणें इत्यादी जे ईश्वराचे गुण आहेत, त्यांची प्राप्ति त्यांस होत नाहीं. असें कां? कारण तें सामर्थ्य फक्त एका ईश्वराचेंच आहे असें श्रुतींनीं सांगितलें असून यासंबंधांत मुक्त आत्म्याचा त्यांनीं नामनिर्देशही केलेला नाहीं. विश्वावरील सत्ता ही एकट्या परमेश्वराची आहे, या अर्थाचीं जितकीं श्रुतिवचनें आहेत तीं फक्त ईश्वरालाच अनुलक्षून आहेत. त्याचप्रमाणें श्रुतींनीं सदा परीपूर्ण अशा विशेषणांनीं त्याचा उल्लेख केला आहे. तसेंच अणिमादि सिद्धि ह्या परमेश्वराच्या उपासनेनेंच प्राप्त होतात असेंही श्रुतिवचन आहे. यावरून विश्वाच्या नियमनाचें सामर्थ्य मुक्त आत्म्यास प्राप्त होत नाहीं, असाच श्रुतींचा अभिप्राय दिसतो. याशिवाय आणखीही एक गोष्ट लक्ष्यांत ठेवण्यासारखी आहे. ती ही कीं, मुक्त आत्म्याचीं स्वतःचीं मनें वेगळीं शिल्लक राहिलीं असतां त्यांच्या ठिकाणीं निरनिराळ्या इच्छा

उत्पन्न होण्यासारख्या आहेत. एक आत्मा सृष्टि उत्पन्न करण्याची इच्छा करीत असतां त्याचवेळीं दुसरा आत्मा तिचा लय करण्याची इच्छा करील हें संभवनीय आहे. अशा प्रकारें सर्वत्र विरोध आढळून येईल. असा विरोध उत्पन्न होऊं नये याकरितां एकच तजवीज शक्य आहे. ती ही कीं, विश्वांतील साऱ्या इच्छाशक्ती एकाच इच्छाशक्तीच्या अमलाखालीं राहिल्या पाहिजेत. या सर्व विवेचनावरून एकच सिद्धान्त असा ठरतो कीं, मुक्त आत्म्यांच्या इच्छाशक्ति एका सर्वेश्वराच्या इच्छाशक्तीच्या अमलाखालींच असल्या पाहिजेत.

व्यक्त ब्रह्माचीच भक्ति करितां येते असें येथवर केलेल्या विवेचनावरून उघड होतें. **अव्यक्ता हि गतिर्दुःखं देहवद्भिरवाप्यते.** अव्यक्त ब्रह्माच्या मागें जे लागलेले आहेत त्यांचा मार्ग अधिक कठीण आहे. व्यक्त ब्रह्माच्या भक्तीचा मार्ग हा अत्यंत सोपा आहे; कारण हा मार्ग आपल्या मानवी मनोधर्मांशीं सुसंगत आहे. ब्रह्माचें जें स्वरूप मानुषी अवयवांनीं युक्त नसेल अशा स्वरूपाची कल्पना आपल्या मनास करतां येणार नाहीं, ही गोष्ट खरी; आणि आपल्या सर्व प्रकारच्या ज्ञानास हीच गोष्ट लागू आहे. आपण जें कांहीं प्रत्यक्ष पाहतों, अथवा जें आपणास कल्पनेंत आणतां येतें त्या अंतर्गत अथवा बाह्य पदार्थांच्या रचनेंत आपल्या बुद्धीचा अंश मिसळलेला असतो, ही गोष्ट दर्शनकारांचे मुकुटमणी भगवान् कपिल यांनीं कित्येक युगांपूर्वी सिद्ध केली आहे. आपल्या स्वतःच्या शरिरापासून तों ईश्वरापर्यंत जो जो पदार्थ आपल्या अवलोकनांत येतो, त्या सर्वांत आपल्या बुद्धीचा अंश व दुसरे बाह्यपदार्थ यांचें मिश्रण असतें. कोणताही पदार्थ घेतला तरी त्यांत या दोहोंचें मिश्रण असावयाचेंच. आपल्या बुद्धितत्त्वाचा अंश ज्यांत मिसळलेला नाहीं, असा एकही पदार्थ आपणास ज्ञात असलेल्या सृष्टींत नाहीं. या मिश्रणासच आपण सत्य असें समजून चालतों. यावांचून दुसऱ्या प्रकारच्या सत्य वस्तूची कल्पना करणें मानवी मनास शक्य नाहीं. या दृष्टीनें पाहतां मानुषी आकाराच्या परमेश्वराची कल्पना हीसुद्धां सत्य वस्तूच झटली पाहिजे. कारण अन्य प्रकारच्या सत्य वस्तूची कल्पना मानवी मनास संभवतच नाहीं. याकरितां सावयव परमेश्वराची कल्पना वेडेपणाची आहे, असें ह्मणणारे लोकच वेडे होत. पाश्चात्य देशांत काल्पनिक आणि सत्य अशा दोन वस्तूं-

च्या मागें लागणाऱ्या लोकांचे दोन तट असून त्यांजमध्यें भयंकर तंटे सुरू असतात. सत्य ह्मणजे काय, याचा उलगडा या दोन्ही पक्षांस न झाल्यामुळें यांजमध्यें तंटे होतात. सत्य या शब्दानें जी कांहीं कल्पना आपल्या मनांत येते, त्या साऱ्या कल्पनेचा अंतर्भाव ईश्वर या शब्दांत होतो. हें सारें विश्व जितकें सत्य आहे, तितकाच परमेश्वरही सत्य आहे. सत्य वस्तु या शब्दाचा शास्त्रीय अर्थ काय आहे याचेंही विवेचन मी नुकतेंच केलें आहे. आपल्या ईश्वरविषयक कल्पनांचें तात्त्विक स्वरूप याप्रकारचें आहे.

---

## प्रकरण ३ रें.

## मुक्ति हेंच भक्तियोगाचें साध्य.

अशाप्रकरचें कोरडें शास्त्रीय विवेचन भक्ताची भक्ति पक्की करण्यापुरतेंच उपयुक्त आहे. असल्या कोरड्या विवेचनांचा त्याला दुसरा कांहीं उपयोग नाहीं. ज्या मार्गावर तो आरूढ झाला आहे, तो मार्ग विवेचकबुद्धीच्या अंधुक आणि अस्थिर प्रदेशांतून बाहेर घेऊन जाण्यास समर्थ आहे. तो मार्ग प्रत्यक्ष ज्ञानाचीच भेट करून देण्यास समर्थ आहे. ज्याठिकाणीं विवेचक बुद्धि आपली नजरही फिरवूं शकत नाहीं, त्या ठिकाणीं ईश्वर आपल्या भक्ताला पोंहचवितो. अशा ठिकाणीं ज्ञानाची प्रत्यक्ष भेट झाल्यामुळें बुद्धीच्या अंधकारमय मार्गांतून चांचपडत जाण्याचें कारणच पडत नाहीं. तो बुद्धिवाद करीत नाहीं, अथवा नुसता विश्वासही ठेवित नाहीं. सत्याला तो प्रत्यक्षच पहात असतो. त्याला कल्पनेच्या साम्राज्यांत भराऱ्या मारण्याचें कारणच पडत नाहीं. परमेश्वराचें प्रत्यक्ष दर्शन, त्याचा प्रत्यक्ष स्पर्श आणि त्याच्या आनंदाचा उपभोग यांहून अधिक लोभनीय असें या विश्वांत काय आहे ? या भक्तिरसांत बुडून जाणें हें मुक्तीहूनही अधिक गोड आहे, असें ह्मणणारे अनेक भक्त होऊन गेले. '**घोटवीन लाळ, ब्रह्मज्ञान्या हातीं। मुक्ता आत्मस्थिती सांडवीन ।** ' असा बाणा बाळगणारे भक्त अनेक होऊन गेले. केवळ उपयुक्ततेच्या ग्राम्य दृष्टीनें पाहतां ही उपयुक्ततेची अत्युच्च दशा नाहीं काय ? या जगांत पुष्कळ लोक असे आहेत कीं, इंद्रियजन्य सुखें ज्यांपासून

निर्माण होतील, तेवढ्याच वस्तु उपयुक्त आहेत असें ते समजत असतात. पैशाची अथवा इंद्रियजन्य सुखांची प्राप्ति होत नसेल तर धर्म, परमेश्वर, आत्मा, अमरत्व इत्यादि सारे पदार्थ त्यांच्या दृष्टीनें त्याज्य होत. इंद्रियजन्य सुखांची तृष्णा ज्या पदार्थांनीं शमन होत असेल तेवढेच पदार्थ त्यांच्या दृष्टीनें उपयुक्त या कोटींत येतात. तथापि प्रत्येक माणसाची तृष्णा वेगवेगळ्या प्रकारची असल्यामुळें त्यांच्या वेगवेगळ्या दृष्टीनें उपयुक्त या सदराखालीं येणारे पदार्थ वेगवेगळे असूं शकतील हें लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे. **'आहारनिद्राभयमैथुनंच,'** या पलीकडे अधिक उच्च साध्यावर ज्यांची नजरही पोंचली नसेल, त्यांना इंद्रियजन्य सुखाच्या तृप्तींतच मोठा लाभ वाटावा हें साहजिकच आहे. याहून अधिक उच्च दर्ज्याच्या साध्याची नुसती इच्छा होण्यास सुद्धां त्यांनीं आणखीही बरेच जन्म घेतले पाहिजेत; पण ज्यांना या क्षणभंगुर जीवितांतील सुखाची किंमत उरलेली नाहीं, ज्यांना इंद्रियजन्य सुखें हीं मुलांच्या खेळण्याहून अधिक योग्यतेचीं वाटत नाहींत, आणि ज्यांना आत्मिक कल्याण अधिक योग्यतेचें वाटतें, त्यांना परमेश्वराचें प्रेम हेंच मानवी जीवितांतील अत्यंत उपयुक्त साध्य आहे असें वाटतें. केवळ इंद्रियजन्य सुखांच्या मागें धांवणाऱ्या या मानवसमूहांत कांहीं थोडेतरी लोक अशाप्रकारचे आढळतात, ही परमेश्वराची केवढी कृपा आहे! भक्तियोगांत गौणी आणि परा अशा पायऱ्या आहेत हें पूर्वीं सांगितलेंच आहे. यांपैकीं गौणी ही पहिली अथवा पूर्वतयारीची पायरी असून परा ही उच्च कोटीची स्थिती आहे. गौणी भक्तीच्या पायरीवर असतां भक्तीची अधिकाधिक उच्च दशा प्राप्त करून घेण्याकरितां प्रत्यक्ष पदार्थांच्या मदतीची आपणास कशी आवश्यकता लागते, याचा विचार आपण पुढें हळुहळु करूं. सर्व धर्मांत पुराणें किंवा दंतकथा ह्मणून जे भाग आहेत, त्यांत अनेक कथा आणि व्रतादिकांचे उल्लेख आलेले आहेत. तेही भक्तीच्या मार्गावर आरूढ झालेल्या आत्म्यांच्या निरनिराळ्या पायरींचे दर्शक आहेत. हे आत्मे परमेश्वराकडे जावयास निघाले असतां उन्नतीच्या निरनिराळ्या दशेंत त्यांची कशी कशी स्थिति होत गेली, हें आपणास या पौराणिक भागावरून दिसून येतें. तसेंच ज्या धर्मांत सुंदर दंतकथांचा आणि व्रतनियमादि उपासनेच्या प्रकारांचा भरपूर भरणा असेल, त्याच धर्मांत अध्यात्मिक उन्नतीच्या श्रेष्ट पदवीवर पोहोंचलेले महात्मे

निर्माण होतात, ही गोष्टही विशेषेंकरून लक्ष्यांत ठेवण्यासारखी आहे. अशा प्रकारचे धर्मांतील भाग हे काव्यमय, सुंदर आणि गंभीर असतात. बाल्यावस्थेंतील मानवी मन परमेश्वराकडे चांचपडत जात असतां त्याला या कथा आधारस्तंभासारख्या उपयोगी पडतात. धर्मांतील या कथाकलापांचें उच्चाटन करावें असें ह्मणणारे जे पंथ निघाले आहेत, ते या धर्मरूपी इमारतीचे वासे मोडून टाकीत आहेत. मानवी मनांत ज्याचा मोड नुकताच उगम पावूं पहात आहे, अशा धर्मवृक्षाचें जीवन हे आटवीत आहेत. स्वतःच्या मूर्खपणानें आणि सत्याबद्दलच्या मूर्खत्वाच्या कल्पनेनें जे पंथ या भागाचें उच्चाटन करूं पाहतात, त्यांच्या हातीं शुद्ध करवंटीशिवाय शेवटीं कांहीं उरणार नाहीं. नुसतें शब्दावडंबर आणि दांभिकपणा यांशिवाय अधिक महत्वाचें असें कांहीं त्यांच्या हातीं लागणार नाहीं. सुधारणा करण्याकरितां ह्मणून जे पंथ पुढें सरसावत आहेत, त्यांच्या असल्या प्रकारच्या कामगिरींत उपयुक्ततेचा जो किंचितसा अंश आहे, तो इतकाच कीं त्यामुळें सामाजिक घाण नष्ट होण्यास थोडीशी मदत होईल. जे लोक अशा प्रकारच्या धर्माचा पुरस्कार करितात ते जडवादी असतात. त्यांपैकीं कित्येकांस ही गोष्ट कळत असेल अथवा नसेल, तथापि ऐहिक अथवा पारलौकिक इंद्रियजन्य सुखांची तृप्ति हेंच त्यांचें अंतिमसाध्य असतें. मानवी जीविताचा हाच हेतु आहे अशी त्यांची दृष्टि असते. हेंच त्यांचें इष्टापूर्त असतें. रस्ते झाडणें आणि मोऱ्या साफ ठेवणें हेंच कायतें मानवीजीविताचें साफल्य असें त्यांस वाटत असतें. अज्ञान आणि आततायित्व यांचें हें विलक्षण मिश्रण जवळ बाळगणारे लोक उघडपणें निरीश्वरवादी अथवा जडवादी होतील तर जगाचें अधिक कल्याण होईल. तोंडाला फेंस येईपर्यंत नुसती वटवट करण्यापेक्षां आणि उच्च भावनांचे नुसते फवारे सोडण्यापेक्षां सत्य मार्गाचा रतिभरही प्रत्यक्षावलंब आणि रतिभरही आध्यात्मिक अनुभव यांची योग्यता शतपट अधिक आहे. असल्या प्रकारच्या मिश्रणांतून एक तरी महात्मा निर्माण झाला आहे, असें आह्मांस कोणी दाखवूं शकेल काय ? हें तुमच्यानें होत नसेल, तर आतां तोंडें बंद करून आपल्या अंतःकरणाचीं द्वारें खुलीं करा. असें केल्यानें सत्याचा प्रकाश तुमच्या हृदयांत शिरण्यास अवकाश तरी सांपडेल. आपण तोंडानें काय

बोलत आहों, याचा प्रत्यक्ष अनुभव ज्यानें घेतला आहे, अशा साधुश्रेष्ठांच्या चरणीं शिष्यवृत्तीनें लीन होणें हेंच तुह्मांस इष्ट आहे. याविषयीं ते साधुश्रेष्ठ आपणास काय सांगत आहेत याचा विचार करूं.

## प्रकरण ४ थें.

## सद्गुरुवांचोनी सांपडेना सोय.



प्रत्येक जीवात्मा अखेरीस पूर्णत्व पावणार असून, अखेरीस पूर्णत्व पावणें हेंच त्याचें ध्येयही आहे. आपण सध्यां ज्याप्रकारच्या परिस्थितींत सांपडलों आहों. ती स्थिति आपलीं पूर्वकर्में आणि पूर्वविचार यांजमुळें आपणच निर्माण केलीं आहेत. त्याचप्रमाणें भविष्यत्कालीं जी कांहीं स्थिति आपणांस प्राप्त होणार आहे तीसुद्धां आपल्या चालू जन्मांतील कर्मांच्या आणि विचारांच्या संघटनेचेंच फल असेल. अशा रीतीनें आपली भावी परिस्थिति आपल्याच कर्मांनीं निर्माण होत असली तरी त्यामुळें आपणांस दुसऱ्याची मदत घेतां येत नाहीं असें नाहीं. इतकेंच नव्हे तर आपणांपैकीं बहुतेक सर्वांना बाह्य मदतीची आवश्यकताच असते. आपणास बाहेरून मदत मिळाली ह्मणजे आत्म्याच्या उच्चतर शक्ती आणि त्याचें अंतर्गत सामर्थ्य हीं अधिक उज्ज्वल होतात, धार्मिक जागृति उत्पन्न होते, वाढ अधिक झपाट्यानें होऊं लागते आणि शेवटीं पवित्र होऊन तो पूर्णत्व पावतो.

उन्नतीच्या दिशेचें हें आक्रमण केवळ ग्रंथांच्या साहाय्यानें होणें शक्य नाहीं. एका जीवात्म्याला जें चालन मिळावयाचें तें दुसऱ्या जीवात्म्याकडून मिळतें. तें त्याला इतर कोणत्याही वस्तूकडून प्राप्त होत नाहीं. सारा जन्म आपण ग्रंथांचा अभ्यास केला तर फार झालें तर आपली बुद्धि मात्र जागृत होईल. पण अखेरीस धार्मिक उन्नतीची एक पायरीही आपण चढलों नाहीं असें आपल्या अनुभवास येईल. मनुष्यांतील बुद्धीची वाढ ज्याप्रमाणानें होत जाते त्याचप्रमाणानें त्याची धार्मिक वाढही होते असें नाहीं. केवळ ग्रंथांच्या वाचनानें आपल्या अध्यात्मिक उन्नतीस मदत मिळत आहे, अस

भ्रम आपणास केव्हां केव्हां पडतो. पण आपल्या मनोवृत्तींचें आपण सूक्ष्म-पृथक्करण केलें तर अशा प्रकारच्या अभ्यासानें केवल बुद्धीचीच वाढ झाली असून आध्यात्मिक उन्नतीला त्यापासून यत्किंचितही मदत झाली नाहीं असें आपल्यास आढळून येईल. धर्मसंबंधीं गोष्टी केवळ तोंडानें बोलत असतां आपणापैकीं प्रत्येक एखाद्या शंकराचार्यांची सुद्धां बरोबरी करतो. पण आपण सांगत असलेल्या तत्त्वांपैकीं केवळ एकच तत्त्व प्रत्यक्ष आचरणांत आणावयाचें ह्मटलें तर आपली कशी फजीति उडते याचा आपणांपैकीं प्रत्येकास अनुभव आहेच. असें कां होतें ? याचें कारण हेंच कीं, ग्रंथांच्या वाचनानें आपली बुद्धि मात्र प्रगल्भ झालेली असते. त्या अभ्यासाची मदत आध्यात्मिक जीवनास झालेली नसल्यामुळें आपल्या ठिकाणीं योग्य आचरण करण्यास लागणाऱ्या सामर्थ्याचा अभाव असतो. आपल्या जीवात्म्याला जें चालन मिळावयाचें तें दुसऱ्या जीवात्म्याकडूनच मिळणें शक्य आहे.

ज्या जीवात्म्याकडून अशा प्रकारचें चालन मिळतें, त्याला गुरु असें ह्मणतात, आणि ज्या जीवात्म्याला हें चालन प्राप्त झालेलें असतें त्याला शिष्य असें ह्मणतात. जो जीवात्मा अशाप्रकारचें चालन देऊं पहात असतो, त्याला तसें चालन देण्याचें सामर्थ्य असलें पाहिजे. तसेंच हें चालन ग्रहण करण्याचें सामर्थ्य शिष्याच्या अंगींही असलें पाहिजे. बियांच्या अंगीं जिवंतपणा पाहिजे आणि तें जींत पडणार, ती जमीनही प्रथम नांगरून तयार केलेली असली पाहिजे. हीं दोन्हीही योग्य स्थितींत असलीं ह्मणजे वृक्षाची वाढ झपाट्यानें होते. त्याचप्रमाणें गुरु आणि शिष्य ही जोडी परस्परांस योग्य अशी असली ह्मणजे त्या ठिकाणीं धर्माची वाढ झपाट्यानें होते. '**आश्चर्यो वक्ता कुशलोऽस्य श्रोता ।**' वक्त्याजवळ ज्याप्रमाणें आश्चर्यकारक सामर्थ्य पाहिजे, त्याचप्रमाणें श्रोताही कुशल असला पाहिजे. अशाप्रकारें ही जोडी असामान्य असली तरच दिव्य धर्मजागृती ताबडतोब उत्पन्न होईल. यांत कांहीं उणेपणा आला तर हें कार्य घडून यावयाचें नाहीं. अशा प्रकारचें सामर्थ्य ज्या गुरूंच्या ठिकाणीं असतें, तेच सद्गुरू या पदवीला योग्य असतात. त्याच-प्रमाणें योग्य सामर्थ्य ज्या शिष्यांच्या ठिकाणीं असतें तेच सच्छिष्य ह्मणविले जातात. याशिवाय इतर प्रकारचे अनेक गुरु हे शिष्यचित्तापहारक नसून

शिष्यवित्तापहारक मात्र असतात. कित्येक शिष्य ह्मणविणारांस धार्मिक जीवन हा एकप्रकारचा खेळ वाटत असतो. त्यांच्या ठिकाणीं थोडीशी जिज्ञासा मात्र जागृत झालेली असते. दुसऱ्या कित्येकांस त्यामुळें बुद्धीची वाढ होईल असेंच वाटत असतें. हे लोक धार्मिक जीवनाच्या क्षितिजाच्या बाहेरच्या कडेवर मात्र येत असतात. अशाप्रकारच्या लोकांस अगदींच किंमत नसते असें नाहीं. कालेंकरून त्यांच्यांतही धार्मिक जीवनाची खरी तृष्णा उत्पन्न होण्याचा संभव असतो आणि अशी खरी तृष्णा उत्पन्न झाली ह्मणजे तृप्ति करणारा मेघ अवश्यमेव भेटतोच. निसर्गाचें असें एक विलक्षण कार्य आहे कीं, जमिनीची खरी तयारी झाल्याबरोबर त्या ठिकाणीं बीं आपोआप येऊन पडतें. त्याच प्रमाणें धार्मिक जीवनाची आत्यंतिक तृषा ज्याच्याठिकाणीं उत्पन्न झाली असेल, त्यालाही सद्गुरूची भेट अवश्य होते. शिष्याच्या ठिकाणीं आध्यात्मिक जीवन गृहण करण्याची शक्ति अत्यंत तीव्र झाली ह्मणजे तें जीवन दान करणारी शक्ति त्याठिकाणीं आपोआप धांवून येते.

आतां येथें एक भीतीचें ठिकाण आहे, त्याचाही विचार केला पाहिजे. धार्मिक जीवनाची प्राप्ति आपणास व्हावी अशा क्षणिक भावना कित्येकांच्या ठिकाणीं उठत असतात; आणि या क्षणभंगुर भावना चिरंतन टिकणाऱ्या आहेत, असा भ्रम त्यास केव्हां केव्हां पडत असतो. या गोष्टीचें प्रत्यंतर आपणास आपल्या ठिकाणींही पाहातां येईल. आपल्या सामान्य जीवनक्रमांत अशाप्रकारचे अनेक प्रसंग येतात. आपलें ज्यावर अत्यंत प्रेम आहे असें एखादें माणूस मरतें, त्यावेळीं आपणांस मोठा धक्का बसतो. हें सारें जग आपणापासून दूर दूर जात आहे असें आपणांस वाटतें. या क्षणभंगुर जीविताहून अधिक चिरस्थायी आणि उच्चतर स्थिति आपणास प्राप्त व्हावी असें वाटूं लागतें. अशी स्थिति प्राप्त करून घेण्यास धर्माची कांस धरावी, असें आपल्या मनांत येतें; पण ही स्थिति क्षणभंगुर असते. आपल्या भावनांना आलेली ही भरती थोड्याच दिवसांनीं ओसरून जाते; आणि पुन्हां आपण पूर्वींच्याच कोरड्या जागेवर उभे आहोंत, असें आढळून येतें. ज्या ज्या वेळीं आपल्या चित्तांत असल्याप्रकारच्या भावनांचा उद्रेक होतो, त्या त्या वेळीं धार्मिक जीवनाची खरी तृष्णा आपणास लागली आहे, असा भ्रम आपल्या ठिकाणीं उत्पन्न होतो. अशा प्रकारचा

भ्रम आपणामध्यें असेल तोंपर्यंत आपणास खरी तृष्णाही लागणार नाहीं; आणि तिच्याअभावीं सद्गुरूची भेटही व्हावयाची नाहीं. याकरितां आपणास सद्गुरूची भेट होत नाहीं आणि आपले सारे प्रयत्न फुकट जातात, अशी तक्रार जे कोणी करीत असतील त्यांनीं आत्मस्थितीचें योग्य परीक्षण करावें. आपल्या अंत:करणांतील तृष्णा खरोखर जाज्वल्य आहे कीं नाहीं हें त्यांनीं पहावें. अशा प्रकारें अनेक अंत:करणांचें परीक्षण केलें असतां त्यांच्या ठिकाणीं धार्मिक जीवनाची खरी तृष्णाच नव्हती आणि सत्य वस्तूचें गृहण करण्यास तीं योग्य नव्हतीं असें आपणास आढळून येईल. सद्गुरुविषयीं पहातां त्यांत याहून अधिक भयावह अशीं स्थानें आहेत. पुष्कळ लोक असे आढळण्यांत येतात कीं, ते अज्ञानतिमिरांत पूर्ण गढून गेले असतां केवळ स्वत:च्या घमेंडीनें स्वत:स ज्ञानपूर्ण समजत असतात. हे पंडितंमन्य एवढयावरच थांबून रहात नाहींत. तर दुसऱ्याचेही मार्गदर्शक बनूं पहातात. अशारीतीनें गुरु व शिष्य मिळून एक आंधळ्यांची मालिका बनून ती सारी खाड्यांत पडते. '**अविद्यायामन्तरे वर्तमानाः स्वयं धीराः पंडितंमन्यमानाः । जंघन्यमानाः परियंति मूढा अंधेनैव नीयमाना यथान्धाः ।**' असल्या प्रकारच्या पंडितंमन्यांनीं हें जग भरलें आहे. सद्गुरु होण्याची यांपैकीं प्रत्येकजण इच्छा करीत असतो. त्यांतला प्रत्येक भिकारी लक्षावधि रुपयांचें दान करण्याची इच्छा करीत असतो. भिकाऱ्याचें दातृत्व आणि अशा लोकांचें सद्गुरुत्व हीं दोन्ही एकाच किंमतीचीं आहेत.

## प्रकरण ५ वें.

## शिष्य आणि गुरु यांस लागणारे आवश्यक गुण.

सद्गुरूवांचून सोय नाहीं हें खरें, पण सद्गुरु ओळखावयाचा कसा ? सूर्य ओळखावयासाठीं मशालीची गरज लागत नाहीं अगर मेणबत्तीही पेटवावी लागत नाहीं. सूर्य उगवला ह्मणजे ती गोष्ट आपणास आपोआप समजून येते. त्याचप्रमाणें मनुष्यांचा मार्गदर्शक सद्गुरु उदय पावला ह्मणजे त्याचा प्रकाश आपोआप सर्वत्र पसरतो. आपणांस आपल्या

गुरूची भेट झाली ह्मणजे सत्याचे प्रकाशकिरण आपणांकडे येत आहेत, असा अनुभव आपल्या जीवात्म्यास आपोआप येऊं लागतो. सत्य हें स्वयंप्रकाश असल्यामुळें त्याच्या पुराव्यासाठीं दुसऱ्या कोणाची साक्ष नको. तें अमक्यानें सांगितलें ह्मणून खरें मानावयाचें असा प्रकार सत्य वस्तूच्या ठिकाणीं नाहीं. तें आपल्या अंतःकरणाच्या अत्यंत खोल भागांत प्रवेश करतें; आणि त्यानें प्रवेश केला ह्मणजे त्यावेळीं सारें विश्व उभें राहून ' हें सत्य पहा ' असें आपल्या कानांत ओरडूं लागतें. सूर्यप्रकाशाप्रमाणें ज्यांच्या ज्ञानाचा प्रकाश फांकतो, ते सद्गुरु साऱ्या जगांत अत्यंत श्रेष्ठ प्रतीचे होत. अशा सद्गुरूंच्या चरणीं लीन होऊन मानवजातीचा बराच मोठा भाग परमेश्वराप्रमाणें त्यांचें पूजन करतो. आपणास अशा प्रकारच्या सद्गुरूची भेट न झाली, तथापि यांहून कमी प्रतीच्या गुरूंची मदत आपणास होण्यासारखी असते. येथें भीतीचें स्थान इतकेंच कीं, ज्यापासून आपण मार्गदर्शनाची आणि ज्ञानाची इच्छा करीत असतों तो मनुष्य कसा आहे, हें जाणण्याची आपणास शक्ति नसते. याकरितां सद्गुरूच्या आंगीं कांहीं गुण अवश्य असले पाहिजेत. या गुणांवरून त्यांची परीक्षा करण्यास आपणास मदत होईल. सद्गुरूप्रमाणेंच शिष्यांच्या अंगींही कांहीं गुणांची आवश्यकता आहे.

पावित्र्य, ज्ञानाची खरी तृष्णा व उद्यमशीलता हे गुण शिष्याच्या अंगीं अवश्य पाहिजेत. अपवित्र जीवात्मा कधींही धर्मपरायण होऊं शकत नाहीं. ज्या कोणास धर्मपरायण व्हावें असें अंतःकरणपूर्वक वाटत असेल, त्यानें कायिक, वाचिक आणि मानसिक अशा त्रिविध पावित्र्याची जोड मिळविली पाहिजे. आपणास ज्याबद्दल अत्यंत गरज उत्पन्न होते त्याच वस्तूचा लाभ आपणास होतो, हा अनादिसिद्ध कायदा आहे. ज्ञान मिळविण्याच्या बाबतींतही हाच कायदा लागू आहे. ज्ञानार्जनाची तृष्णा अत्यंत तीव्र झाल्यावांचून त्याचा लाभ आपणास होणार नाहीं. ज्या वस्तूच्या ठिकाणीं आपलें सर्व अंतःकरण पूर्णपणें लागून गेलें असेल, तीवांचून इतर वस्तु आपणास प्राप्त होत नाहींत. कारण तसें होणें शक्यच नाहीं. धर्मपरायणतेची खरी तृष्णा उद्भवणें हें आधीं फार कठीण आहे. तें अगदीं सोपें आहे असें आपणांस पुष्कळ वेळां वाटतें, पण तो आपला भ्रम आहे. पुराणें श्रवण करणें

अथवा धर्मग्रंथांचीं पारायणें करणें एवढींच साधनें धर्मपरायण होण्याची इच्छा सिद्ध करण्यास पुरेशीं नाहींत. ज्यादिवशीं अंतःकरणांतील खळबळीस एका क्षणाचाही खळ पडणार नाहीं आणि जेव्हां आपण आपल्या पशुवृत्तीवर ताबा मिळविण्यासाठीं अविरत श्रम करूं लागूं, त्याच दिवशीं खरी इच्छा आपल्या ठिकाणीं उत्पन्न होईल. अशी तीव्र जिज्ञासा उत्पन्न होईपर्यंत आणि अखेरचा जय मिळवीपर्यंत हें युद्ध आपणांस असेंच चालू ठेवावें लागेल; ही गोष्ट एक दोन दिवसांत साध्य होण्यासारखी नाहीं. ती साध्य होण्यास कदाचित् कित्येक वर्षांचा काळ लोटून जावा लागेल. हें युद्ध सुरू असतां कदाचित् हा सारा जन्म निघून जाईल अथवा आणखी शंभर जन्मही जावे लागतील. कित्येक वेळां आपलें साध्य लौकर गांठलें जाईल; पण जरूर लागल्यास अनेक जन्मही वाट पहाण्याइतका धीर आपल्या अंगीं असला पाहिजे. आपलें साध्य सिद्ध होण्यास अनंत काळ लागणार असें दिसलें तरी आपला धीर खचतां उपयोगी नाहीं. अशा रीतीची धीरयुक्त उद्यमशीलता ज्या शिष्याच्या अंगीं असेल, तो अखेरीस विजयी होईल यांत संशय नाहीं.

शास्त्रग्रंथांतील रहस्य जाणण्याचें सामर्थ्य आपल्या भावी गुरूला आहे कीं नाहीं, हें आपण प्रथम पाहिलें पाहिजे. बायबल, वेद आणि कुराण या ग्रंथांचें वाचन सारें जग करीत असतें; पण त्या वाचनांत नुसत्या शब्दच्छलाशिवाय अधिक कांहीं सांपडावयाचें नाहीं. अमुक शब्दाचा संबंध कोठें आहे, तो कोणत्या भाषेंतून आला आहे आणि त्याचा संबंध दुसऱ्या कोणत्या शब्दांशीं आहे इत्यादि गोष्टींच्या चर्वणाशिवाय या वाचनांत अधिक महत्वाचें असें कांहीं नसतें. असलें वाचन ह्मणजे धर्मांचा केवळ अस्थिपंजर होय. जो गुरु अशा प्रकारचें अस्थिचर्वण करितो, आणि केवळ शब्दजालांत गुरफटलेला असतो, त्याला ग्रंथांतील रहस्यांचें ज्ञान होत नाहीं. ज्याला शास्त्रग्रंथांतील खऱ्या रहस्यांचें–चैतन्याचें—ज्ञान झालें असेल, तोच खरा गुरू होऊं शकेल. खरें धर्मज्ञान संपादन करण्यासाठीं अशा प्रकारच्या गुरूची गरज आहे. "**शब्दजालम् महारण्यं चित्तभ्रमणकारणम्** " एखाद्या महाअरण्यांत सांपडलेला मनुष्य ज्याप्रमाणें इकडे तिकडे भटकत असतांही त्याला रस्ता सांपडत नाहीं, त्याचप्रमाणें केवळ शब्दजालांत जो सांपडला, त्याचें चित्त अधिक भ्रमांत मात्र पडतें; त्याला खऱ्या रहस्याची प्राप्ति

होत नाहीं. सुंदर भाषा आणि सुंदर विवेचनपद्धति हीं पंडितांच्या चित्तरंजनाचीं साधनें होत आहेत. त्यांपासून खऱ्या ज्ञानप्राप्तीला फारसा उपयोग होत नाहीं. " **वाग्वैखरी शब्दझरी शास्त्रव्याख्यान कौशलम् । वैदुष्यं विदुषां तद्वत् भुक्तये न तु मुक्तये ॥** " अशाप्रकारें शास्त्रप्रवचन करणाऱ्यांची इच्छा पाहिली तर ती केवळ पंडित ह्मणवून घेण्याची असते. विद्वान् ह्मणून जगानें आपली स्तुति करावी, याच इच्छेनें हें शब्दजाल ते पसरीत असतात. जगांत जे खरे सद्गुरू आजपर्यंत होऊन गेले, त्यांनीं शास्त्रवचनांशीं अशा रीतीनें कधींही धुडगुस घातला नाहीं. शब्दाशब्दागणिक अर्थांचा कीस पाडण्याचा यत्न त्यांनीं केला नाहीं; अथवा एकेका शब्दावर चारचार अर्थही बसविले नाहींत; तथापि त्यांनीं शिक्षणाचें कार्य चोख बजाविलें हें मात्र खरें. लोकांना खरें शिक्षण देण्यासाठीं महत्वानें ज्ञान ज्यांच्यापाशीं कांहींच नसतें अशा लोकांनीं कित्येकवेळां एकेका शब्दावर तीन तीन ग्रंथ भरतील एवढें प्रवचन केलें आहे. हा शब्द प्रथम कोणीं उपयोगांत आणिला, आणि तो मनुष्य काय खात होता आणि तो किती झोंप घेत होता असल्या प्रचंड महत्वाच्या विषयांची चर्चा त्यांत त्यांनीं केली आहे.

भगवान् रामकृष्ण एक गोष्ट सांगत असत. एकदां कांहीं गृहस्थ एका आंबराईत गेले; आणि तेथील झाडांचीं पानें आणि फांद्या मोजूं लागले. पानांचा रंग कसा आहे, आणि त्यांचा आकार कसा आहे, इत्यादि अनेक प्रकारच्या माहितीचें टांचण त्यांनीं तयार केलें. नंतर या साऱ्या बाबींबद्दल त्यांच्यांत मोठा कडाक्याचा वादविवाद सुरू झाला. ह्या वादविवादांत त्यांचें चित्त अगदीं रंगून गेलें. पण यांपैकीं एक गृहस्थ अधिक शहाणा होता. तो या मोजदादीच्या भानगडींत पडला नाहीं. त्याऐवजीं पिकलेलीं फळें तृप्त होईपर्यंत त्यानें खाऊन घेतलीं. हा गृहस्थ अधिक शहाणा नव्हे काय ? अशाच रीतीनें धर्मग्रंथांचें रहस्य तुह्मांस जाणावयाचें असेल, तर पानांच्या आणि खांद्यांच्या मोजदादीचें टिपण करण्याचें काम दुसऱ्या लोकांवर सोंपवून द्या. पानांची मोजदाद करणाऱ्या या महापंडितांत खरा शास्त्रज्ञ तुह्मांस कधींही सांपडावयाचा नाहीं. धर्म हा मानवी जीविताचा उच्च हेतु आहे. धार्मिक जीवन ही मनुष्याची अत्युच्च दशा आहे. ती साध्य करण्या-

करितां पानें मोजण्याची आपणांस यत्किंचितही जरूर नाहीं.असला रिकाम-टेकडा उद्योग आपण कधींही करूं नका. तुह्मांस खरोखर भक्त व्हावयाचें असेल तर भगवान् कृष्णाचा जन्म मथुरेंत झाला, कीं व्रजांत झाला हें जाणण्याची तुह्मांस जरुरी नाहीं. त्याचा उद्योग काय होता किंवा भगवद्गीता त्यानें कोणत्या तारखेस सांगितली, हें तुह्मांस न समजलें तरी चालेल. पण गीतेंत कर्तव्य आणि भक्ति यांचें जें सुंदर विवेचन केलें आहे त्या विवेचनाला आपली वर्तणूक साजेशी कधीं होईल असा निदिध्यास लागणें हें मात्र अवश्य आहे. गीतेचें कर्तृत्व कोणाकडे होतें इत्यादि गोष्टींची चर्चा ही विद्वान् लोकांकरितां शिल्लक राहूंद्या. तेंच जाणण्याची ज्याअर्थीं त्यांची इच्छा आहे, त्याअर्थीं ती तृप्त होऊं द्या. त्यांच्या विद्वत्ताप्रचुर प्रवचनाच्या शेवटीं 'शांतिः शांतिः' एवढें ह्मणून आंबे खाण्याचें काम आपण करूं या.

गुरूची वर्तणूक अगदीं निष्कलंक असणें अवश्य आहे. गुरूची दानत आणि त्याची वैयक्तिक वागणूक यांजकडे लक्ष्य न देतां तो जें काय सांगेल त्याचाच सारासार विचार करून त्याचें गृहण आपण करावें असें ह्मणणारे अनेक लोक आढळून येतात. पण असें करणें युक्त नाहीं. आधिभौतिक शास्त्रांसंबंधीं अशा प्रकारचें तत्त्व कदाचित् लागू करतां येईल. रसायनशास्त्र अथवा गतिशास्त्र अथवा तसल्याच प्रकारचें दुसरें एखादें शास्त्र यांचा अभ्यास मला कर्तव्य असतां माझ्या गुरूच्या दानतीबद्दल चौकशी करण्याचें मला कारण नाहीं. कारण, या शास्त्रांच्या अभ्यासासंबंधीं त्या विषयांत गुरूची बौद्धिक पारंगतता असली ह्मणजे मला पुरे; पण आध्यात्मिक शास्त्रासंबंधीं हें तत्त्व लागू करतां यावयाचें नाहीं; कारण अशुद्ध जीवात्म्याला परमात्मप्रकाशाची जाणीव असणें शक्य नाहीं. असल्या प्रकारचा मनुष्य ब्रह्मज्ञान देण्यास कसा उपयोगी पडणार? ब्रह्मज्ञान स्वतः प्राप्त करून घेण्यास अथवा त्याचें दान इतरांस करण्यास आत्मशुद्धि प्रथम पाहिजे. अंतःकरणाचें पावित्र्य असल्यावांचून या गोष्टी सिद्ध करणें शक्य नाहीं. जीवात्मा पवित्र झाल्यावांचून परमात्मप्रकाशाचा एक किरणही त्याजवर पडत नाहीं. याकरितां गुरु होऊं पाहाणाराची दानत चोख आहे कीं नाहीं हें आपण प्रथम पाहिलें पाहिजे. तो काय सांगतो याचा विचार नंतर केल्यास चालेल. कारण, त्याच्या शब्दाला जें कांहीं महत्व असावयाचें तें त्याच्या चरित्रक्रमा-

पासून प्राप्त व्हावयाचें असतें. त्याचें चारित्र्य शुद्ध असेल, तरच तो खरा प्रकाशवाहक होऊं शकेल. ज्याच्या ठिकाणीं हा प्रकाश मुळांतच नसेल, तो दुसऱ्याला काय देणार ? विहिरींतच पाणी नसल्यास तें पोहऱ्यांत कोठून येणार ? परमात्मप्रकाशाचे किरण ज्याच्या चित्तांत भरून राहिले असतील तोच आपल्या शिष्याला त्यांचें दान करूं शकेल. गुरु होणें ह्मणजे शिष्याच्या बुद्धीला चालन मिळणें एवढ्यानेंच त्याचा सारा कार्यभाग संपत नाहीं. स्वतःपाशीं असलेली अधिक महत्वाची वस्तु जो शिष्याला देईल, तोच खरा गुरु होय. जी वस्तु सत्य आहे, आणि जिचें महत्व शिष्याच्या चित्तास तावडतोब पटतें, अशी वस्तु गुरूनें त्याला दिली पाहिजे. यावरून शुद्ध चारित्र्याची गुरुपणाला किती आवश्यकता आहे, हें तुमच्या लक्ष्यांत येईल.

त्यानंतर गुरूच्या हेतुकडेही लक्ष्य पुरविणें अवश्य आहे. शिष्याला ज्ञानदान करण्यांत पैसा, कीर्ति अथवा दुसरा कोणताही स्वार्थमूलक हेतु गुरूच्या मनांत असतां उपयोगी नाहीं. त्याचा हा उद्योग केवळ प्रेमप्रेरित असला पाहिजे. मनुष्यजातीचें कल्याण व्हावें, इतकाच त्याच्या शिक्षणाचा हेतु असला पाहिजे. एका मनुष्यांतील चैतन्य दुसऱ्या मनुष्यांत प्रवेश करतें, तें फक्त प्रेमाच्या द्वारेंच करतें. एकट्या प्रेमाच्या मध्यस्थीवांचून चैतन्यवहनाचें हें कार्य दुसऱ्या कोणत्याही द्वारानें साध्य होत नाहीं. पैसा अथवा कीर्ति अशा प्रकारचा कोणताही स्वार्थमूलक हेतू गुरूच्या मनांत उद्भवला कीं चैतन्यवाहक मध्यस्थाचा तावडतोब नाश होतो. ईश्वर केवळ प्रेमरूप आहे आणि हें त्याचें स्वरूप ज्यानें ओळखलें आहे, तोच ईश्वरविषयक ज्ञान मनुष्यास देऊं शकेल, आणि तोच मनुष्याला ईश्वरासारखा पूज्य होईल.

या साऱ्या अटी ज्या गुरूच्या ठिकाणीं तुह्मांस पूर्णत्वानें आढळून येतील त्याजपासून तुह्मांला यत्किंचितही भय नाहीं; पण यांपैकीं कांहीं गुणांचा अभाव जेथें असेल, तेथून धर्मशिक्षण घेणें भयावह आहे; कारण, जो आपला चांगुलपणा तुह्मांस देऊं शकत नाहीं तो स्वतःच्या दुष्टपणाची प्रेरणा मात्र तुमच्या अंतःकरणांत करील असा संभव आहे. याकरितां अशा प्रकारच्या भयप्रद स्थानापासून दूर राहणें हेंच इष्ट आहे. **'श्रोत्रियोऽवृजिनोऽ-**

**कामहतो यो ब्रह्मवित्तमः ।** । जो वेदज्ञ असेल, जो निष्पाप असेल आणि ज्याच्या मनांत कामेच्छा नसेल, तो ब्रह्मज्ञ होऊं शकेल.

या सर्व विवेचनावरून, सर्वत्रांकडून आणि सर्व ठिकाणीं आपणास धर्म-ज्ञानाची प्राप्ति करून घेणें शक्य नाहीं, हें तुमच्या लक्ष्यांत आलेंच असेल. ' दगडापासूनही ज्ञान मिळतें, वाहाणारे ओढे हे ग्रंथरूप आहेत आणि सर्वत्र चांगुलपणा भरला आहे ' इत्यादि वचनें केवळ ऐकावयास मात्र गोड आहेत. त्यांत कवित्व पुष्कळ आहे; आणि कवीच्या दृष्टीनें त्यांत सत्यही आहे. पण ज्याच्या ठिकाणीं सत्याचा यत्किंचितही उगम नसेल त्याला सत्यवस्तूचें ज्ञान कोणीही करूं शकणार नाहीं. दगडापासून आणि वाहात्या ओढ्यापासूनही ज्ञानप्राप्ति होते; पण ती कोणाला? ज्याचें चित्तकमल अगोदरच विकास पावलें असेल आणि ज्याच्या ठिकाणीं चैतन्य अगोदरच जागृत झालें असेल, त्याला. आपल्या मनोरूपी कमलाच्या विकसनाचें हें कार्य सच्छील आणि शहाण्या गुरूकडूनच होण्यासारखें आहे. अशा रीतीनें जें अंतःकरण विकास पावलें असेल, त्याला दगड, वाहाते ओढे, तारे, सूर्य, चंद्र अथवा पृथ्वीतील इतर कोणतीही वस्तु यांजपासून ज्ञानाची प्राप्ति होईल; पण जेथें असा विकास नसेल तेथें धोंडे ते धोंडेच आणि ओढे ते ओढेच. एखाद्या प्रचंड वस्तुभांडारांत जन्मांधाला नेऊन सोडलें तर त्याचा त्याला काय उपयोग होणार आहे ! प्रथम त्याची दृष्टि उघडली पाहिजे. ती उघडली गेल्यानंतर त्या भांडारांतील वस्तु आपलें हृद्गत त्याला सांगतील.

ब्रह्मजिज्ञासा ज्याच्या ठिकाणीं तीव्र झाली आहे, त्याचे डोळे उघडण्याचें कार्य गुरु करतो. गुरु-शिष्य संबंध हा पितापुत्रांच्या संबंधासारखा आहे. गुरूबद्दल आपल्या ठिकाणीं दृढविश्वास, लीनता आणि पूज्यभाव असल्या-शिवाय ब्रह्मज्ञानाची वाढ आपल्या ठिकाणीं होणें शक्य नाहीं. ज्या ठिकाणीं अशा प्रकारचे गुरु-शिष्य संबंध आढळून येतात त्याच ठिकाणीं मोठ्या दर्जाचे ब्रह्मवेत्ते आजपर्यंत निर्माण झाले आहेत, ही गोष्ट लक्ष्यांत ठेवण्या-सारखी आहे. ज्या देशांत गुरुशिष्यांत अशा प्रकारचा संबंध असण्याची आवश्यकता भासत नाहीं, त्याठिकाणीं ब्रह्मज्ञान देणारा गुरु ह्मणजे एक सामान्य वक्ता, असा प्रकार पाहण्यांत येतो. असा गुरु आपल्या भाष-णाच्या मोबदल्यांत मिळणाऱ्या पैशाकडे नजर लावून बसलेला असतो;

आणि त्यानें उच्चारलेल्या शब्दांनीं आपलें डोकें किती भरलें आहे, हें शिष्य पहात असतो. भाषणाच्या शेवटीं दोघेही परस्परांची ओळख नसल्यासारखे आपापल्या मार्गानें चालते होतात. अशा स्थितींत ब्रह्मज्ञानाची प्राप्ति भोपळ्याएवढी झाल्यास नवल नाहीं. चैतन्यग्राहक आणि चैतन्यप्रेरक या दोघांचाही जेथें अभाव तेथें चैतन्याची उत्पत्ति कोठून होणार ? अशा लोकांच्या ठिकाणीं धर्मज्ञान ह्मणजे पोटाच्या धंद्यासारखें होऊन बसतें. थोडेंसें द्रव्य खर्च केल्यावर पासरीभर ब्रह्मज्ञान मिळूं शकतें, असें शिष्यांनाही वाटूं लागतें. ब्रह्मज्ञानाची प्राप्ति इतकी सुलभपणें होऊं शकती, तर परमेश्वराजवळ याहून दुसरें कांहीं मागणें आह्मी मागितलें नसतें; पण ती प्राप्ति इतक्या सोप्या रीतीनें होऊं शकत नाहीं, हें मानवजातीचें मोठें दुर्दैव होय.

ज्ञानाची परिसीमा जें ब्रह्मज्ञान, तें विकत घेतां येत नाहीं किंवा तें ग्रंथांतूनही मिळवितां येत नाहीं. तुह्मीं जगाचा कोनाकोंपरा धुंडाळून पाहिला, तुह्मी हिमालय, आल्प्स आणि कॉकेशस् इत्यादि सारे पर्वत पालथे घातले, तुह्मी साऱ्या समुद्रांचे तळ शोधले आणि गोबीच्या महारण्यांत अथवा तिबेटांत सारा जन्म फिरत राहिलां तरी तुमच्या अंतःकरणाची तयारी होईपर्यंत आणि तुमचा गुरु तुह्मांस भेटेपर्यंत ब्रह्मज्ञानाची प्राप्ति तुह्मांला होणार नाहीं. ईश्वरानें नेमून दिलेला तुमचा गुरु तुह्मांस मिळाला आणि त्याची लहान मुलाप्रमाणें दृढविश्वासानें तुह्मी सेवा केली ह्मणजे तुमचें अंतःकरण उघडेल, आणि त्याच्या ठिकाणीं परमेश्वर अवतरला आहे, असें तुह्मांस आढळून येईल. अशा प्रकारच्या प्रेमानें आणि पूज्यबुद्धीनें प्रेरित होऊन जे कोणी सत्य शोधावयास निघतील त्यांना सत्य, सौंदर्य आणि चांगुलपणा यांचें उज्ज्वल भांडार परमेश्वर स्वहस्तें खुलें करील.

## प्रकरण ६ वें.

## अवतारी गुरु आणि अवतार.

ज्या ठिकाणीं परमेश्वराच्या नामाचा उच्चार होतो तें ठिकाण पवित्र होय. " **मद्भक्ता यत्र गायंते तत्र तिष्ठामि नारद** " असें भगवान् सांगतात. मग

परमेश्वराचें नांव सदोदित ज्याच्या मुखांत आहे, तो मनुष्य किती पवित्र ह्मणावा ? आणि ज्याअर्थीं अशा मनुष्याकडून आपणास ब्रह्मज्ञानाची प्राप्ति होणार त्याअर्थीं त्याच्या सन्निध जातांना केवढा पूज्यभाव आपल्या चित्तांत असला पाहिजे ? ब्रह्मज्ञान सांगणारे खरे सद्गुरू या जगांत खरोखर फारच थोडे असतात; पण त्यांचा अगदींच अभाव या जगांतून कधींही होत नाहीं. हे संत ह्मणजे मानवी वृक्षाचे मोहोर होत. ते अहेतुक दयासिंधु असतात. जीवमात्रावर जें प्रेम ते करतात, त्यांत त्यांचा स्वतःचा कोणताही हेतु नसतो. " **आचार्यं माम् विजानीहि** " गुरु आणि मी एकच आहें, असें जाण, असें भगवान् श्रीकृष्णांनीं सांगितलें आहे. ज्या क्षणीं गुरु जगांतून नष्ट होतील त्याच क्षणीं या जगाला भयंकर नरकाचें स्वरूप प्राप्त होईल; आणि त्या क्षणींच जग विनाशाच्या मार्गाला लागेल.

सामान्य दर्ज्याच्या गुरूहून अधिक उच्च दर्जाचे असे गुरु कधींकधीं या जगांत निर्माण होतात. हे प्रत्यक्ष ईश्वराचे अवतारच असतात. केवळ स्पर्शमात्रेंकरून ते दुसऱ्यास ब्रह्मज्ञानी करूं शकतात. फार काय, पण स्पर्शावांचूनही नुसत्या इच्छेनेंच ते ब्रह्मज्ञान देऊं शकतात. अत्यंत क्षुद्र आणि अत्यंत पापी अशीं मनुष्येंसुद्धां केवळ त्यांच्या इच्छेनें एका क्षणांत पवित्र बनतात. हे अवतारी गुरु ह्मणजे सर्व गुरूंचे गुरु होत. प्रत्यक्ष परमेश्वरच या मानवीरूपानें अवतरतो. परमेश्वराच्या रूपाचें आकलन आपणास त्यांच्याशिवाय करतां यावयाचें नाहीं. अशा अवतारी पुरुषांचें पूजन आपण न करावें तर आपण पूजन तरी कशाचें करावें? अशांचें पूजन करणें हें खरोखर आपलें कर्तव्यच होय. जगांत पूजनीय ह्मणून कांहीं असेल, तर हे महापुरुषच होत.

मनुष्यरूपानें अवतरलेल्या या स्वरूपावांचून परमेश्वराचें दुसऱ्या कोणत्याही प्रकारचें स्वरूप मानवी बुद्धीस आकलन करतां यावयाचें नाहीं. हें स्वरूप सोडून दुसरें कोणतेंही स्वरूप आपण आपल्या बुद्धीनें निर्माण करूं लागलों, तर तें त्याचें अत्यंत विकृत रूप मात्र निर्माण केलें असें होईल. आणि हें विकृत स्वरूप हेंच परमेश्वराचें खरें रूप आहे, असें ह्मणणें ह्मणजे परमेश्वराला उणेपणा आणणें मात्र होय. कोणी एकानें एका मूर्खाला शिवाची मूर्ति घडविण्यास सांगितलें. त्या कामावर तो मूर्ख मनुष्य कित्येक दिवस अविश्रांत खटपट करीत होता. आणि अखेरीस त्यानें एक माकडाची

मूर्ति घडवून आणिली. अशाच रीतीनें शुद्ध पूर्ण रूपाची प्रतिमा आपण आपल्या चित्तांत भरविण्याचा यत्न केला, तर या यत्नांत आपली पूर्ण फजिती मात्र खास होईल; कारण जोंपर्यंत आपण स्वतः मनुष्य आहोंत तोंपर्यंत मानवीरूपाहून अधिक उच्च प्रतीची कल्पना आपल्या चित्तांत येणें शक्य नाहीं. परमेश्वरासंबंधीं मोठ्या बुद्धिवादानें भरलेलीं अशीं कितीही व्याख्यानें तुह्मी दिलीं आणि त्यांत विश्वांतील अखिल वस्तुजाताचा संग्रह केला अथवा हे परमेश्वराचे अवतार ह्मणजे केवळ मूर्खपणा आहे, असें स्वतःच्या बुद्धीचें तुह्मी कितीही समाधान केलें, तरी अंतीं ही सारी बडबड फोल ठरेल. आपण क्षणमात्र प्रत्यक्ष व्यावहारिक दृष्टीनें याचा विचार करूं. हे महान् बुद्धिवादी आपल्या व्याख्यानांत ज्या बुद्धीचें एवढें विस्तृत प्रदर्शन करतात, तिच्या मुळाशीं वस्तुस्थिति काय असते? त्या बुद्धीच्या पलीकडे सत्यांश किती असतो? 'शून्य, महाशून्य,' हेंच उत्तर या प्रश्नास द्यावें लागेल. यांच्या लंब्या चौड्या भाषणांस नुसत्या बुडबुड्यांहून अधिक किंमत नाहीं. या ईश्वराच्या अवतारांचें पूजन करूं नये असें ह्मणणाऱ्या या बुद्धिवादी पंडितास आह्मी इतकें विचारतों कीं, परमेश्वरस्वरूपाची तुमची स्वतःची कल्पना तरी काय आहे? ' सर्वव्यापि, सर्वांतरात्मा, सर्वशक्तिमान्' इत्यादि ज्या अनेक विशेषणांचा उच्चार तुह्मी करतां त्या शब्दांतील अक्षरांपलीकडे तुमचें स्वतःचें ज्ञान पोंचलें आहे काय? वास्तविक पाहतां त्यांचें ज्ञान शब्दोच्चारापलीकडे गेलेलें नसतें. त्यांचा जो कांहीं स्वतःचा उपजत स्वभाव असेल त्या स्वभावाला अनुसरूनच या शब्दाचे अर्थ त्यांच्या चित्तांत उत्पन्न होत असतात. या दृष्टीनें रस्त्यांतून हिंडणाऱ्या कोणत्याही सामान्य मनुष्याहून या पंडितांची योग्यता अधिक नसते. ज्यानें एकही पुस्तक साऱ्या जन्मांत कधीं उघडलें नाहीं अशा अक्षरशत्रू मनुष्याहून या बाबतींत यांची योग्यता यत्किंचितही अधिक नसते. तथापि या दोघांत एक फरक मात्र लक्ष्यांत ठेवण्यासारखा आहे. अक्षरशत्रू मनुष्य आपल्या वटवटीनें जगाच्या शांतीचा बिघाड करीत नाहीं. पण हे शब्दवादी बडे आचार्य जगाच्या शांतीचा भंग करून मनुष्यजातीस अधिक दुःखांत लोटण्यास मात्र कारणीभूत होतात. धर्म हा वस्तुतः स्वानुभवाचा प्रश्न आहे. याकरितां पोकळ बडबड आणि स्वानुभव यांत जें आकाश-

पाताळाइतकें अंतर आहे, तें आपण नित्य लक्ष्यांत ठेविलें पाहिजे. आपल्या अंतरंगाच्या अत्यंत गूढ भागांत जो कांहीं अनुभव आपणांस येतो, तेवढाच स्वानुभवाचा ह्मणजे प्रत्यक्ष धर्मांचा भाग असतो. या बाबतींत जी कांहीं उणीव आहे, ती इतकीच कीं, आपल्या तारतम्यबुद्धीचा उपयोग करणारे लोक फार कमी आढळून येतात. यामुळें स्वानुभवी आणि शब्दवादी यांच्यांतील जमीन-अस्मानाचें अंतर सामान्य मनुष्याच्या लक्ष्यांत येत नाहीं. मानवी मनोभूमिकेची रचनाच अशी आहे कीं, तिच्या विस्ताराला कांहीं निश्चित मर्यादा आहे. या मर्यादेपलीकडे मनुष्याचें मन जाऊं शकत नाहीं. यामुळें त्याची ईश्वरविषयक कल्पनाही त्या मर्यादेंतच वावरली पाहिजे, हें उघड आहे. या साऱ्या गोष्टी निसर्गानें आंखून दिलेल्या मर्यादेप्रमाणेंच चालावयाच्या असतात. उदाहरणार्थ, एखाद्या रेड्याला परमेश्वरपूजनाची इच्छा झाली आहे अशी कल्पना केली, तर स्वतःच्या मर्यादित कल्पनेला अनुरूप अशा प्रकारची ईश्वराची प्रतिमा तो आपल्या चित्तांत निर्माण करील. परमेश्वर ह्मणजे एक अत्यंत मोठा रेडा अशीच त्याची कल्पना झाल्यास नवल नाहीं. तसेंच ईश्वरविषयक कल्पना एखाद्या माशाच्या मनांत उद्भवली, तर एखादा देवमाशाची योजना तो देवाच्या जागीं करील हें उघड आहे. अशाच रीतीनें मनुष्याची ईश्वरविषयक कल्पना मानवी स्वरूपापलीकडे जाऊं शकत नाहीं, यांत नवल वाटण्यासारखें कांहीं नाहीं. ज्या परमेश्वरविषयक कल्पनांचा आतां उल्लेख केला, त्या विकृत मनापासून उद्भवल्या आहेत असें समजण्याचें कारण नाहीं. मनुष्य, रेडा आणि मासा हीं जणूंकाय तीन निरनिराळीं भांडीं आहेत आणि तीं सागररूप परमेश्वराकडे स्वतःस भरून घेण्याकरितां गेलीं आहेत असें समजा. अशा स्थितींत त्यांचा स्वतःचा जो कांहीं आकार आणि त्यांची स्वतःची जितकें पाणी सांठविण्याची शक्ति असेल, त्याच आकाराचें आणि तितकेंच पाणी तीं भरून घेतील हें उघड आहे. मनुष्यभांड्यांतील पाणी मनुष्याच्या आकाराचें, रेड्यांतील पाणी रेड्याच्या आकाराचें आणि माशांतील पाणी माशाच्या आकाराचें होईल हें उघड नाहीं काय? अशारीतीनें निरनिराळ्या परिस्थित्यनुरूप पाण्याच्या आकारांत भेद झाला, तरी त्यामुळें पाण्याच्या मूलरूपांत कांहीं भेद उत्पन्न होतो काय? अशाच रीतीनें परमेश्वरविषयक

विचार मनुष्याच्या मनांत येतात तेव्हां परमेश्वर मानवी रूप धारण करतो आणि निर्बुद्ध प्राण्याच्या मनांत ईश्वरविषयक विचार येत असलेच तर तेथें त्या परमेश्वराला त्या प्राण्याचें रूप प्राप्त होईल हें उघड आहे. याकरितां परमेश्वराची उपासना आपणांस करावयाची असेल, तर ती त्याच्या मानवी रूपांतच करणें आपणांस भाग आहे. यावांचून अन्य कोणताही मार्ग आपणास उपलब्ध नाहीं.

सावयव परमेश्वराची पूजा दोन प्रकारचीं माणसें करीत नाहींत. ज्यांना धर्माची चाड नाहीं असे मानवरूप पशु आणि दुसरे परमहंस. मानवी मनाची निसर्गसिद्ध हद्द ओलांडून परतीराला पावलेले जे परमहंस, त्यांना सावयव रूपाची गरज उरलेली नसते. '**हें विश्वचि माझें घर । ऐशी मति जयाची स्थिर ॥ किंबहुना चराचर । आपणचि जो ॥** ' या स्थितीला ते पोंचलेले असतात. परमेश्वराचें जें कांहीं खरें स्वरूप आहे, त्यांत स्वतः निमग्न होऊन ते त्याचें पूजन करीत असतात. या ठिकाणीं परस्पर अत्यंत विरुद्ध अशा दोन टोंकांचा संयोग झाल्याचें आपणास आढळून येतें. एका बाजूला अज्ञानाचें टोंक आणि दुसऱ्या बाजूला ज्ञानाचें टोंक हीं बाह्यतः सारख्याच स्थितींत असल्याचें आढळून येतें. या दोन्ही टोंकांना परमेश्वराच्या पूजेअर्चेच्या बाह्य साधनांची गरज लागत नाहीं. मानवी पशूला या साधनांची गरज नाहीं, याचें कारण, त्याचें स्वतःचें पूर्ण अज्ञान हेंच होय; आणि जीवन्मुक्ताला गरज नसण्याचें कारण हेंच कीं, परमेश्वराचा वास आपल्या स्वतःच्याच ठिकाणीं आहे, असा अनुभव त्यास आलेला असतो. या दोन्ही अवस्थांच्या मध्यभागीं असणारा असा एखादा मनुष्य आपण सावयव परमेश्वराची पूजा करीत नाहीं असें ह्मणत असेल, तर अशा मनुष्याशीं फार संभाळून वागा. आपण काय बोलतों हें न समजण्याच्या स्थितींत तो आहे हें पक्कें ओळखून ठेवा. अशा मनुष्यानें सांगितलेला धर्म कच्च्या आणि पोकळ डोक्यांच्या मात्र उपयोगी आहे.

मनुष्यस्वभावांत जी उणीव आहे, ती परमेश्वरास समजते; आणि मनुष्यजातीचें हित करावें याकरितां मनुष्यरूपानें तो अवतार घेतो. '**यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत । अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ॥ परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृतां । धर्म संस्थापनार्थाय**

**संभवामि युगे युगे** ॥ "ज्या वेळीं धर्महानि होऊन जगांत अधर्म माजतो, त्यावेळीं मी अवतार घेतों. साधूंच्या संरक्षणासाठीं, दुर्जनांच्या हननासाठीं आणि धर्माच्या स्थापनेसाठीं मी प्रत्येक युगीं अवतार घेतों." "**अवजानंति माम् मूढा मानुषीं तनुमाश्रितं । परं भावमजानन्तो मम भूतमहेश्वरम्** " ॥ मानवी देहाचा आश्रय केलेला जो मी त्या माझें महेश्वरी रूप न जाणतां मूढ लोक माझी अवज्ञा करतात. अवतारांसंबंधीं भगवान् श्रीकृष्णांनीं गीतेंत याप्रमाणें सांगितलें आहे. भगवान् श्रीरामकृष्ण ह्मणतात, 'ज्यावेळीं प्रचंड लाट उद्भवते त्यावेळीं सर्व लहान ओढे आणि खांचखळगे कोणत्याही प्रकारच्या स्व-प्रयत्नावांचून कांठोकांठ भरून जातात; त्याचप्रमाणें जेव्हां परमेश्वर अवतार धारण करतो, तेव्हां ब्रह्मज्ञानाची प्रचंड लाट साऱ्या जगभर उसळते, आणि सर्व वातावरण सत्यप्रकाशानें भरून गेलें आहे, असा अनुभव लोकांस येतो.

## प्रकरण ७ वें.

## मंत्र, ॐशब्द आणि ज्ञान.

अवतारी महापुरुषांसंबंधीं आपणास सध्या अधिक विचार कर्तव्य नसल्यामुळें दुसऱ्या प्रकारच्या गुरूंविषयींचा विचार पुढें चालू करूं. सिद्ध गुरु हे या दुसऱ्या प्रकारचे गुरु होत. जे स्वतःच्या साध्यास पोंचले आहेत, त्यांना सिद्ध असें ह्मणतात. मंत्रद्वारा ब्रह्मज्ञानाचा उपदेश शिष्याच्या चित्ताला करून तेथें त्याचें बीजारोपण करणें हें या गुरूंचें काम आहे. आतां मंत्र ह्मणजे काय, याचा विचार करूं. हें विश्व दृश्यत्वास येण्यास नाम आणि रूप हीं कारणीभूत आहेत, असा आमच्या तत्त्वज्ञानाचा सिद्धांत आहे. जिला नाम आणि रूप हीं नाहींत अशी एकही वृत्ति मानवी चित्तांत जन्म पावत नाहीं. पिंड आणि ब्रह्मांड यांची रचना एकाच तत्त्वावर झाली आहे; हा सिद्धांत खरा आहे, तर चित्तवृत्तीला जी गोष्ट लागू आहे, तीच साऱ्या विश्वरचनेलाही लागू असली पाहिजे. '**यथा एकेन मृत्पिंडेन विज्ञातेन सर्वं विज्ञातं भवति** ।' ज्याप्रमाणें मातीच्या

एका ढेंकळाचें ज्ञान झालें ह्मणजे सर्व ढिगाचें ज्ञान होतें, त्याचप्रमाणें एका पिंडाचें ज्ञान झालें ह्मणजे सर्व ब्रह्मांडाचें ज्ञान होतें. रूप हा बाह्य देखावा असून त्याचे आंतील जें तत्त्व किंवा मुख्य भाग तें नाम होय. देह हें रूप असून अंतःकरण हें नाम आहे. सर्व ध्वनिचिन्हांचा उपयोग नामांशीं जोडून केलेला असतो. एका पिंडांतील चित्तांत जे विचार उद्भवतात ते प्रथम शब्दरूपानें उद्भवतात आणि ते व्यक्त झाले ह्मणजे त्यांना प्रत्यक्ष रूप प्राप्त होतें.

ब्रह्मांडरचनेंतही हाच प्रकार आढळून येतो. प्रथम ब्रह्मा किंवा हिरण्यगर्भ किंवा महत् नामरूपांनीं प्रगट होतो आणि नंतर विरू या रूपानें प्रत्यक्ष आकारास येतो. जें आज आपल्या इंद्रियांस प्रत्यक्ष भासत आहे तें त्याचें रूप असून त्याच्या पूर्वीं स्फोट किंवा शब्द अव्यक्त रूपानें असतो. सर्व कल्पना आणि सर्व नामें हीं व्यक्त होण्याच्यापूर्वीं स्फोटरूपांतच असतात. या स्फोटशक्तीचें सहाय्य घेऊनच परमेश्वर विश्व उत्पन्न करितो. किंबहुना परमेश्वर स्वतः स्फोटरूप होतो आणि नंतर प्रत्यक्ष विश्व या रूपानें आकारास येतो. या स्फोटरूपाला कांहीं ध्वनिचिन्ह देणें शक्य असेल तर तें चिन्ह ॐ हेंच होऊं शकेल. शब्द आणि कल्पना हीं अभेद्य आहेत; तीं कोणत्याही तऱ्हेच्या पृथक्करणानें विभागलीं जाऊं शकत नाहींत. कोणतीही कल्पना शब्दावांचून व्यक्त होऊं शकतच नाहीं. अशा रीतीनें कल्पना आणि शब्द यांचा अविभाज्य संबंध असल्यामुळें ॐ आणि स्फोट हीं सुद्धां अविभाज्यच असलीं पाहिजेत. यामुळें सर्व शब्दांत ॐ हा शब्द अत्यंत पवित्र आहे. सर्व शब्द या अनंत ॐमधूनच निघाले आहेत. फार काय, पण सर्व विश्वही या ॐ मधूनच निघालें आहे, असें ह्मणावयास हरकत नाहीं. आतां येथें अशी एक शंका उत्पन्न होईल कीं, शब्द आणि विचार हीं अभेद्य असलीं तरी एकच विचार अनेक ध्वनिचिन्हांनीं स्पष्ट करणें शक्य आहे. याकरितां ज्या स्फोट रूपांतून हें विश्व व्यक्त झालें आहे त्याचें व्यक्त चिन्ह ॐ यावांचून दुसरेंही असूं शकेल. केवळ ॐ या एकाच चिन्हाचा उपयोग करण्याची आवश्यकता काय आहे? यावर आमचें उत्तर असें आहे कीं, याच एका चिन्हानें अथपासून इतीपर्यंत सर्व स्वरूपाचा स्पष्ट बोध होतो; आणि असा स्पष्ट बोध करून

देण्यास दुसऱ्या कोणत्याही चिन्हांचा उपयोग करून देणें शक्य नाहीं. सर्व शब्द जरी स्फोटरूपांतून निघाले आहेत तरी हें रूप स्वतः कोणताही प्रत्यक्ष शब्द नाहीं, केवळ स्फोटरूपाला प्रत्यक्ष आकार नाहीं. हें अधिक स्पष्ट भाषेनें सांगावयाचें ह्मटलें कीं आपल्या उच्चारांत येणाऱ्या साऱ्या शब्दांचीं स्वरूपें एकमेकांपासून ज्या विशिष्ट गोष्टीनें निराळीं केलीं जातात त्या गोष्टी वजा करून शब्दांचें हें विशिष्टत्व काढून टाकिलें तर जें कांहीं उरेल तें स्फोटरूप होय. याकरितां या स्फोटरूपाला नादब्रह्म असें नांव दिलें आहे. स्फोटाचें अव्यक्त रूप व्यक्त करण्यासाठींच ज्याअर्थीं ध्वनिचिन्हांचा उपयोग करावयाचा असतो त्याअर्थीं तें चिन्ह असें असलें पाहिजे कीं, एक तर त्यानें स्फोटरूपाला जितकें कमी विशिष्ट स्वरूप देतां येईल, तितकें त्यानें द्यावें; आणि त्याच वेळीं स्फोटाचें निसर्गसिद्ध रूपही स्पष्टपणें आपल्या मनांत ठसेल असें करावें. स्फोटरूप व्यक्त करण्यासाठीं ज्या ध्वनिचिन्हांचा उपयोग करावयाचा त्याच्या आंगीं हे दोन गुण असले पाहिजेत. हे दोन गुण फक्त ॐ या चिन्हापाशींच आहेत. त्यावांचून दुसऱ्या कोणत्याही चिन्हांत हे गुण आढळून येणें अशक्य आहे. ॐ या ध्वनिचिन्हांत अ, उ आणि म या तीन ध्वनींचा अंतर्भाव आहे. या तीन वर्णांच्या उच्चारांत बाकीच्या सगळ्या शब्दसृष्टीचें मूलरूप सामावून राहिलें आहे. यांत पहिलें अ हें अक्षर आहे. अ हा ध्वनि निसर्गाच्या अत्यंत सन्निध आहे. याकरितां '**अक्षराणाम् अकारोस्मि**' असें भगवान् श्रीकृष्णांनीं गीतेंत ह्मटलें आहे. जितके ध्वनि आपण निर्माण करूं शकतों ते सारे जिव्हेचें मूळ आणि ओंठ या जागेंतूनच निर्माण होतात. जिव्हेच्या मुळांतून ते निर्माण होऊन ओंठांत त्यांचें पर्यवसान होतें. ॐ या ध्वनीचा योग्य रीतीनें उच्चार केला असतां साऱ्या शब्दसृष्टीचा आदिअंत स्पष्ट लक्ष्यांत येतो. हें सामर्थ्य दुसऱ्या कोणत्याही ध्वनींत नाहीं आणि याकरितांच स्फोटरूप व्यक्त करावयास हेंच एक चिन्ह अत्यंत युक्त आहे. आणि ज्या अर्थीं ध्वनि आणि कल्पना हीं अविभाज्य आहेत त्याअर्थीं ॐ आणि स्फोटरूप हींसुद्धां अविभाज्यच आहेत. आतां स्फोटरूप हें ज्याअर्थीं व्यक्त विश्वाचें आदिरूप आहे त्याअर्थीं तें परमेश्वराच्या अत्यंत सन्निध असलें पाहिजे. किंबहुना प्रत्यक्ष परमेश्वराचें पहिलें व्यक्तरूप ह्मणजे स्फोटरूपच

होय. आणि ज्याअर्थी ॐ आणि स्फोटरूप हीं अविभाज्य आहेत, त्याअर्थी ॐ हें परमेश्वराचेंच व्यक्त चिन्ह आहे असें ह्मणावयास काय हरकत आहे ?

तसेंच एकमेवाद्वितीय, अखंड, सच्चिदानंद, ब्रह्मस्वरूप, अपूर्ण अशा जीवात्म्यानें जाणावयाचें आणि ज्याअर्थी जीवात्म्याचें स्वरूप गुणविशिष्ट आहे त्याअर्थी ब्रह्मस्वरूप जाणण्याची दिशाही गुणविशिष्ट असलीच पाहिजे. हें जसें ब्रह्मरूपासंबंधानें खरें आहे तसेंच तें विश्वरूपासंबंधींही आहे. विश्वरूपाचें दर्शनही अपूर्ण आणि गुणविशिष्ट अशा जीवात्म्याला अपूर्ण आणि गुणविशिष्ट अशा मार्गानेंच घ्यावयास पाहिजे हें उघड आहे.

पूजकाचें मन उपासनेकडे वळलें ह्मणजे ज्या विशिष्ट तत्त्वांच्या आधारावर त्याची उभारणी झालेली असते त्याच तत्त्वांच्या अनुसंधानानें तें उपासनेकडे वळतें. याचा परिणाम असा होतो कीं, एकच परमात्मरूप अनेक प्रकारांनीं दिसूं लागतो. ज्या तत्त्वांच्या अनुरोधानें त्याचें चिंतन करावें त्या तत्त्वांस अनुरूप अशा व्यक्त रूपानें तो दिसूं लागतो. अशाच रीतीनें एकच विश्व अनेक आकारांनीं भरून गेलें आहे असें भासूं लागतें. अशाच रीतीनें निसर्गाच्या अत्यंत सन्निध असलेलें जें ध्वनिचिन्ह ॐ तेंही उपासकाच्या निरनिराळ्या परिस्थितीनें अनेक रूपांत विभागलें जातें. स्वतःच्या परिस्थित्यनुरूप ईश्वर आणि विश्व यांस व्यक्त करणारें चिन्ह प्रत्येकाचें वेगळें होऊं शकतें. स्वानुभवी ऋषींनीं परमेश्वर आणि विश्व यांसंबंधीं जे जे अनुभव घेतले ते त्यांनीं निरनिराळ्या ध्वनिचिन्हांनीं व्यक्त केले असून त्यांच्या दृष्टीप्रमाणें जसें स्वरूप त्यांस व्यक्त झालें तसें त्यांनीं या ध्वनिचिन्हांच्या रूपानें तें नोंदून ठेविलें आहे. अखंड सच्चिदानंदरूप जसें ॐ या चिन्हानें व्यक्त होतें तसेंच दुसऱ्या चिन्हांनीं तेंच रूप खंडरूपानें व्यक्त होतें. हीं सर्व ध्वनिचिन्हें सत्यज्ञानाच्या आणि ध्यानमार्गाच्या प्राप्तीला मदत करणारीं आहेत.

---

## प्रकरण ८ वें.

## प्रतीकपूजन आणि प्रतिमापूजन.

परमेश्वराचें प्रतिनिधित्व प्रतीकांच्या अथवा प्रतिमांच्या ठिकाणीं स्थापून त्यांचें पूजन करावयाचें असा जो रूढ मार्ग आहे त्यासंबंधीं आतां विचार करावयाचा आहे.

प्रतीकद्वारें परमेशपूजन याचा अर्थ तरी काय? भगवान् रामानुज ह्मणतात, "**अब्रह्माणिब्रह्मदृष्ट्यानुऽसंधानम्**" "जें ब्रह्म नाहीं त्याच्या ठिकाणीं ब्रह्माचा आरोप करून त्याचें मनानें अनुसंधान करावयाचें"; "मनोरूपानें ब्रह्माचें ध्यान करावें हें अंतर्गत ध्यान आहे. तसेंच आकाश हें ब्रह्म आहे; हें इंद्रियगत आहे." मन हें अंतर्गत प्रतीक असून आकाश हें बाह्य प्रतीक आहे. या दोघांवरही ब्रह्मरूपाचा आरोप करून त्यांची उपासना करावयाची. तसेंच "सूर्य ब्रह्मरूप आहे." "जो नामरूपानें ब्रह्मोपासना करतो इत्यादि." आणि अशा प्रकारच्या वचनांनीं प्रतीकपूजन ह्मणजे काय याबद्दल प्रश्न उत्पन्न होतो. प्रतीक या शब्दाचा अर्थ 'कडे--जाणें' असा आहे. प्रतीकपूजन ह्मणजे जें स्वत: ब्रह्मरूप नाहीं, परंतु ज्यावर ब्रह्मरूपाचा आरोप केला गेला आहे तें. तसेंच जें ब्रह्मरूपाच्या अधिकाधिक जवळ असतें त्यालाही प्रतीक असें ह्मणतात. श्रुतींनी सांगितलेल्या प्रतीकांशिवाय पुराणांनीं आणि तंत्रांनीं इतर प्रतीकेंही सांगितलीं आहेत. पितृपूजा, देवपूजा इत्यादि अनेक प्रकारच्या उपासनामार्गांचा अंतर्भावही अशाप्रकारच्या प्रतीकपूजनांत करतां येईल.

ईश्वरावांचून अन्य कशाचीही उपासना न करणें याचें नांव भक्ति. देवसेवा, पितृसेवा अथवा इतर कशाचीही सेवा ही भक्ति नव्हे. अनेक प्रकारच्या देवांच्या उपासनेचा अंतर्भाव कर्ममार्गांतच केला पाहिजे. ज्या देवाची सेवा करावी त्या देवलोकाला जाऊन तेथील भोग भोगावे असा उपासकाचा आशय असतो. याकरितां देवपूजेला भक्तीचें स्वरूप येऊं शकत नाहीं किंवा ती मुक्तिमार्गही दाखवूं शकत नाहीं. याकरितां एक गोष्ट विशेषेंकरून नित्य ध्यानांत ठेविली पाहिजे, ती ही कीं, प्रतीकपूजन करतां करतां ज्या अत्युच्च ब्रह्मस्वरूपाचा आरोप त्या प्रतीकावर केलेला असतो तें ब्रह्मरूप उपासकाच्या दृष्टीनें पदच्युत होऊन प्रतीकस्वरूपाची बरोबरी पावण्याचें भय असतें. आणि ज्याअर्थी जीवात्मा प्रतीकाचें अनुसंधान करीत असतो त्याअर्थी तोही पदच्युत होत्साता प्रतीकाच्या ओळीला येऊन बसतो. ह्मणजे ब्रह्माकडे जाऊं पहाणारा जीवात्मा खालीं घसरून त्या प्रतीकाच्या पायरीला पोंचण्याचें भय असतें. पण ज्याठिकाणीं प्रतीक हें अनुसंधानासाठीं ब्रह्माचें केवळ प्रतिनिधि आहे अशी दृढभावना असते त्या ठिकाणीं प्रतीकपूजनाला

सर्वांतर्यामीं ब्रह्मपूजनाचें स्वरूप येतें. त्याठिकाणीं प्रतीकाची पायरी वाढत वाढत ब्रह्मस्वरूपापर्यंत पोंचते. अशाप्रकारें प्रतीकपूजन हें भक्तिमार्गाला पोषक आहे हें उघडच आहे; एवढेंच नव्हे तर सगळ्या मनुष्यजातीला अशाप्रकारचें प्रतीकपूजन अत्यंत आवश्यक आहे. उच्चस्थितीच्या भक्तिमार्गावर आरूढ होण्याइतकी पक्क दशा ज्या मनाला प्राप्त झालेली नसते, त्याला आगाऊ तयारीकरितां प्रतीकपूजनाची अत्यंत आवश्यकता असते. यासाठीं देवलोक अथवा पितृलोक यांच्या प्राप्तीसाठीं जेव्हां देवपूजा अथवा पितृपूजा केली जाते तेव्हां ती केवळ कर्मकांडांतील उपासना आहे असें समजावें. निरनिराळ्या विद्या, जसें आपणास आपापल्या स्वरूपाचें विशिष्ट फल देतात त्याचप्रमाणें अशाप्रकारची देवोपासना आपलें विशिष्ट फल मात्र देते. ती मोक्षदात्री होऊं शकत नाहीं; पण देवपूजा जेव्हां ब्रह्मस्वरूपाचें पूजन या अर्थानें केली जाते तेव्हां तिचें फल ईश्वरपूजनासारखेंच असतें. अशारीतीनें एकाच प्रतीकावर वेगवेगळे आरोप केले असतां वेगवेगळें फल प्राप्त होतें. श्रुति आणि स्मृतिग्रंथांत एखादा देव किंवा एखादा ऋषि यांची पायरी वाढवून व त्यांजवर ब्रह्मरूपाचा आरोप करून मग त्यांचें पूजन केलें जातें असें आढळून येतें. प्रत्येक वस्तूचें विशिष्टत्व तिच्या नामरूपांत मात्र असतें; पण हें नामरूप वजा केलें ह्मणजे तिचें मूळचें ब्रह्मरूप मात्र शिल्लक उरतें. याच अर्थानें **'सर्वं खल्विदं ब्रह्म'** असा सिद्धांत अद्वैतवाद्यांनीं स्थापित केला आहे. विशिष्टाद्वैतवाद्यांच्या मतेंही प्रत्येक जीवात्म्याच्या ठिकाणीं परमात्म्याचा वास असतो. " **फलमादित्याध्युपासनेषु ब्रह्मैव-दास्यति सर्वाध्यक्षत्वात्** " आदित्य किंवा दुसरीं प्रतीकें यांचें पूजन केलें असतां त्याचें जें फल प्राप्त होतें तें ब्रह्माकडूनच मिळतें. कारण, ब्रह्म हें सर्वांचें अध्यक्ष आहे. ब्रह्मसूत्रभाष्यांत श्रीशंकराचार्य ह्मणतात, **ईदृशं चात्र-ब्रह्मणः उपास्यत्वं यतः प्रतीकेषु । तद्दृष्ट्याध्यारोपणं प्रतिमादिषु इव विष्णवादीनाम्** " विष्णु इत्यादि प्रतीकांवर ब्रह्माचा आरोप करून त्यांचें पूजन केलें असतां ब्रह्मपूजनच केल्यासारखें होतें. सर्व प्रतीकांविषयींही असेंच समजावयाचें.

प्रतीकांबद्दल आतांपर्यंत जें विवेचन केलें तेंच प्रतिमापूजनासही लागू आहे. एखाद्या देवतेची अथवा संताची प्रतिमा केवळ त्याचेंच स्वरूप सम-

जून तिचें पूजन केलें असतां अशा पूजनाला भक्तीचें स्वरूप प्राप्त होत नाहीं; अथवा अशी उपासना मोक्षदात्रीही होऊं शकत नाहीं; पण याच प्रतिमेवर ब्रह्मत्त्वाचा आरोप केला असतां तिचें पूजन पूजकास भक्तिमार्गावर आरूढ करून मुक्तिही देतें. जगांत जे मुख्य मुख्य धर्म आहेत त्यांत वेदान्त, बौद्धधर्म आणि ख्रिस्ती धर्मांतील कांहीं पंथ प्रतिमांचा मनमुराद उपयोग करीत असतात. महंमदी धर्म आणि ख्रिस्ती धर्मांची प्रॉटेस्टंट शाखा यांजमध्यें मात्र प्रतिमापूजनास अवकाश ठेवलेला नाहीं. तथापि मुसलमानी धर्मांचे अनुयायी आपल्या संतमहंतांच्या थडग्यांचा उपयोग प्रतिमांसारखाच करितात. प्रॉटेस्टंटपंथानुयायी कोणत्याही प्रकारच्या प्रतिमांची मदत न घेण्याचा बाणा मिरवीत असतात; पण यामुळें खऱ्या धर्ममार्गांपासून वर्षांनुवर्ष ते एकसारखे अधिकाधिक दूर जात आहेत. आतां या पंथाची मजल निरीश्वरवाद्यांच्या पर्यंतही गेली आहे. ऑगस्ट काउंटीचे अनुयायी ज्याप्रमाणें फक्त नीतितत्त्वें अनुसरावीं असें ह्मणतात, त्याचप्रमाणें प्रॉटेस्टंट पंथाचे लोकही ईश्वराचा त्याग करून नुसत्या नीतितत्त्वांकडे वळूं लागले आहेत. येथें दुसरीही एक गोष्ट लक्ष्यांत ठेवण्यासारखी आहे; महंमदी लोक आणि ख्रिस्ती धर्मांतील जे पंथ प्रतिमांचें पूजन करतात ते ही गोष्ट केवळ दृष्टिसौकर्य ह्मणून करीत नाहींत. ब्रह्मस्वरूपाचें आकलन करण्यासाठींच या प्रतिमांचा उपयोग करावयाचा आहे ही गोष्ट त्यांच्या लक्ष्यांत आलेली नाहीं. यामुळें त्यांचें प्रतिमापूजन भक्तीच्या अथवा मुक्तीच्या मार्गास जाऊं शकत नाहीं. त्यांच्या पूजनाला कर्मकांडांतील विधींचें स्वरूप मात्र आहे. अशाप्रकारच्या प्रतिमापूजनांत पूजकाचें लक्ष्य ईश्वराकडे न लागतां तें दुसऱ्या वस्तूकडे लागतें. आणि यामुळें त्यांत प्रतिमापूजनाचा जेवढा कांहीं दूषणार्ह भाग असेल तेवढाच त्यांत शिल्लक असतो. तथापि अशा प्रकारचें पूजनही पापात्मक किंवा मूर्खपणाचें आहे असें समजण्याचें कारण नाहीं; तोही एक कामाचाच भाग आहे. यामुळें कर्मफलाच्या नियमानें त्याचेंही फळ पूजकास अवश्य होय.

---

## प्रकरण ९ वें.

## इष्ट-निष्ठा.

यानंतर इष्टनिष्ठेविषयीं आपणास विचार कर्तव्य आहे. जो कोणी भक्त होऊं इच्छीत असतो त्यानें एक गोष्ट नित्य लक्ष्यांत ठेविली पाहिजे; ती ही कीं, जगांत जीं निरनिराळीं मतें ऐकूं येतात ते एकाच ध्येयाकडे नेणारे अनेक मार्ग मात्र आहेत. एकाच परमेश्वराचें स्वरूप अनेकांना अनेक प्रकारें प्रतीत झालें आणि त्यांनीं अनेक प्रकारें तें एकाच रूपाचें वर्णन केलें. त्यांनीं एकालाच अनेक नांवें दिलीं. एकाचींच अनेक नांवांनीं त्यांनीं अनेक रूपें निर्माण केलीं; तथापि त्या सर्व रूपांत एकाचाच वास आहे. एकाचेंच सर्व सामर्थ्य त्या निरनिराळ्या रूपांत प्रगट झालें. या अनेक रूपांच्या द्वारेंही आपण त्या एकरूपालाच शेवटीं मिळतों. जीवात्म्याला परमात्म्याची अत्यंत भक्ति जडली ह्मणजे मुक्ति किती वेळांत मिळेल हा प्रश्नसुद्धां उत्पन्न होत नाहीं. ब्रह्मस्वरूप इतकें निकटवर्ती आहे. जर आमची भक्ति त्याच्या ठिकाणीं जडत नसेल तर त्यांत आमचेंच दुर्दैव होय. अनेक प्रकारच्या मतांबद्दल केवळ सहिष्णुता बाळगल्यानेंच भक्ताचा कार्यभाग संपत नाहीं. त्यानें कोणत्याही धर्माचा अगर पंथाचा द्वेष करतां कामा नये. इतरांवर टीका करणें हेंसुद्धां त्याच्या उपयोगीं नाहीं. निरनिराळ्या पंथांचे उत्पादक हे एकाच ज्ञानरवीच्या अनेक किरणांसारखे आहेत ही गोष्ट भक्तानें नित्य चित्तांत बाळगावी. अशांचा कोणी अधिक्षेप केला असतां भक्तानें तो आपल्या कानांवरही पडूं देऊं नये. अशा प्रकारचे निस्सीम भक्त खरोखर फार दुर्मिळ आहेत. ज्यांच्या हृदयांत प्रीतीचा उज्वल दीप पेटलेला आहे आणि त्याबरोबरच सर्वव्यापी प्रेमही ज्यांच्या हृदयांत प्रगट झालें आहे असे भक्त सांपडणें कठीण. उलटपक्षीं स्वतःच्या धर्माबद्दल कडकडीत भक्ति बाळगणारे पण अत्यंत आकुंचित अंतःकरणाचे असे भक्त मात्र पुष्कळ आढळतात. त्यांच्या मतांस जो कोणी अनुसरणार नाहीं त्याचा द्वेष करतांकरतांच त्यांनीं जणूंकाय स्वतःच्या पंथाबद्दलचें प्रेम मिळविलेलें असतें. स्वतःच्या पंथाबद्दल अत्यंत भक्ति असून सर्वव्यापि सहिष्णुता दाखविणारे अनेक भक्त

ज्या दिवशीं निर्माण होतील तो सुदिन ! पण असे भक्त फारसे आढळून येत नाहींत, ही मोठया दुःखाची गोष्ट आहे. तथापि पुष्कळ लोकांच्या मनांत एकाचवेळीं दृढ भक्ति आणि सर्वव्यापी प्रेम यांचें बीजारोपण करण्यास मार्ग नाहींत असें नाहीं. अशा प्रकारचें बीजारोपण करण्यास इष्ट-निष्ठेचा मार्ग मोकळा आहे. प्रत्येक धर्मातील प्रत्येक पंथानें आपल्या दृष्टीनें आपापला वेगळा मार्ग सांगितला आहे. पण सनातन वेदान्तधर्मानें अनंत मार्ग मनुष्यजातीस प्रकाशित करून दिलेले आहेत. यांपैकीं कोणत्याही मार्गानें गेलें तरी अखेरीस एकाच ब्रह्मस्वरूपाची प्राप्ति होते. प्रत्येकाच्या परिस्थितीप्रमाणें वेगवेगळ्या इष्ट मार्गांची आवश्यकता असली तरी तितक्याही मार्गांची सोय वेदान्तानें करून ठेविली आहे. इतक्या अनेक मार्गांत एकाच अनंत प्रकाशाचे किरण त्यानें भरून ठेविले आहेत.

मनुष्यजातीच्या कल्याणाविषयीं अत्यंत आतुर अशा वेदान्तधर्मानें मुक्तीसाठीं धडपडणाऱ्या स्त्रीपुरुषांस अनेक मार्ग दाखवून ठेविले आहेत. मानवी जीवितांत सत्य भाग कोणता आहे याचा विचार वेदान्तानें केला आहे. परमेश्वराचे प्रत्यक्ष अवतार जे पूर्वकाळीं होऊन गेले आणि सांप्रतही आहेत अशा विभूतींनीं आपले हस्त पुढें करून सर्वांस मुक्तीकडे येण्याचा मार्ग दाखविला आहे. मायेच्या आवरणांतून मुक्त झालेला आत्मा ज्या सत्यसमुद्रांत पोहूं लागतो आणि जेथें पूर्ण मुक्ति आणि अनंत आनंद यांचा सांठा आहे अशा जागीं नेण्यास हे अवतारी पुरुष आपली मदत तुह्मांस देत आहेत.

मुक्तीकडे नेणारे जे अनंत मार्ग आज आपणांस उपलब्ध आहेत त्यांपैकीं कोणाचाही अधिक्षेप अथवा द्वेष करूं नका, अशी भक्तियोगाची आपणांस निक्षुन आज्ञा आहे. तथापि जमिनींतून नुकत्याच वर उकलूं पाहणाऱ्या वृक्षांभोंवतीं त्याच्या संरक्षणास कुंपण घालणेंही अवश्य आहे. त्याचप्रमाणें भक्तिमार्गाकडे जाऊं पाहणारें नाजुक मन अनेक प्रकारच्या कल्पना आणि अनेक प्रकारचीं ध्येयें यांच्या वावटळींत सांपडल्यास त्याचा नाश होण्याचा संभव आहे. यांत कोंवळ्या झाडाचा नाश होऊं नये अशी व्यवस्था करणें अवश्य आहे. धर्मांच्या बाबतींत आपलीं मतें फार उदार आहेत असा बाणा बाळगणारे कित्येक लोक मूर्खपणानें अनेक प्रकारच्या मार्गांत इकडून तिकडे आणि तिकडून इकडे असे हेलकावे मात्र खात असतात. स्वतःच्या फाजील

चौकसपणाची क्लृप्ती करण्यापलीकडे असल्या धरसोडीचा त्यांना कांहीं उपयोग होत नाहीं. इकडून तिकडे भटकणाऱ्या मनाची वेडी हौस पुरविण्याचा असा छंद एकवार लागला म्हणजे तोच बळावत जाऊन त्याला मानसिक रोगाचें स्वरूप प्राप्त होतें. दारुबाजाला ज्याप्रमाणें दारूवांचून चैन पडेनासें होतें त्याचप्रमाणें रोज नव्या नव्या पंथांची आणि मतांची चव पाहिल्याखेरीज अशा मनुष्यांना चैनच पडत नाहीं. एकादें मत प्रथमच ऐकिलें ह्मणजे त्याच्या केवळ नाविन्यामुळें जो एकप्रकारचा क्षणिक आनंद होतो त्या आनंदाची त्यांना चटक लागून जाते. पण एकवार हा क्षणिक आनंद मावळून गेला ह्मणजे त्या पंथाचा त्यांना वीट येतो आणि त्यांचें मन दुसरा एखादा पंथ हुडकूं लागतें. अफू खाल्ल्यावर जसा क्षणभर आनंद होतो तसाच आनंद अशा लोकांना अनेक धर्मपंथांपासून होत असतो. धर्म या शब्दाची किंमत त्यांच्या दृष्टीनें याहून अधिक नसते. भगवान् श्रीरामकृष्ण ह्मणतात, " मोत्यांच्या शिंपलीसारखे कांहीं लोक असतात. स्वाती नक्षत्राच्यावेळीं मोत्यांचा शिंपला समुद्राच्या पृष्ठभागावर येऊन स्वातीच्या पर्ज्यन्याचा एखादा थेंब आपणांत पडावा यासाठीं तोंड उघडून बसलेला असतो. अशा रीतीनें तोंड उघडें ठेऊन तरंगत असतां स्वातीचा एखादा थेंब त्याच्यांत पडतो. थेंब पडल्याबरोबर शिंपला समुद्राच्या तळीं बुडी मारतो. त्याठिकाणीं तो पुष्कळ काळ स्वस्थ चित्तानें बसून त्या पाण्याच्या थेंबाचें सुंदर मोतीं तो बनवितो. "

इष्ट-निष्ठा कशी असावी याचा बोध या रूपकानें जितका चांगला होतो तितका तो सबंध ग्रंथ लिहूनही होणार नाहीं. एकाच साध्याच्या ठिकाणीं अशा रीतीनें शुद्ध एकनिष्ठा ठेवणें हें धर्ममार्गांत पडूं पाहणाऱ्या नवशिक्या भक्ताला अत्यंत आवश्यक आहे. रामायणांत हनुमान ह्मणतो, जानकीनाथ आणि श्रीनाथ हे एका रूपाचेच दोन अवतार आहेत हें मला समजतें. पण कमलनेत्र रामाचाच वास माझ्या हृदयांत आहे. फक्त रामरूपच मला सर्वत्र दिसतें. भगवान् तुळशीदास ह्मणतात, " सर्वांच्या ठिकाणीं जें कांहीं चांगलें असेल तें अवश्य घ्या; सर्वांच्या बरोबर असा; सर्वांचीं नांवें घ्या; सर्वांना होय होय, असें ह्मणा; पण स्वतःची जागा मात्र सोडूं नका." भक्तिमार्गांत पडूं इच्छिणारानें अशाच प्रकारची वृत्ति सदोदित बाळगिली पाहिजे. आप-

ल्या इष्टदेवतेसंबंधीं अशी भावना पक्की झाली म्हणजे या लहानशा बीजांतून वटवृक्षासारखा प्रचंड भक्तिवृक्ष उगवेल. त्याच्या खांद्या आणि पारंब्या यांचा शेवटीं एवढा मोठा विस्तार होईल कीं, त्यांत धर्मानें दर्शविलेल्या सर्व भूमीचें आक्रमण होईल. ज्यावर आपण एकनिष्ठा ठेविली तेंच एक दैवत सर्वत्र भरून राहिलें असून सर्व पंथांचें, सर्व मार्गांचें आणि सर्व धर्मांचें तेंच एक अंतिम साध्य आहे, असा अनुभव भक्ताला येईल.

## प्रकरण १० वें

## मार्ग आणि साधनें.

वेदान्त सूत्रांवर भगवान् रामानुजांनीं जें भाष्य लिहिलें आहे त्यांत भक्तियोगाचा मार्ग आणि त्यावर आरूढ होण्याचीं साधनें यांसंबंधीं पुढील उल्लेख केला आहे.

आत्मानात्मविचार यास यमनियम, पावित्र्य, यज्ञ, सामर्थ्य आणि अत्युत्कट आनंदाचें दमन यांच्या योगानें हें साध्य सिद्ध होतें. भक्तिमार्गांत पडूं इच्छिणारांस विवेक प्रथम पाहिजे, असें श्रीरामानुजांचें मत आहे. ज्याप्रमाणें इतर साऱ्या गोष्टींत विवेकाची आवश्यकता आहे त्याप्रमाणेंच अन्नाच्या बाबतींतही शुद्धाशुद्धतेचा विवेक आवश्यक आहे. तीन कारणांमुळें अन्न अशुद्ध होऊं शकतें असें श्रीरामानुजांचें मत आहे. तीं तीन कारणें अशीं:– १, अन्नांत स्वभावसिद्ध दोष असतो; लसूण वगैरे पदार्थ या सदरांत येतात. २, दुष्ट अथवा पापी मनुष्याचा त्याला स्पर्श होणें; आणि ३, त्यांत गदळ, केर, केंस इत्यादि अशुद्ध पदार्थ पडणें. शुद्ध अन्नाच्या योगानें सत्वांश सिद्ध होतो, आणि स्मरणशक्ति स्थिर होते, असें श्रुतींत म्हटलें आहे. छांदोग्य उपनिषदांतील या वचनाचा आधार श्रीरामानुजांनींही घेतला आहे.

भक्त होऊं पहाणाराच्या दृष्टीनें या अन्नग्रहणाच्या बाबीला अत्यंत महत्व आहे. भक्तिमार्गास अनुसरणारे जे अनेक पंथ आहेत त्यांपैकीं कांहींनीं या बाबतीचा कांहीं अंशीं अतिरेक केला आहे, ही गोष्ट खरी; तथापि अन्नाच्या इष्टानिष्टतेचा विचार, ही बाब फार महत्वाची आहे यांत मात्र संशय नाहीं.

सांख्य मताप्रमाणें सत्त्व, रज आणि तम या गुणत्रयाची जी साम्यावस्था ती प्रकृति, हें आपण लक्ष्यांत ठेविलें पाहिजे. या गुणत्रयाच्या कमीअधिक मिश्रणानेंच हें दृश्य विश्व उत्पन्न झालें आहे आणि त्यांत प्रकृतीचे गुणही प्रतीत झाले आहेत. आपला स्वत:चाही अंतर्भाव ज्याअर्थी विश्वांतच होतो, त्याअर्थी आपणही या गुणत्रयांतूनच निर्माण झालों आहों हें उघडच आहे. आणि ब्रह्ममार्गावर आरूढ होऊं पहाणाराच्या ठिकाणीं सत्त्व गुणाचें आधिक्य असणें अत्यंत जरुरीचें आहे. अन्नद्वारा जे पदार्थ आपल्या शरीरघटनेंत प्रवेश करितात त्यांच्या गुणावगुणांवर आपली मानसिक अवस्था पुष्कळ अंशीं अवलंबून आहे हें ध्यानांत ठेविलें पाहिजे. याकरितां जें अन्न आपण खातों त्याजवर काळजीपूर्वक नजर ठेवणें हें आपलें कर्तव्य आहे. तथापि अन्नाच्या इष्टानिष्टतेचा विचार करतांना कित्येक पंथवाले या बाबतींत जो अतिरेक करितात त्यांचें पातक त्यांच्या गुरूंच्या माथीं मारलें पाहिजे.

तसेंच अन्नाच्या इष्टानिष्टतेच्या विचाराचें महत्व कमी दर्ज्याचें आहे हेंही उपनिषदांवरील आपल्या भाष्यांत श्रीशंकराचार्यांनीं आहार या शब्दाची निराळीच व्याख्या करून त्यासंबंधीं त्यांनीं निराळ्याच प्रकारचा अभिप्राय प्रगट केला आहे. आहार ह्मणजे अन्न असा अर्थ आपण सामान्यत: समजतों. आहार ह्मणजे आंत घेणें असा अर्थ आचार्यांनीं केला आहे. आत्म्याच्या भोगासाठीं इंद्रियांच्या द्वारें बाह्य पदार्थांचें आंत ग्रहण करणें, असा आचार्यांचा अर्थ आहे. त्यांच्या मतें आहारशुद्धि याचा अर्थ इंद्रियद्वारा घेण्याच्या सर्व पदार्थांचें संशोधन करणें असा आहे. इंद्रियद्वारा बाह्य पदार्थांचें जें ज्ञान आपण ग्रहण करितों त्या ज्ञानांत लोभ, असूया, माया इत्यादि विकारांचें मिश्रण होऊं न देणें असा आचार्यांचा आहारशुद्धीचा अर्थ आहे. अशा रीतीनें बाह्य पदार्थांचें ज्ञान विकाररहित करून त्याचें ग्रहण केलें असतां सत्त्वगुणांची वृद्धि होते; त्यांत इतर गुणांची जी मिसळ असते ती नाहींशी होते; अनंत चैतन्यावर अखंड चित्त राहतें; अशा प्रकारचा आहारशुद्धीचा परिणाम आहे.

आहारशुद्धीचे हे दोन अर्थ एकमेकांना अगदीं भिन्न आहेत हें उघड आहे. तथापि ते दोन्ही बरोबर आहेत आणि आपणांस त्या दोहोंचीही जरूर आहे. केवळ जड शरीराचें नियमन करण्यापेक्षां मनबुद्ध्यादि अंत·

रिंद्रियांचें दमन करणें अधिक महत्वाचें आहे यांत संशय नाहीं. तथापि अंतरिंद्रियांचें दमन करण्यास लागणारें सामर्थ्य प्राप्त करून घेण्याकरितां बाह्य शरीराच्या दमनापासून सुरुवात केली पाहिजे. याकरितां भक्ति-मार्गावर आरूढ होऊं इच्छिणारानें अन्नाच्या इष्टानिष्टतेसंबंधीं जे नियम सांगितले, आहेत त्यांजकडे लक्ष्य पुरविलें पाहिजे. तथापि या गोष्टीचा अतिरेकही होऊं देऊं नये. या गोष्टीचा अतिरेक होतां होतां सारा धर्म आजमितीला स्वयंपाकघरांत घुसून बसला आहे. अन्नशुद्धीच्या नियमांतील मुख्य मुद्दा बाजूला राहून आतां जें कांहीं शिल्लक उरलें आहे, त्यांत शुद्ध जडत्वाखेरीज अधिक महत्वाचा असा कांहीं भाग उरलेला नाहीं. त्या नियमांतील पंचप्राण निघून जाऊन आतां कलेवर मात्र शिल्लक उरलें आहे. असल्या प्रकारचा जड कर्मठपणा हें ज्ञान नव्हे, ही भक्ति नव्हे आणि हा कर्ममार्गही नव्हे. हें एक विशिष्ट प्रकारचें वेड मात्र आहे; आणि जे कोणी तन-मन-धनेंकरून या वेडाच्या मागें लागतील, त्यांना ब्रह्मलोकाची प्राप्ति होण्याऐवजीं वेड्याच्या इस्पितळाची प्राप्ति मात्र हटकून होईल. अन्नाच्या बाबतींत इष्टानिष्टतेचा विचार अवश्य आहे ही गोष्ट आपल्या विवेचक-बुद्धीसही मान्य केली पाहिजे. उच्च दर्ज्याची मानसिक शक्ति ज्याला प्राप्त करून घ्यावयाची आहे, अशा मनुष्याला हा विचार नित्य ध्यानांत बाळगण्यावांचून दुसरा मार्ग नाहीं. यानंतर इंद्रियदमनाचीही आवश्यकता साधकास फार आहे. बाह्यपदार्थांकडे जाऊं पाहणाऱ्या मनास त्यांपासून परावृत्त करणें, इंद्रियांचें नियमन करणें आणि त्यांना इच्छाशक्तीच्या आटोक्यांत आणणें हीं कार्यें साधकाच्या दृष्टीनें धर्ममार्गांत अत्यंत महत्वाचीं आहेत; किंबहुना त्याच्या साऱ्या इमारतीचे हे आधारस्तंभच होत. यानंतर यमनियम आणि यज्ञ यांचा अभ्यास त्यानें केला पाहिजे. केवळ श्रमावांचून आपण आत्मानुभव घेऊं शकूं ही गोष्ट घडणें कधींही शक्य नाहीं. याकरितां साधकांनीं या सर्व गोष्टींचा सतत अभ्यास केला पाहिजे. परमेश्वरावांचून अन्य कोणत्याही विषयाकडे मनानें ओढ घेतां कामा नये. साऱ्या विषयांपासून मनाला परावृत्त करून त्याची योजना फक्त परमेश्वराकडेच करणें हें फार दुष्कर कर्म आहे, ही गोष्ट खरी; तथापि संवयीनें आपणास कसलेंही दुष्कर कार्य सिद्ध करतां येतें. मनाचा निग्रह कसा करावा या अर्जुनाच्या प्रश्नाला भगवान्

श्रीकृष्ण उत्तर देतात—"**अभ्यासेन तु कौंतेय वैराग्येण च गृह्यते**" वैराग्य आणि अभ्यास यांच्या योगानें मन ताब्यांत आणतां येतें. यानंतर साधकाला पंचमहायज्ञ अवश्य आहेत.

भक्तीच्या साऱ्या इमारतीचा मूळपाया ह्मटला ह्मणजे पावित्र्य हा होय. हा पाया पक्का असल्यावांचून पुढील इमारत उभारली जाणार नाहीं. शरिराची बाह्य शुद्धि आणि अन्नशुद्धि या गोष्टी करण्यास सोप्या आहेत; पण अंत:शुद्धीवांचून आणि मन पवित्र झाल्यावांचून या बाह्य उपायांचा उपयोग कांहींच होणार नाहीं. पावित्र्य प्राप्त करून देण्यास भगवान् रामानुजांनीं पुढील उपाय सांगितले आहेत. सत्य, आर्जव ह्मणजे मनाची निस्सीमता दया ह्मणजे स्वत:च्या फायद्याचा विचार न करितां कोणाचेंही चांगलें करण्यास झटणें, अहिंसा ह्मणजे कृतीनें किंवा विचारानेंही कोणास न दुखविणें, अभिध्या म्हणजे परक्याच्या वस्तूवर लोभ न धरणें, निरर्थक विचार न करणें आणि परक्यानें दिलेला त्रास मनांत न घोळविणें. श्रीरामानुजांच्या या यादींत एक तत्त्व विशेष महत्वाचें आहे. तें तत्त्व अहिंसा हें होय. सर्व जीवांसंबंधीं या तत्त्वाचा आचार करणें हें आपणास अवश्य आहे. केवळ मनुष्यप्राण्यांस इजा केली नाहीं ह्मणजे अहिंसेचें तत्त्व पाळिलें जातें असें समजूं नये. इतर प्राणिसृष्टीसंबंधींही हें तत्त्व पाळणें आपणास आवश्यक आहे. त्याचप्रमाणें कुत्र्यामांजरांचें रक्षण करणें अथवा मुंग्यांना साखर घालणें आणि वाटेल त्या रीतीनें मनुष्यांचा छळ करणें हीसुद्धां अहिंसा नव्हे. पुष्कळ लोक अशा प्रकारचें वर्तन करून आपण अहिंसेचें तत्त्व पाळितों असें समजत असतात. तत्त्व कितीही चांगलें असलें तरी अतिरेकानें त्याची माती होते असें आपणास अनेक बाबतींत आढळून येतें. धर्ममार्गाला पोषक अशी कोणतीही चाल अतिरेकास गेली आणि तिच्यांतील मूळ हेतूचा लोप होऊन केवळ जड आचार मात्र शिल्लक राहिले ह्मणजे तिच्यांतील चांगुलपणाचा अंश निघून जातो आणि वाईट तेवढाच शिल्लक उरतो. आपल्या शरिरावरील कीटक मरूं नयेत ह्मणून कित्येक पंथांचे लोक वर्षानुवर्ष स्नानावांचून राहतात; पण असल्या गलिच्छपणामुळें आपल्या मानवबांधवांत अनेक रोगांचा व कष्टांचा फैलाव करण्यास आपण कारणीभूत होतों ही गोष्ट या मूर्खांस समजत नाहीं. श्रुतींनीं सांगितलेल्या सनातनधर्मांत असले भयंकर पंथ नाहींत, ही मोठया भाग्याची गोष्ट आहे.

अहिंसा या शब्दाचा खरा अर्थ असूयेचा अभाव असा आहे. जो कोण-त्याही प्राण्याचा मत्सर करीत नाहीं, तोच मनुष्य खरोखर हें तत्त्व पूर्णपणें पाळतो असें समजावें. एखाद्या विशिष्ट प्रसंगीं कांहीं कारणांमुळें एखादा मनुष्य एखादें सत्कार्य करतो, अथवा मोठा दानधर्म करतो किंवा केवळ पूर्वपरंपरेला बळी पडून तो क्षणभर दयाशील झाल्यासारखा भासतो; पण क्षणमात्र टिकणारी ही अहिंसा ह्मणजे खरी अहिंसा नव्हे. मोठे दानशूर ह्मणून गणले जाणारे अनेक धनाढ्य गृहस्थ पुष्कळ वेळां यःकश्चित कीर्ती-साठीं अथवा सोन्याचांदीच्या थोड्याशा तुकड्यासाठीं एकमेकांचा द्वेष करतांना आढळतात. जोंपर्यंत असल्या प्रकारच्या द्वेषाचें अथवा मत्सराचें बीज आपल्या अंतःकरणांत अंशतःही शिल्लक असेल, तोंपर्यंत या तत्त्वापासून आपण फार दूर आहों असें निःसंशय समजावें. गाय अथवा बोकड हीं मांस खात नाहींत ह्मणून तीं मोठीं अहिंसक आहेत असें ह्मणावयाचें काय? एखाद्या योग्याची व त्यांची योग्यता सारखीच आहे असें समजावयाचें काय? अमुक एक पदार्थ न खाणें एवढ्यांतच सारा धर्म येत असेल तर जगांतल्या कोणत्याही मूर्खाला ही गोष्ट करणें शक्य आहे; पण तेवढ्यामुळें त्याची योग्यता वनस्पत्याहारी पशूंहून खास अधिक नाहीं. एखादा मनुष्य नुसत्या गवतावर निर्वाह करीत असला, पण त्याच वेळीं निराश्रित विधवा आणि पोरकीं पोरें यांच्या माना पैशासाठीं मुरगळीत असला, तर तो पशू-हूनही अधिक हीन बुद्धीचा आहे असें निःसंशय समजावें. ज्याच्या मनाला परपीडेची नुसती कल्पनासुद्धां शिवत नाहीं आणि कट्टया शत्रूचाही उत्कर्ष ज्याला आनंददायक होतो तोच खरा भक्त, तोच खरा योगी आणि तोच सर्वांचा गुरु होय असें समजावें. अशा मनुष्यानें प्रत्येक दिवशीं डुकराचें मांसही भक्षण केलें, तरी त्यामुळें त्याच्या खऱ्या योग्यतेंत उणीव येत नाहीं. याकरितां बाह्योपचारविधि जोंपर्यंत आपल्या अंतःशुद्धीला पोषक होत आहेत, तोंपर्यंतच त्यांचें महत्व आहे, ही गोष्ट नित्य लक्ष्यांत बाळगिली पाहिजे. परिस्थितीमुळें बाह्योपचारविधि तंतोतंत पाळण्याचें न जुळेल तर तिकडे फारसें लक्ष्य न पुरवितां अंतःशुद्धीकडे सर्व लक्ष्य देणें हें अधिक महत्वाचें आहे. जो मनुष्य अथवा जें राष्ट्र विधींतील खऱ्या सत्त्वांशाचा त्याग करून केवळ जड आचारांस मगरासारखें घट्ट मिठी मारून बसतें, तें

आपल्याच हातानें आपल्या पायावर कुऱ्हाड पाडून घेत आहे असें निःसंशय समजावें. कोणताही आचार झाला तरी त्याचें खरें महत्व त्यांत अंतर्भूत होणाऱ्या तत्त्वावर अवलंबून असतें. हें तत्त्व अथवा सत्त्व नष्ट झालें ह्मणजे त्या आचाराच्या नुसत्या कलेवरास काय महत्व आहे ? जीव निघून गेल्यावर देहाला अग्नि देणें जसें आवश्यक आहे, तसेंच सत्त्व निघून गेलेल्या आचारांस नाहींसें करणें अवश्य आहे. यानंतर भक्तियोगाच्या अभ्यासांतील पुढील पायरी, मनाची दृढता होय. ' **नायमात्मा बलहीनेन लभ्यः** ' असें श्रुतिवचन आहे. बलहीन या शब्दांत शरीर आणि मन या दोहोंच्याही दौर्बल्याचा अंतर्भाव होतो. सशक्त आणि चिकाटीचे असे लोकच हा योगाभ्यास करण्यास योग्य आहेत. दुर्बल, भेकड आणि व्यंग अशा लोकांच्या हातून काय होणार आहे ? कोणत्याही योगाचा अभ्यास ह्मटला ह्मणजे त्याच्या योगानें देह आणि मन यांतील गुप्त शक्ति हीं जागृत होत असतात. या शक्ति जाग्या होऊं लागल्या ह्मणजे जो आघात त्या उत्पन्न करतात, तो सोसावयास शारीरिक आणि मानसिक बलाची आवश्यकता आहे. अशा लहानशा आघाताखालींसुद्धां दुर्बल लोकांचा चुराडा उडून जाईल. तरुण, सुदृढ, सशक्त असे लोकच या मार्गांत यश मिळवूं शकतील. याकरितां शारीरिक बलाची अत्यंत आवश्यकता आहे. इंद्रियांचें दमन आपण करूं लागलों, ह्मणजे तींही आपल्या आघातास प्रत्याघात करूं लागतात. शरीर निरोगी आणि सुदृढ असल्याशिवाय हा प्रत्याघात सोसणें आपणांस अशक्य होईल. याकरितां भक्तिमार्गांत पडूं पाहणाराला निरोगीपणा आणि सुदृढता यांची फार आवश्यकता आहे. दुर्बल लोक योगाभ्यास करूं लागले ह्मणजे एखाद्या दुर्धर रोगानें ते पछाडले जातात अथवा त्यांचीं मनें बेताल होऊन जातात. ब्रह्मज्ञानाच्या अभ्यासासाठीं मुद्दाम शरीर वाळविणें हा योग्य मार्ग नव्हे.

मनानें जे दुर्बल आहेत त्यांनाही आत्मलाभ होणें शक्य नाहीं. जो भक्त होण्याची इच्छा करतो त्यानें आनंदी वृत्ति बाळगिली पाहिजे. खरा धार्मिक मनुष्य सदा दुर्मुखलेला असतो, असा पाश्चात्य लोकांचा समज आहे. ज्याच्या तोंडावर सदोदित दुःखाची छाया पसरली असेल आणि दुःखामुळें ज्याचें तोंड सदा वांकडें दिसत असेल, तोच मनुष्य खरा धार्मिक

अशी कल्पना पाश्चात्य देशांत रूढ झाली आहे. पण वाळक्या शरिराचे आणि आंबट तोंडाचे लोक वैद्याचे शिष्य होण्यासच योग्य आहेत. अशा लोकांनीं कोणत्याही योगमर्गाकडे ढुंकून पाहूं नये हें चांगलें. कोणत्याही मार्गांत आनंदी वृत्तीचा मनुष्यच चिकाटी दाखवूं शकतो. हजारों अडचणी आल्या तरी त्या दूर ढकलून आपला मार्ग निष्कंटक करणें ही गोष्ट सुदृढ मनाच्या माणसास मात्र शक्य आहे. मायेचें जाळें आपल्याभोंवतीं इतकें दाट विणलें गेलें आहे कीं, तें तोडून टाकून त्यांतून स्वतःला मोकळें करणें हें अत्यंत दुर्घट कर्म आहे. हें कर्म प्रचंड इच्छाशक्ति असल्यावांचून साध्य होणें शक्य नाहीं.

योगमार्गांत पडूं पाहाणाराला आनंदी वृत्तीची आवश्यकता आहे, ही गोष्ट खरी; तथापि हर्षाचा अतिरेकही त्याला उपयोगी नाहीं. कोणत्याही प्रश्नाचा गंभीरपणें विचार करण्यासाठीं चित्ताच्या समतेची आवश्यकता असते. हर्षाच्या अतिरेकानें या समतेचा भंग होतो. त्याच प्रमाणें आपल्या मानसिक शक्तींचाही हर्षातिरेकानें अपव्यय होत असतो. ज्या मानानें आपली इच्छाशक्ति अधिक सुदृढ असेल, त्या मानानें कोणत्याही विकारास बळी न पडण्याचें तिचें सामर्थ्यही अधिक असतें. दुर्मुखलेपणा हा जितका योगमार्गास प्रतिकूल आहे, त्याच प्रमाणें हर्षातिरेकही तितकाच प्रतिकूल आहे. आपल्या मनाच्या वृत्तींत अत्यंत समतोलपणा स्थापित होऊन जेव्हां त्याला शांतीचा लाभ होईल, तेव्हांच आपणास आत्मानुभवाची प्राप्ति होईल.



# भक्तियोग–भाग दुसरा.

## पराभक्ति.

### प्रकरण १ लें.

### त्यागाची पूर्वतयारी.

भक्तिमार्गावर आरूढ होण्यापूर्वी जी आगाऊ तयारी करावी लागते तिच्यासंबंधीं येथवर विचार केला. आतां पराभक्ति किंवा भक्तीची जी अत्युच्च दशा तिजसंबंधीं विचार आपणास कर्तव्य आहे. पराभक्तीचा अभ्यास करण्यासाठीं प्रथम कोणत्या प्रकारची तयारी करावी लागते याचा आतां विचार करूं. जीवात्म्याची शुद्धि करणें हाच उद्देश सर्व प्रकारच्या यां पूर्वतयारींत असतो. जप, कर्मकांडांतील पूजादि प्रकार आणि प्रतिमा इत्यादिकांची पूजा हे सारे प्रकार आत्म्याच्या शुद्धीसाठीं असतात. शुद्धी-करणाच्या या सर्व प्रकारांत अत्यंत उच्च प्रतीचा प्रकार ह्मणजे त्याग हा होय. त्यागावांचून पराभक्तीच्या प्रदेशांत कोणाचाही प्रवेश होणें शक्य नाहीं. त्याग हा शब्द उच्चारतां क्षणींच पुष्कळांच्या आंगावर कांटा उभा राहतो. त्यागाची नुसती कल्पनासुद्धां पुष्कळांना भयंकर वाटते. तथापि त्यागावांचून ब्रह्मपदाची प्राप्ति होणें शक्य नाहीं. कोणताही योग झाला तरी त्यांत त्यागाची आवश्यकता आहेच. मोक्षमार्गाचा रस्ता ज्याला आक्रमण करावयाचा असेल त्याला पहिली पायरी चढल्यावांचून पुढें जाणें शक्य नाहीं. अनेक धर्ममार्गाचा अर्थ एकाच शब्दांत सांगावयाचा असेल तर तो ‘ त्याग ’ या शब्दानें सांगतां येईल. पृथ्वीवरील साऱ्या धर्मांचें

हृदयसर्वस्व ह्मटलें ह्मणजे 'त्याग' हेंच होय. ज्या वेळीं या पृथ्वीवरील वस्तूंपासून जीवात्मा पराङ्मुख होतो, ज्या वेळीं तो अधिक खोल अशा विचारांच्या समुद्रांत प्रवेश करूं लागतो, ज्या वेळीं जीवात्मा जड वस्तूंत गुरफटला जाऊन स्वत: जड बनत आहे असा अनुभव मनुष्यास येऊं लागतो आणि ज्या वेळीं या जडत्वांत सांपडून आपला नाश होऊं नये अशी उत्कट इच्छा मानवी मनांत उत्पन्न होते, त्याच वेळीं त्यागाचा मार्ग दिसूं लागतो आणि त्याच वेळीं मनुष्य आत्मानुभवाच्या वाटेला लागतो. कर्मफलाची आसक्ति सोडणें हा कर्मयोग्यांचा त्याग होय. आपण कोणतेंही कर्म करीत असलों तरी त्यापासून कांहीं फल मिळण्याची आशा कर्मयोगी करीत नाहींत. आपल्या कर्माचें ऐहिक किंवा पारलौकिक फल मिळावें, अशी आकांक्षा तो घेत नाहीं. हें सारें विश्व आत्म्याच्या अनुभवाकरितांच नटलें आहे, ही गोष्ट राजयोगी विसरत नाहीं. जगांतील साऱ्या वस्तूंचा अनुभव घेऊन आत्मा हा त्यांपासून भिन्न आहे, हें राजयोगी जाणतो. जगांतील कोणतीही परिस्थिति आत्म्याला लिप्त करूं शकत नाहीं असा अनुभव राजयोगी घेतो. जड वस्तूंच्या संगतींत राहिल्यामुळें जीवात्माही जड आहे, असा भ्रम आपणास झाला आहे. हा भ्रम दूर करून जीवात्मा जड नसून शुद्ध चैतन्यरूप आहे आणि तो जडरूप कधींच नव्हता असा अनुभव आपणास घ्यावयाचा आहे. जड वस्तू आणि चैतन्यरूप आत्मा यांचा जो संबंध आज आपणास दिसत आहे, तो चिरकालिक नसून क्षणिक मात्र आहे. सृष्टींतून अशा प्रकारच्या अनुभवाची प्राप्ति करून घेऊन तिच्यांतील वस्तूंचा त्याग करावयाचा हा राजयोग्याचा मार्ग आहे. ज्ञानयोग्यांचा त्याग याहून अधिक खडतर आहे. हा त्याग सिद्ध करणें अत्यंत दुष्कर कर्म आहे. आपल्या प्रत्ययास येत असलेलें हें सारें विश्व शुद्ध भ्रमरूप आहे ही गोष्ट आपल्या चित्तास त्याला पटवावयाची असते. जगांत शक्तीचें जें नाना प्रकारचें रूप प्रतीत होत आहे, त्या शक्तीचें अधिष्ठान विश्वांत नसून आत्म्यांत आहे असा अनुभव त्याला घ्यावयाचा असतो. सर्व प्रकारचे अनुभव आणि सर्व प्रकारचें ज्ञान यांचें अधिष्ठान विश्वांत नसून आत्म्यांत आहे हें समजण्यापासूनच त्याच्या मार्गास आरंभ होतो. अशी समजूत पटेपर्यंत त्यानें ज्ञानमार्गाचा आरंभ केला असेंही ह्मणवत नाहीं. याकरितां

केवळ बुद्धिगम्य मार्गानें जाऊन व केवळ बुद्धीच्या बलावर सृष्टीचें व आत्म्याचें हें अंतर्गत स्वरूप जाणून सृष्टीच्या पाशांतून त्याला मुक्त व्हावयाचें असतें. हें सारें विश्व व त्यांतील सारे पदार्थ हे निव्वळ मायारूप असून मी एकच काय तो सत्यरूप आहें, असा अभ्यास त्याला करावयाचा असतो. स्वतः-च्या नेत्रांवरील या सर्व पदार्थांचें पटल त्याला एकदम दूर करावयाचें असतें.

जगांत त्यागाचे जितके मार्ग आहेत, त्या सर्वांत भक्ताचा मार्ग अधिक स्वाभाविक आणि ह्मणूनच अधिक सोपा आहे. यांत कोणत्याहि प्रकारचा अट्टाहास नाहीं. यांत हट्टानें कांहींही सोडावयाचें नसतें. यांत कोणत्याही सोंगापासून बळजबरीनें आपणाला तोडून घ्यावयाचें नसतें. भक्ताचा त्याग हा सोपा आणि सरळ मार्गानें चालणारा असतो. ज्याप्रमाणें आपणाभोंव-तालचीं बंधनें स्वाभाविक रीतीनें आपणांभोंवतीं उरलीं आहेत, त्याच रीतीनें भक्ताचा त्यागही स्वाभाविकपणेंच होत असतो. अशा प्रकारच्या त्यागाचीं उदाहरणें आपण आपल्या आजुबाजूस नित्य पाहत असतों. एखादा पुरुष एखाद्या स्त्रीवर प्रेम करूं लागतो. थोड्या वेळानें तें त्याचें प्रेम फिकें पडतें. पुढें तो दुसऱ्या स्त्रीवर प्रेम करूं लागतो, आणि त्याच्या चित्तांतून पहिल्या स्त्रीचा मागमूसही नाहींसा होतो, त्याला कोणत्याही प्रकारचे कष्ट न होतां किंवा त्याला तिची जरूर कोणत्याही प्रकारची न भासतां ती त्याच्या चित्तांतून गळून जाते. अशाच रीतीनें, एखादी स्त्री एका पुरुषावर प्रेम करीत असते आणि थोड्या काळानें तो तिच्या चित्तां-तून निघून जातो आणि त्याऐवजीं ती दुसऱ्यावर प्रेम करूं लागते. एखाद्या मनुष्याचें आपल्या गांवावर फार प्रेम असतें, कांहीं काळानें तो देशावर प्रेम करूं लागतो. त्याची देशप्रीति वाढली ह्मणजे गांवावरील प्रेम त्याला न समजतां अगदीं शांतपणें त्याच्या चित्तांतून निघून जातें. तसेंच एखाद्याच्या चित्तांत विश्वव्यापी प्रेमाचा उद्भव झाला ह्मणजे त्याचा देश त्याच्या लक्ष्यां-तून जातो. जो देश एका काळीं त्याचें हृदयसर्वस्व होऊन बसला होता व ज्याच्यासाठीं तो अगदीं वेडा होऊन गेला होता, तो देश त्याच्या चित्तांतून केव्हां निघून गेला हेंसुद्धां त्याला समजत नाहीं. या ठिकाणीं त्याला कोण-त्याही प्रकारचा अट्टाहास करावा लागत नाहीं अथवा कोणत्याही प्रकारचा त्रास भोगावा लागत नाहीं. एखाद्या गांवढळ मनुष्याला इंद्रियजन्य सुखाची

अत्यंत आसक्ति असते. असा मनुष्य पुढें संस्कृत होऊं लागला ह्मणजे त्याची बुद्धि जागृत होऊं लागते. बुद्धि जागृत झाली ह्मणजे बुद्धिगत सुखाची आवड त्याच्या ठिकाणीं उत्पन्न होऊं लागते. ही आवड वाढत जाऊं लागली ह्मणजे जड इंद्रियांपासून होणारीं सुखें त्याला तुच्छ वाटूं लागतात आणि त्यांजवरील त्याची आसक्ति कमी कमी होत जाते. एखादा कुत्रा अथवा लांडगा आपलें अन्न जितक्या प्रेमानें खातांना आढळतो, तितक्या प्रेमानें मनुष्यप्राणी आपलें अन्न खात नाहीं. कुत्र्याला बुद्धिगत आनंदाचा अनुभव नसल्यामुळें जड इंद्रियांपासून होणाऱ्या आनंदाची तीव्रता त्याच्या ठिकाणीं आढळून येते. मनुष्यांत बुद्धीची जागृती असल्यामुळें जड इंद्रियांपासून त्याला तितका तीव्र आनंद होत नाहीं. तसेंच मनुष्याला बुद्धिगत आनंद अनुभविण्याची जी पात्रता आहे ती कुत्र्याच्या ठिकाणीं कधींही येणार नाहीं. जड इंद्रियांपासून होणारा आनंद हा अगदीं खालच्या पायरीचा आनंद होय. पण कोणत्याही प्राण्याची संस्कृति जों जों उच्चतर होत जाते, तों तों खालच्या प्रतीच्या आनंदाची तीव्रता कमी कमी होत जाते. मनुष्यसृष्टींतही जों जों मनुष्य पशूच्या अधिक जवळ असेल, तों तों त्याच्या आनंदाची व्याप्ति जड इंद्रियांत अधिक गुरफटलेली असते. आपली ही स्थिति सोडून तो वर जाऊं लागला–अधिक सुसंस्कृत होऊं लागला–ह्मणजे बुद्धिगत आनंदाची गोडी त्याला अधिक प्रमाणानें लागते, व खालच्या पायरीच्या आनंदावरून त्याचें मन उडून जाऊं लागतें. अशाच रीतीनें बुद्धीच्या भूमिकेचाही त्याग करून जो मनुष्य उच्चतर भूमिकेवर आरूढ झाला असेल त्याला बुद्धिगत आनंदाहूनही अधिक सूक्ष्म अशा आनंदाची प्राप्ति होऊं लागून बुद्धिगत आनंदापासून त्याचें मन परत फिरेल. अशा रीतीनें तो उच्चतमावस्थेप्रत गेला ह्मणजे आनंदाचें सारें निधान त्याच्या हातीं लागतें. त्या आनंदाशीं तुलना करतां इंद्रियगत अथवा बुद्धिगत सुखें हीं केवळ कःपदार्थ होत. चंद्र आपल्या संपूर्ण तेजानें प्रकाशूं लागला ह्मणजे ताऱ्यांचें तेज फिक्कें पडतें; आणि सूर्योदय झाला ह्मणजे चंद्र फिक्का पडतो. भक्तियोग सिद्ध करण्याकरितां ज्या त्यागाची अपेक्षा आहे, तो त्याग कोणत्याही प्रकारच्या अट्टाहासानें सिद्ध करावा लागत नाहीं. तो स्वाभाविकपणें आपोआपच सिद्ध होत जातो. मोठ्या प्रकाशापुढें लहान प्रकाश जसा आपोआपच फिक्का

पडत जातो आणि अखेरीस त्याचा मागमूसही लागत नाहीं, तसा भक्ताचा त्यागही आपोआप सिद्ध होत जातो. त्याच्या दृष्टीनें इंद्रियगत आणि बुद्धिगत सुखांचा प्रकाश हळूहळू मंदावत जातो आणि अखेरीस नष्ट होतो. ईश्वरी प्रेमाचा दिव्य प्रकाश त्याच्या चित्तांत फांकला ह्मणजे तेथले बाकीचे सारे प्रकाश आपोआप नष्ट होतात. ईश्वरी प्रेम वाढत वाढत त्याला पराभक्तीचें स्वरूप येतें. कर्मकांडाच्या बाह्य मार्गांचा आचार तो विसरतो. ग्रंथ त्याच्या चित्तांतून पळ काढतात, प्रतिमा, देवळें, अनेक पंथ, अनेक देश आणि अनेक जाती हीं सारीं त्याच्या चित्तांतून नष्ट होतात. ह्या अनेक बंधनांनीं तो पूर्वी बांधला गेला होता; पण परमेश्वरविषयक प्रेम त्याच्या चित्तांत उद्भवल्याबरोबर हे सारे पाश केवळ स्वाभाविकपणेंच त्याच्या चित्तांतून गळून जातात. त्याचें स्वातंत्र्य नष्ट करावयास अथवा त्याला बद्ध करावयास कोणीही धजत नाहीं. एखादें गलबत एखाद्या लोहचुंबकाच्या खडकाजवळ आलें ह्मणजे त्यांतील खिळे आणि सर्व लोखंडाचे तुकडे त्या खडकाकडे खेंचले जातात आणि त्याच्या सर्व फळ्या मोकळ्या होऊन त्या इतस्ततः पाण्यावर तरंगू लागतात. अशाच रीतीनें परमेश्वराचें प्रेम जीवात्म्याला बद्ध करणारे सर्व खिळे आणि पट्या ओढून काढतें आणि जीवात्मा मोकळा होतो. अशा रीतीनें भक्तिमार्गांत होणारा त्याग स्वाभाविकपणेंच सिद्ध होत जातो. त्यांत कोणताही अट्टाहास नाहीं, त्यांत कोणताही त्रास नाहीं आणि त्यांत कसलीही धडपड आणि कष्टही नाहीं. कोणताही विकार अट्टाहासानें दाबून टाकण्याचें काम भक्ताला करावें लागत नाहीं. या विकाराची योजनाही तो परमेश्वरावरील प्रेम वाढविण्याकडेच करीत असतो.

---

## प्रकरण २ रें.

## भक्तींतूनच त्यागाचा उद्भव.

प्रेमाची व्याप्ति सर्व सृष्टींत आहे, असें आपणास नेहमीं आढळून येतें. आपल्या मानवी समाजांत जें कांहीं चांगलें, मोठें व उदात्त असें असतें तें

या प्रेमांतूनच उद्भवलेलें असतें. तसेंच समाजांत जें कांहीं वाईट अथवा राक्षसी स्वभावाचें द्योतक असें असतें, त्याचाही उगम प्रेमापासूनच झालेला असतो. फरक इतकाच कीं, या दुसऱ्या प्रकारांत प्रेमाच्या व्याप्तीची दिशा चुकलेली असते. तें भलतीकडेच राबलेलें असतें. पति आणि पत्नी यांजमध्यें जो पवित्र आणि शुद्ध असा परस्परसंबंध आढळून येतो, तोही याच प्रेमापासून उद्भवलेला असतो. तसेंच अत्यंत खालच्या वर्गांच्या विकारांची तृप्ति ज्या कृत्यांनीं होते तीं कृत्येंसुद्धां प्रेमाचेंच एक स्वरूप होय. मूळ भावना दोन्ही ठिकाणीं एकच आहेत; पण निरनिराळ्या ठिकाणीं तिचें रूप निरनिराळ्या प्रकारांनीं व्यक्त झालें आहे इतकेंच. एक मनुष्य फार परोपकारी स्वभावाचा असतो. स्वतःशीं जें कांहीं असेल त्याचें दान गरिबांस करावें अशी इच्छा त्याला होते. दुसरा मनुष्य लोकांचे गळे कापून आणि त्यांना बुचाडून स्वतःची तुंबडी भरीत असतो. परस्परांस अत्यंत विरुद्ध अशा या कृतींचें मूळ एकाच भावनेंत आहे. परोपकारी मनुष्याचें प्रेम दुसऱ्यांवर जितकें असतें, तितकेंच दुष्ट मनुष्याचें प्रेम स्वतःवर असतें. दुष्ट मनुष्याच्या ठिकाणीं प्रेमाची दिशा चुकलेली असते, आणि सच्छील मनुष्याच्या ठिकाणीं ती दिशा बरोबर असते, एवढाच फरक या दोघांमध्यें आहे. जो अग्नि आपणासाठीं पाकसिद्धि करितो, तोच अग्नि एखाद्या मुलाला जाळून त्याचा प्राणही घेतो. या दुसऱ्या प्रकारांत त्या अग्नीचा कांहीं दोष आहे असें नाहीं. त्याचा ज्या प्रमाणें सदुपयोग अथवा दुरुपयोग करावा, त्याप्रमाणें तो सुखास अथवा दुःखास कारणीभूत होतो. याकरितां परस्परांविषयींची आवड आणि परस्परांतील भिन्नत्व नाहींसें होऊन त्यांनीं एकरूप व्हावें अशी इच्छा आपणास सर्वत्र आढळून येते. ही इच्छा केवळ मानवी सृष्टींतच आहे असें नसून ती खालच्या प्रतीच्या प्राण्यांतही दिसून येते. भक्तियोग हें उच्च प्रेमाचें शास्त्र आहे. प्रेमसूत्राच्या द्वारें अखेरीस विश्वव्यापी प्रेम कसें प्राप्त करून घ्यावें हें दर्शविणारें जें शास्त्र त्याला भक्तियोग असें ह्मणतात. प्रेमाची दिशा कशी असावी, या भावनेचें योग्य नियमन कसें करावें, तिजवर ताबा कसा मिळवावा, तिचा उपयोग कसा करावा, तिला नव्या दिशेकडे कसें वळवावें आणि तिजपासून अत्यंत उच्च आणि अत्यंत उज्वल असें साध्य कसें साधावें, हें भक्तियोग आपणास शिकवितो. याच प्रेमसूत्राच्या द्वारें

ब्रह्मानंद कसा प्राप्त करून घ्यावा, हें भक्तियोगाच्या शास्त्रानें आपणांस कळून येतें. सर्वस्वाचा त्याग करा असें भक्तियोग आपणास सांगत नाहीं. तो आपणास प्रेम करावयास सांगतो. अत्यंत उच्च अशा स्वरूपावर प्रेम करा असें भक्तियोगाचें आपणास सांगणें आहे. अशा प्रकारचें अत्युच्च दर्जाचें प्रेम आपल्या ठिकाणीं उद्भवलें ह्मणजे आपल्या स्वभावांत जो कांहीं कनिष्ट दर्जाचा भाग असेल तो आपोआप गळून जाईल.

भक्त ह्मणतो "तुजविषयीं मला कांहीं बोलतां येत नाहीं. तूं माझें प्रेमनिधान आहेस, तूं सर्व सौंदर्याचें सार आहेस; किंबहुना तूं सौंदर्यस्वरूपच आहेस इतकेंच मी ह्मणतों." सौंदर्यावर प्रेम करावें अशी जी इच्छा आपल्या मनांत नैसर्गिकपणेंच उद्भवलेली असते, त्या इच्छेला परमेश्वराकडे वळवावें इतकेंच भक्तियोगाचें आपणास सांगणें आहे. मनुष्याच्या चेहऱ्यांत आढळून येणारें सौंदर्य, आकाशांतील नीलिमेचें सौंदर्य अथवा ताऱ्यांचें सौंदर्य किंवा चंद्राच्या शुभ्रकतेचें सौंदर्य यांचा उद्भव तरी कोठून झाला आहे ? सर्व विश्वव्यापी ईश्वरी सौंदर्याचा अंश मात्र वरील वस्तूंच्या द्वारें आपणास प्रतीत होत असतो. ईश्वराच्या तेजानेंच सर्व वस्तू प्रकाशित होत असतात. वस्तूंच्या ठिकाणीं आपणास जो प्रकाश आढळून येतो, तो त्याच्याच प्रकाशांतून उद्भवलेला आहे. भक्तीनें जी ही अत्युच्च भूमिका दर्शविली आहे, तिजवर तुह्मीं आरूढ झालां ह्मणजे स्वतःच्या अत्यंत क्षुद्र भूमिकेचा तुह्मांस ताबडतोब विसर पडेल. आकुंचित बुद्धीच्या स्वार्थास बळी पडून आपण या जगांतील वस्तूस मिठी मारली आहे. आतां ही मिठी आपण सोडली पाहिजे. आपलें सारें कल्याण आणि आपल्या जन्माचा अत्युच्च हेतू हीं फक्त मानवी समाजांतच गुरफटून राहिलीं आहेत असें समजूं नका. विश्वाचा केवळ साक्षी किंवा त्याचा विद्यार्थि या नात्यानें सृष्टचमत्कारांकडे पाहण्यास आपण शिकलें पाहिजे. मनुष्यसृष्टीपासून आपण अलिप्त आहों अशी भावना करून या जगाचें निरीक्षण आपण केलें, तर प्रेमाचें स्वरूप या जगांत कशा रीतीनें व्यक्त होत आहे हें आपणास कळून येईल. कित्येक वेळां या प्रेमाच्या वाढीस थोडाबहुत अडथळा होत आहेसें दिसेल; तथापि तो खरा अडथळा नसून प्रेमाच्या अत्युच्च दशेस पोहोंचण्याकरितां जी धडपड आपण करितों, त्या धडपडीचा तो एक देखावा मात्र आहे, असें आपल्या प्रत्ययास येईल.

कित्येक वेळां या प्रेमांत कांहीं द्वंद्व उभें राहिल्याचें दिसून येईल, अथवा कित्येक वेळां त्यांत कांहीं कमतरता झाल्याचेंही दिसेल; तथापि हा देखावाही शाश्वत स्वरूपाचा नसून केवळ क्षणिक असतो. आपण केवळ साक्षित्व स्वीकारिलें ह्मणजे असले अडथळे कितीही आले तरी त्यांजबद्दल फिकीर बाळगण्याचें कारण आपणांस नाहीं. आपण जगाच्या प्रवाहाबरोबर वाहूं लागलों तर मात्र या अडचणींचा आपणांस त्रास होईल; पण आपण जगाच्या संपर्कापासून अलिप्त होऊन केवळ साक्षित्व स्वीकारलें अथवा त्यांतील देखाव्यांचा अभ्यास करणारे विद्यार्थी आपण बनलों ह्मणजे या अडचणींचें स्वरूप पालटून परमेश्वर प्रेमाच्या रूपानें कोट्यवधि मार्गांनीं व्यक्त होत आहे, असा अनुभव आपणांस येईल. कोणताही आनंद, मग तो इंद्रियजन्य असो अथवा दुसऱ्या कोणत्याही स्वरूपाचा असो, जेथें जेथें अंशतःही व्यक्त होत असेल तेथें तेथें परमेश्वराचें सच्चिदानंदरूप अंशतः प्रकट होत असतें. केवळ इंद्रियजन्य आणि अत्यंत विकृत अशा सुखांतही ईश्वराच्या प्रेमस्वरूपाचें बीज असतें. परमेश्वराला संस्कृतांत ‘ हरि ’ असें नांव आहे. हरि ह्मणजे स्वतःच्या ठिकाणीं सर्वांस आकर्षण करणारा. मानवी अंतःकरणांत जें आकर्षण आहे, तें त्याचेंच स्वरूप होय. आत्म्याला आकर्षण करणारी अशी वस्तु परमेश्वरावांचून दुसरी कोणती असूं शकणार आहे ? केवळ निर्जीव मृत्पिंडाच्या ठिकाणीं जीवात्म्याला आकर्षण करण्याचें सामर्थ्य कधींतरी असूं शकेल काय ? ही गोष्ट शक्यच नाहीं. असें पूर्वीं कधीं घडलें नाहीं आणि यापुढेंही कधीं घडणार नाहीं. एखाद्या मनुष्याचें अंतःकरण एखाद्या सुंदर चेहऱ्याकडे वेधलें जातें असें आपण पाहतों. त्या वेळीं मांसवसादि पदार्थांनें ज्याची रचना झाली आहे, असा निर्जीव चेहराच त्याचें अंतःकरण वेधीत असतो काय ? नाहीं. त्या जड चेहऱ्याच्या मागें जो ईश्वरी प्रकाश आणि जें ईश्वरी प्रेम आहे तेंच ही वेधण्याची क्रिया करीत असतें. त्या चेहऱ्यामागील प्रकाश नष्ट झाला, तर बाकी राहिलेल्या मृत्पिंडावरील प्रेमही नष्ट होतें असा अनुभव आपणास नित्य आहेच. अज्ञानग्रस्त मनुष्याला हें रहस्य कळत नाहीं. पण त्याला तें कळलें अथवा न कळलें तरी त्याच्या चित्तवेधाचें कारण हेंच आहे, यांत मात्र संशय नाहीं. अशा रीतीनें जगांत जेथें जेथें परस्पर आकर्षणाची क्रिया दिसून येते, तेथें तेथें

त्या क्रियेच्या मागें परमेश्वर स्वतः उभा आहे असें निःसंशय समजावें. " पतीकरितां पतीवर प्रेम कोणीही करीत नाहीं; तर त्याच्या ठिकाणीं जें भगवंताचें स्वरूप व्यक्त झालें आहे त्या स्वरूपावरच तें प्रेम जडलेलें असतें " असें श्रुतिवचन आहे. प्रेमळ पत्नींना ही गोष्ट समजत असेल अथवा नसेल; पण ही गोष्ट अक्षरशः सत्य आहे हें मात्र खरें. "पत्नीकरितां पत्नीवर प्रेम जडलेलें नसतें तर तिच्या ठिकाणीं जीवात्म्याच्या रूपानें जो व्यक्त झाला आहे त्याजवर तें प्रेम असतें." अशाच रीतीनें जगांत जेथें जेथें आकर्षण दिसून येतें, तेथें तेथें त्याच्या पाठीमागें परमेश्वराचेंच स्वरूप त्याचें कारण असतें. परमेश्वर हा एखाद्या मोठ्या लोहचुंबकासारखा असून आपण सारे लोहकणासारखे आहों. तो आपणा सार्‍यांस एकसारखा आकर्षण करीत असतो आणि आपण सारे त्याजकडे जाण्यासाठीं एकसारखे धडपड करीत आहों. आपण या जगांत जी अनेक प्रकारची धडपड करीत आहों तिच्या मुळाशीं केवळ स्वार्थच आहे असें नाहीं. आपल्या सार्‍या धडपडीचा अंतिम हेतु काय आहे, ही गोष्ट पुष्कळ अज्ञानी माणसांच्या लक्ष्यांत येत नाहीं; तथापि या सार्‍या धडपडीचा अंतिम हेतू त्या महाचुंबकाकडे जाणें हाच आहे. आपली भयंकर धडपड आणि आयुष्यांतील सारी अहमहमिका ही परमेश्वराकडे जाण्यासाठीं व अखेरीस त्याच्याशीं एकरूप होण्यासाठींच चालू आहे.

भक्तियोगाच्या मार्गांत ज्यानें पाऊल ठेविलें आहे, त्याच्या लक्ष्यांत ही गोष्ट आगाऊच आलेली असते. आपल्या धडपडीचा अंतिम हेतु काय आहे हें त्यानें आगाऊच जाणलेलें असतें. अनेक वेळां अनेक प्रकारची गडबड केल्यामुळें हा अंतिम हेतू त्यानें जाणलेला असतो. यामुळें या धडपडींतून कायमचें मुक्त व्हावें अशी जाज्वल्य इच्छा त्याच्या ठिकाणीं उद्भवलेली असते. परमेश्वराच्या भेटीच्या आड येणारे सर्व अडथळे दूर करून त्या हरिसन्निध एकदम जाऊन पोंचावें अशी त्याची इच्छा असते. भक्ताचा त्याग अशा स्वरूपाचा असतो. परमेश्वरासन्निध जावें अशी जी जोराची ओढ त्याच्या अंतःकरणांत लागलेली असते, तिजमुळें बाकीचे सारे पदार्थ त्याला तुच्छ वाटूं लागतात. परमेश्वरविषयक प्रेमानें त्याचें अंतःकरण एकवार पूर्णपणें भरून गेलें म्हणजे तेथें दुसर्‍या पदार्थांस राहण्यास अव-

सरच पुरत नाहीं; आणि असें होणें हें सर्वथा योग्यच आहे. स्वतः प्रेम-सागर त्याच्या हृदयांत भरून गेला ह्मणजे तेथें बारिकसारिक गोष्टी-विषयीं प्रेम कोठें राहणार ? भक्ताच्या त्यागाला अशा प्रकारच्या वैराग्याचें स्वरूप असतें. परमेश्वराच्या ठिकाणीं अत्युत्कट अनुराग उत्पन्न झाल्यामुळें ज्या वस्तु परमेश्वरस्वरूप नाहींत असें त्याला वाटतें, त्याजविषयीं त्याच्या चित्तांत आपोआप वैराग्य बाणतें.

अशा रीतीनें परमेश्वरास स्वात्मार्पण करून वैराग्य साधणें, हा पराभक्ति साध्य करण्याचा अत्युत्कृष्ट मार्ग आहे. वैराग्य सिद्ध झालें ह्मणजे मोक्षाचा दरवाजा खुला होतो व पराभक्तीच्या अत्युच्च प्रदेशांत जीवात्म्याचा प्रवेश होतो. याच ठिकाणीं पराभक्ति ह्मणजे काय हें भक्तास समजूं लागतें, आणि अशा रीतीनें पराभक्तीच्या प्रदेशांत ज्याचा प्रवेश झाला असेल, अशाच मनुष्याला प्रतीक-प्रतिमादि पूजन हें मोक्षमार्गाला निरुपयोगी आहे असें ह्मणण्याचा अधिकार येतो. सर्व मनुष्यमात्रांत बंधुभावाचें नातें आहे ही गोष्ट फक्त अशाच मनुष्याला स्वानुभवानें पटलेली असते. अशा स्थितीस न पोंचलेल्या मनुष्यांनीं मनुष्याच्या बंधुत्वाचे गोडवे कितीही गाइले, तरी त्यांची वायफळ बडबडीहून अधिक किंमत नाहीं. पराभक्तीच्या गर्भागारांत ज्याचा प्रवेश झाला असेल, त्याच्या दृष्टीनें सर्व भेद गुप्त झालेले असतात, प्रेमाच्या सागरानें त्याच्या ठिकाणीं प्रवेश केलेला असतो, आणि त्याला मनुष्य हा केवळ मनुष्यरूप नसून प्रत्यक्ष परमेश्वरच आहे असें दिसत असतें. सर्वत्र परमेश्वरच भरून उरला आहे, अशी भावना त्याच्या ठिकाणीं दृढ झालेली असते. प्रत्येक चेहऱ्यांत त्याला हरी दिसत असतो. सूर्यचंद्राचें तेज हें हरीचेंच तेज आहे असें त्याला दिसत असतें. जेथें जेथें सौंदर्याचा अथवा उदात्ततेचा भाग असेल, तेथें तेथें आपला हरीच प्रगट झाला आहे असें तो पाहात असतो. असे भक्त आजलाही जिवंत आहेत. असे भक्त असल्यावांचून जग चालावयाचेंच नाहीं. अशा भक्तांना सर्प चावला तर आपल्या प्रेममय हरीचा दूत आपणास भेटला असें ते ह्मणत असतात. सर्वत्र विश्वबंधुत्वाचें नातें आहे असें ह्मणणें हें अशा भक्तांनाच शोभतें. त्यांच्या ठिकाणीं क्रोधाचा अंशही शिल्लक नसतो. द्वेष अथवा मत्सर इत्यादि विकारांच्या लाटांनीं त्यांच्या मनाच्या प्रतिक्रिया कधींही प्रगट होत नाहींत.

इंद्रियजन्य सुखाची आकांक्षा त्यांच्यापासून दूर पळून गेलेली असते. केवळ दृश्य विश्वाच्या मागें वस्तुस्थिती काय आहे याचा अनुभव ज्यांना आलेला असतो अशा प्रेमस्वरूप भक्तांना क्रोधादि विकारांची बाधा कशी होणार ?

---

## प्रकरण ३ रें.

## भक्तियोगाचा स्वाभाविकपणा आणि त्यांतील रहस्य.

भगवान् श्रीकृष्ण यांना अर्जुन विचारतो, " **एवं सततयुक्ता ये भक्तास्त्वां पर्युपासते, ये चाप्याक्षरमव्यक्तं तेषां के योगवित्तमाः।** (गीता.१२-१) अशारीतीनें जे सतत तुझें पूजन करितात ते, आणि जे तुझ्या अव्यक्त आणि अक्षर स्वरूपाचें पूजन करितात ते या दोहोंत मोठा योगी कोण ? " भगवान् श्रीकृष्ण उत्तर करितात,

**मय्यावेश्य मनो ये मां नित्ययुक्ता उपासते ॥**
**श्रद्धया परयोपेतास्ते मे युक्ततमा मताः ॥ २ ॥**
**ये त्वक्षरमनिर्देश्यमव्यक्तं पर्युपासते ।**
**सर्वत्रगमचिंत्यं च कूटस्थमचलं ध्रुवम् ॥ ३ ॥**
**संनियम्येन्द्रियग्रामं सर्वत्र समबुद्धयः ।**
**ते प्राप्नुवंति मामेव सर्वभूतहिते रताः ॥ ४ ॥**
**क्लेशोऽधिकतरस्तेषामव्यक्तासक्तचेतसाम् ।**
**अव्यक्ता हि गतिर्दुःखं देहवद्भिरवाप्यते ॥ ५ ॥**
**ये तु सर्वाणि कर्माणि मयि संन्यस्य मत्पराः ।**
**अनन्येनैव योगेन मां ध्यायंत उपासते ॥ ६ ॥**
**तेषामहं समुद्धर्ता मृत्युसंसारसागरात् ।**
**भवामि न चिरात्पार्थ मय्यावेशितचेतसाम् ॥ ७ ॥**

गीता.–अध्याय १२.

जे माझ्या ठायीं सर्वदा चित्त स्थिर करून, मोठ्या श्रद्धेनें युक्त होऊन मला भजतात, ते अत्यंत श्रेष्ठ योगी असें मी मानितों.

पण, जे इंद्रियसमुदायाचा संयम करून, सर्वत्र समान बुद्धि ठेवून, सर्व प्राण्यांच्या हितामध्यें रमलेले असे राहतात, आणि अविनाशी असें जें ब्रह्म, जें अमुक ह्मणून सांगतां येत नाहीं, जें अव्यक्त, जें सर्वत्र भरून राहिलेलें जें अचिंत्य, जें कूटस्थ ह्मणजे मायाप्रपंचामध्यें असून स्थिर, जें अचल, जें ध्रुव ह्मणजे नित्य त्याची उपासना करितात, ते देखील मलाच प्राप्त करून घेतात.

अव्यक्ताच्या ठायीं ज्यांचे चित्त असक्त झालें आहे, त्यांना क्लेश फार पडतात; कारण कीं, देहवान् प्राण्याला अव्यक्त गतीचें ज्ञान करून देणें ह्मणजे मोठ्या कष्टाचें काम आहे.

परंतु जे आपलीं सर्व कर्में मला अर्पित करून, सर्वस्वी मजवर भरिभार ठेवून, अनन्य भक्तीनें माझें ध्यान करितात, आणि माझी सेवा करितात,

त्यांचें चित्त माझ्या ठायीं बांधलेलें असतें, ह्मणून मृत्युयुक्त जो संसार-सागर त्यापासून, हे पार्था, त्यांना मी त्वरित वर उचलून घेतों.

या ठिकाणीं ज्ञानयोग आणि भक्तियोग या दोहोंचाही उल्लेख केलेला आहे. या श्लोकांत या दोहोंचीही व्याख्या स्पष्टपणें सांगितली आहे असें ह्मणावयास हरकत नाहीं. ज्ञानयोग हा फार मोठा आहे, त्यांत अत्युच्च प्रतीचें तत्त्वज्ञान भरलेलें आहे. चमत्काराची गोष्ट ही कीं, आपण ज्ञानी असून केवळ तात्त्विक मार्गानें आपणास कोणतीही गोष्ट करतां येणें शक्य आहे असें प्रत्येक मनुष्यास वाटत असतें; पण केवळ तत्त्वांस धरून या जीवितांतील मार्गाचें आक्रमण करणें ही गोष्ट अत्यंत कठीण आहे. या मार्गानें चालण्याच्या नादीं पडून पुष्कळ वेळां आपण स्वतःवर अनेक प्रकारचीं संकटें मात्र ओढवून घेण्याचा संभव असतो. या जगांत बहुधा दोन प्रकारचे लोक आढळून येतात. कित्येक राक्षसी स्वभावाचे असतात. केवळ स्वतःचें शरीर सुरक्षित राखणें, इतकाच मानवी जीविताचा अत्युच्च हेतु आहे, अशी यांची समजूत असते. दुसऱ्या प्रकारचे लोक साधु असतात. देह हा परमेश्वराकडे जाण्याचें एक साधन असून त्या साधनाच्या द्वारें जीवात्म्याला सुसंस्कृत करावयाचा असें त्यांस वाटत असतें. दुष्ट लोक स्वार्थ साधण्याकरितां वाटेल त्या प्रकारचा शास्त्रार्थही सांगत असतात, असा आपणांस नित्य अनुभव

येतो. अशा रीतीनें स्वतःच्या दुष्ट कृत्यास शास्त्रार्थांची पुष्टी ज्याप्रमाणें दुष्टास दाखवितां येते त्याचप्रमाणें चांगल्या मनुष्यास सन्मार्गांत मदत करण्यास तींच शास्त्रें तयार असतात. अशा रीतीनें तत्त्वशास्त्रांचा मार्ग दोघांसही सारखाच पोषक होतो असें आढळून येतें. ज्ञानयोगाच्या आक्रमणांत धोक्याचें स्थळ ह्मटलें ह्मणजे हेंच होय; पण भक्तियोग हा केवळ निसर्गसिद्ध आहे. तसेंच त्यांत कांहीं धडपड अथवा कष्टही नाहींत. भक्तियोगाचा मार्ग अगदीं सरळ आणि स्पष्ट आहे. ज्ञानयोग्यांप्रमाणें भक्त हा उंच भराऱ्या मारीत नाहीं. स्वतःला झेपेल इतकाच मार्ग तो हळूहळू आक्रमण करीत असतो. यामुळें ज्ञानयोग्याप्रमाणें भयंकर पतनाची धास्तीही त्याला नाहीं. जीवात्म्याचे सर्व पाश तुटल्याशिवाय त्याला मुक्ति नाहीं. कोणत्याही मार्गाचा स्वीकार आपण केला तरी पाश तुटणें ही गोष्ट अत्यंत आवश्यक आहे. ती सिद्ध झाल्याशिवाय मुक्तिलाभ नाहीं हें उघड आहे. आत्म्याला बांधणारे पापपुण्याचे पाश भक्तीच्यायोगें कसे तुटतात हें या पुढील उताऱ्यांत उत्तम रीतीनें दर्शित केलें आहे. **तच्चिंता विपुलाह्लादक्षीणपुण्या च या तथा। तदप्राप्तिमहादुःखविलीनाशेषपातका। निरुच्छ्वासतयामुक्तिं गतान्या गोपकन्यका।** परमेश्वराचें चिंतन करीत असतां गोपकन्येला होणाऱ्या आनंदातिशयामुळें तिचें पुण्य क्षीण झालें. नंतर परमेश्वराची प्राप्ति न झाल्यामुळें जें महादुःख तिला झालें, त्यायोगें तिचें पातक क्षीण झालें. अशा रीतीनें ती गोपकन्यका पापपुण्याच्या भोगांपासून मुक्त झाली. भक्तियोगांत एक अत्यंत महत्वाचें रहस्य नित्य लक्ष्यांत बाळगण्यासारखें आहे. तें हें कीं, मनुष्याच्या मनांत जे अनेक विकार, विचार आणि भावना हीं उत्पन्न होतात तीं सारीं स्वभावतः वाईट नसतात. तीं स्वभावतः आपणास कुमार्गांकडे प्रवृत्त करतात असें नाहीं. फक्त त्यांचें चांगलें नियमन करून अधिकाधिक उच्च दिशेकडे त्यांचा रोंख वळविणें हेंच आपलें कर्तव्य आहे. अशा रीतीनें या विकारांची योजना योग्य दिशेकडे केली तर तेच आपणास संस्कृतीच्या अत्युच्च दशेस पोंहोंचवितील. मानवी जीविताचा अत्युच्च हेतु ह्मटला ह्मणजे परमेश्वराकडे जाणें हा होय. याहून दुसरा कोणताही हेतु खालच्या पायरीचा आहे. सुख आणि दुःख या भावना चक्राकार परिभ्रमणासारख्या आपल्या चित्तांत वारंवार जात येत असतात असा आपणास

नित्य अनुभव येतो. आपणापाशीं द्रव्य नाहीं ह्मणून ज्या वेळीं एखादा मनुष्य दुःखांत निमग्न होतो किंवा दुसऱ्या एखाद्या ऐहिक वस्तूच्या मागें लागून तो कष्टी होतो, तेव्हां आपल्या भावनेला तो चुकीच्या मार्गाकडे वळवीत असतो. दुःखाच्या भावनेचाही सदुपयोग करून घेतां येण्यासारखा आहे. परमेश्वर आपणास भेटत नाहीं ह्मणून ज्याच्या हृदयाला दुःखानें पीळ पडतो त्या मनुष्याचें तें दुःख त्याला मोक्षमार्गावर नेऊन सोडील. एक मूठभर नाणें हातांत आलें ह्मणजे आनंदानें तुह्मी बेहोष झालां, तर आनंदाच्या भावनेचा तुह्मी दुरुपयोग केला असें होतें. ही आनंदाची भावनासुद्धां अधिक उच्च दिशेकडे वळविली पाहिजे. आपल्या अत्युच्च ध्येयांकडे ती आपणास घेऊन जाईल, अशा दिशेनें तिची योजना आपण केली पाहिजे. अशा प्रकारचें अत्युच्च साध्य साधणें, हाच आपल्या आनंदाचा अंतिम हेतु असला पाहिजे. अशाच रीतीनें आपल्या सर्व प्रकारच्या भावनांची योग्य दिशेनें योजना करणें हें आपलें कर्तव्य आहे. भक्ताच्या दृष्टीनें कोणतीही भावना त्याज्य नसते. प्रत्येक भावनेला हाताशीं धरून तिला तो मोक्षमार्गाकडे वळवितो.

---

## प्रकरण ४ थें.

## व्यक्त प्रेमाचे प्रकार.

प्रेम व्यक्त होऊं लागलें ह्मणजे त्यांत अनेक प्रकार दृष्टोत्पत्तीस येतात. पूज्यबुद्धि हा प्रेमाचाच एक प्रकार होय. देवळें आणि इतर पवित्र स्थळें यांजबद्दल लोक पूज्यभाव कां दाखवितात? याचें कारण इतकेंच कीं, या जागीं परमेश्वराचें पूजन होत असतें, अशी भावना त्यांच्या चित्तांत उत्पन्न होते. अशा स्थलांच्या दर्शनाबरोबर तेथें परमेश्वराचें सान्निध्य आहे अशी भावना प्रेक्षकाच्या मनांत तावडतोब येऊं लागते. धर्मगुरूंबद्दल सर्व प्रकारच्या लोकांच्या मनांत पूज्यभाव उत्पन्न होतो, याचें कारण काय? असें होणें ही गोष्ट मानवी अंतःकरणाला स्वाभाविकच आहे; कारण, धर्मगुरु हे परमेश्वरविषयक ज्ञान देत असतात. मनुष्याच्या अंतःकरणाच्या खोल भागांत

जें प्रेम असतें, तें पूज्यबुद्धीच्या रूपानें प्रकट होतें. ज्यावर आपलें प्रेम नाहीं अशा कोणत्याही मनुष्यासंबंधीं आपणास पूज्यभाव वाटणें शक्य नाहीं. प्रीति हा प्रेमाचाच दुसरा एक प्रकार आहे. इंद्रियजन्य सुखें ज्या पदार्थांपासून प्राप्त होतात त्यांच्यामागें मनुष्यें किती आसक्तीनें लागलेलीं असतात? त्यांच्या इंद्रियांना आवडणाऱ्या वस्तूंवर त्यांचें इतकें प्रेम असतें कीं, ती वस्तु प्राप्त करून घेण्याकरितां तीं जगाच्या दुसऱ्या टोंकापर्यंत धांवत जातील. अथवा कसल्याही धोक्याच्या जागेंत निःशंकपणें उडी घालतील. भक्तालाही अशाच प्रकारचें प्रेम असलें पाहिजे. मात्र तें प्रेम परमेश्वराकरितां पाहिजे. यानंतर प्रेमाचा आणखी एक प्रकार आहे. याला अत्यंत मधुर दुःख असेंही ह्मणतां येईल. हें प्रेम विरह या नांवानें ओळखलें जातें. परमेश्वराची भेट होत नाहीं म्हणून त्याच्या विरहामुळें जें अत्यंत दुःख होतें, तें दुःखसुद्धां अत्यंत मधुर असतें. परमेश्वराची भेट झाली नाहीं ह्मणजे भक्ताला अत्यंत दुःख होतें. त्याला कोणत्याही गोष्टीची गोडी लागत नाहीं. तो जवळ जवळ वेडा होण्याच्या बेतांत येतो. याला विरह असें ह्मणतात. परमेश्वराव्यतिरिक्त अन्य कोणत्याही वस्तूच्या दर्शनानें विरहीभक्ताचा समतोलपणा बिघडून जातो. लौकिक प्रेमांतसुद्धां अशा प्रकारची विरहावस्था आपणास नेहमीं आढळून येते. एखादा पुरुष एखाद्या स्त्रीवर अत्यंत आषक्त झाला असला, अथवा एखादी स्त्री एखाद्या पुरुषावर अत्यंत प्रेम करीत असली तर आपल्या प्रेमाच्या विषयाशिवाय इतरांचें दर्शन त्यांना असह्य होतें. अशाच रीतीनें पराभक्तीचा उद्रेक मनांत झाला ह्मणजे परमेश्वराव्यतिरिक्त दुसऱ्या कोणत्याही वस्तूचा संपर्क त्या मनाला सहन होत नाहीं. फार काय? पण परमेश्वरविषयक भाषणाशिवाय दुसऱ्या कोणत्याही विषयाची चर्चासुद्धां अशा मनाला खपत नाहीं. फक्त त्याचेंच चिंतन करावें, फक्त त्याजविषयींच बोलावें आणि इतर सर्व शब्दांचा सर्वथा त्याग करावा इतकीच इच्छा या भक्ताला असते. जे कोणी परमेश्वरविषयक गोष्टी सांगतील तेच आपले मित्र होत असें त्यास वाटतें. उलटपक्षीं अन्य विषय बोलणारे लोक त्याला शत्रूसारखे दिसतात. याहूनही अधिक उच्च असा आणखी एक प्रेमाचा प्रकार आहे. या प्रकारांत मनुष्यदेह आणि त्याच्या आनुषंगिक संसार हीं सुद्धां गोड वाटूं लागतात. कारण, यांजमुळें परमेश्वराचें प्रेम संपादन करतां येतें असें भक्तास वाटतें. या देहांत असें प्रेम

करतां येतें ह्मणून त्याची जोपासना केली पाहिजे असें भक्ताला वाटतें. या देहांत असें चिंतन करतां येत नसेल, तर त्यांत क्षणभरही राहण्याची इच्छा भक्त करणार नाहीं. भक्तियोगानें मनुष्य उच्चतम स्थितीस गेला ह्मणजे त्याला तदीयता प्राप्त होते. तदीयता ह्मणजे ईश्वरपण. तो ईश्वरासन्निध गेला, त्याजवर ईश्वराची कृपा झाली ह्मणजे सर्व सृष्टी जणूकाय एकदम बदलून जाऊन अत्यंत पवित्र झाली आहे असें त्याला वाटतें. मानवी जीविताची जी इतिकर्तव्यता, ती आपण साधली असें त्याला वाटतें. अशा स्थितींतही भक्त आपला देहबंध कायम राखीत असतो. हेतु इतकाच कीं, परमेश्वराची उपासना करतां यावी. अशा उपासनेपासून होणारें सुख त्यांना इतकें प्रिय असतें कीं, त्याचा त्याग करण्यास ते कधींही तयार होणार नाहींत. हरीच्या भक्तीचें प्रेम इतकें वेड लावणारें आहे कीं, जे सदा तृप्त झालेले असतात आणि ज्यांच्या हृदयग्रंथी तुटून गेलेल्या असतात, असे भक्तही केवळ त्या भक्तीच्या सुखासाठीं हरीवर प्रेम करतात. ज्या देवाला मुमुक्षु आणि ब्रह्मवादी नमन करितात, त्याच हरीवर भक्ताचें अत्यंत प्रेम जडलेलें असतें. प्रेमाचें सामर्थ्य या प्रकारचें आहे. जो स्वत्त्व विसरला असेल आणि अमुक वस्तु माझी अशी भावनाही ज्याच्या ठिकाणीं उद्भवत नसेल त्यालाच अशी तदीयता प्राप्त होत असते. सर्व सृष्टि हरीची असल्यामुळें तिच्यांतील प्रत्येक वस्तु अशा भक्ताच्या दृष्टीनें पूजनीय असते. केवळ लौकिक प्रेमासंबंधीं पाहिलें तरी सुद्धां हाच प्रकार आपणास आढळून येतो. ज्यावर आपली प्रीति असेल अशा मनुष्याची एखादी आवडती वस्तु आपणासही आवडूं लागते. अशा मनुष्याचा एखादा फाटका तुटका कपडाही आपल्या मनःपूर्वक प्रेमाचा विषय होऊं शकतो. अशाच रीतीनें ज्या भक्ताचें निस्सीम प्रेम परमेश्वराच्या ध्यानीं जडलें असेल त्याला सारें विश्व आपल्याच घरासारखें वाटूं लागतें; कारण तें परमेश्वराचेंच आहे असें तो पहात असतो.

---

## प्रकरण ५ वें.

## विश्वव्यापी प्रेम आणि त्याद्वारें सिद्ध होणारें स्वात्मार्पण.

समष्टीवर आपलें प्रेम जडल्यावांचून आपणास व्यष्टीवर प्रेम कसें करतां येईल? परमेश्वर समष्टिरूप आहे. सर्व विश्वाचें एकवटलेलें जें स्वरूप तें परमेश्वर. हाच परमेश्वर आपणांस प्रकट झालेल्या विश्वांत निरनिराळ्या वस्तूंच्या ह्मणजे व्यष्टींच्या रूपानें प्रतीत होतो. या समष्टिरूप परमेश्वराची भक्ति करणें हाच सर्व विश्वावर एकसमयावच्छेदेंकरून प्रेम करण्याचा मार्ग आहे. लक्षावधि व्यष्टि मिळून ही एक विश्वरूप समष्टि बनली आहे. एखाद्या विशिष्ट पायरीवरच थांबून राहण्याकडे आमच्या आर्यतत्त्वज्ञांच्या मनाचा कल नाहीं. विशिष्ट सिद्धांताचें केवळ वरवर अवलोकन करून त्यावरून विश्वव्यापि सामान्य सिद्धांताकडे उडी मारण्याचा त्यांच्या मनाचा प्रथमपासूनच कल आहे. अनेक विशेष सिद्धांत ज्या एका सामान्य सिद्धांताच्या पोटीं येतील, असा एकच सिद्धांत शोधण्याकडे त्यांची प्रथमपासून प्रवृत्ति झालेली आहे. हिंदूंचें सारें तत्त्वज्ञान आणि सर्व सनातन धर्म या एका विश्वव्यापी सिद्धांताच्या शोधामागें लागला आहे. जें एक जाणलें असतां सर्व कांहीं जाणलें जातें, त्या एकाचें ज्ञान प्राप्त करून घेण्याकरितां ज्ञानी धडपडत असतो. ज्या एकाची भक्ति केली असतां विश्वव्यापी प्रेमाची प्राप्ति होते, त्या एकाला शोधण्याकरितां भक्त धडपडत असतो. या विश्वांत ज्या निरनिराळ्या शक्ति प्रतीत होत आहेत, त्या सर्वांचें नियमन करणारी एकच शक्ति प्राप्त करून घेण्याची योग्याची इच्छा असते. अत्यंत प्राचीन कालापासून आर्यांचें मन या एकाच शोधाकडे विशेषत: लागलेलें आहे. त्यांचीं आधिभौतिक शास्त्रें, त्यांचें मानसशास्त्र, त्यांची भक्ति आणि त्यांचें तत्त्वज्ञान हीं व्यक्तिश: या एकाचाच शोध करीत आहेत. विश्वव्यापी प्रेमाची प्राप्ति करून घ्यावी, हे भक्ताचें अंतिम साध्य असतें. प्रत्येक व्यक्तीवर प्रेम करावयाचें ह्मटलें तर एकेकावर भक्ति करतां करतां विश्वव्यापी प्रेम प्राप्त करून घेण्यास अनंत जन्म खर्ची घालावे लागतील. अशा रीतीनें जेव्हां विश्वव्यापी प्रेमाची प्राप्ति होईल, तेव्हां या विश्वव्यापी प्रेमांत एका परमेश्वराचाच वास आहे

असें भक्तास आढळून येईल. विश्वांतील अनंत वस्तूंवरचें प्रेम ह्मणजे एका परमेश्वरावरचेंच प्रेम असा अनुभव त्यास येईल. बद्ध, मुमुक्षु किंवा मुक्त या सर्वांची धडपड त्याच एका केंद्राकडे चालू आहे, ही मुद्याची गोष्ट ज्या दिवशीं आपणांस पटेल, त्याच दिवशीं विश्वव्यापी प्रेमाची गुरुकिल्ली आपल्या हातीं येईल. परमेश्वर हा सर्व वस्तूंचें समवायीरूप ह्मणजे समष्टिरूप असून व्यक्त झालेलें विश्व ह्मणजे व्यष्टिरूप परमेश्वरच आहे. समष्टीचें प्रेम आपणास प्राप्त झालें, तर साऱ्या व्यष्टीचें प्रेम निराळें शोधण्याचें कारण आपणास नाहीं. हें समष्टिरूप प्रेम आपणास प्राप्त झालें ह्मणजे जगावर प्रेम करणें व त्याच्या हितासाठीं खटपट करणें हीं आपणास साहजिकपणेंच प्राप्त होतील. जगाचें बरें करावें असें सामर्थ्य आपणांस आपल्या आंगीं आणा-वयाचें असेल तर परमेश्वरावरचें प्रेम आपण प्रथम संपादन केलें पाहिजे. तें प्राप्त झाल्याशिवाय जगाचें बरें करण्यास धांवणें ह्मणजे जगाची थट्टा कर-णेंच होय. सर्व जग परमेश्वराचें आहे आणि मी परमेश्वराचा भक्त आहें, अशी भक्ताची नित्य भावना असते. ज्याअर्थी सर्व विश्व परमेश्वराचेंच आहे त्याअर्थी त्यांतील प्रत्येक वस्तु पवित्र आहे अशी भक्ताची भावना होते. सर्व मनुष्यें हीं त्याचींच मुलें आणि त्याचींच स्वरूपें होत, अशी भावना पक्की झाल्यावर त्यापैकीं कोणा एकासही दुःख देणें हें भक्ताच्या हातून घडेल तरी कसें ? समष्टिरूप परमेश्वरावर अत्यंत प्रेम करणारा भक्त त्याच्याच व्यष्टि-रूपावर प्रेम करणार नाहीं हें शक्य आहे काय ? परमेश्वराचें प्रेम आप-णांस प्राप्त झालें ह्मणजे विश्वांतील वस्तुमात्रावरचें प्रेम आपणास अवश्य प्राप्त होईल. आपण जों जों परमेश्वरासन्निध जाऊं तों तों वस्तुमात्रांत तो भरून राहिला आहे, असें आपणांस दिसूं लागेल. परमेश्वराची भक्ति प्राप्त करून घेतल्यावर प्रत्येक वस्तूंत तोच आहे, असा अनुभव भक्तास येऊं लागतो. अशा रीतीनें भक्ताचें अंतःकरण ह्मणजे प्रेमाचा चिरंतन झराच होऊन बसतें. या भक्तीच्या मार्गानें आपण जों जों वर जावें, तों तों जगांतील निरनिराळे भेद आपल्या दृष्टीनें मावळूं लागतात. अशा स्थितींत मनुष्य आपणास केवळ मानवरूप दिसत नसून तो आपणास परमेश्वरस्वरूप दिसूं लागतो. एखादें जनावर हें जनावर नसून त्या विशिष्ट आकृतीनें परमेश्वरच अवतरला आहे, असें आपणांस दिसूं लागतें. एखादा वाघ ह्मणजे क्रूर जना-

वर नसून परमेश्वरानेंच वाघाचें सोंग घेतलें आहे असा अनुभव आपणांस येतो. भक्तीच्या या अत्युच्च दशेंत या विश्वांतील वस्तुमात्राची उपासना भक्ताच्या हातून घडत असते. **एवं सर्वेषु भूतेषु भक्तिरव्यभिचारिणी । कर्तव्या पंडितैर्ज्ञात्वा सर्व भूतमयं हरिम्** ॥ हरि सर्व भूतमय आहे हें जाणून पंडितांनीं सर्व भूतांची अव्यभिचारी भक्ति करावी. अशा प्रकारची विश्वव्यापी भक्ति प्राप्त झाली ह्मणजे तिच्यांतून वैराग्य निसर्गतःच उद्भवतें. कोणतीही गोष्ट घडली तरी ती आपणास प्रतिकूल आहे असें आपणांस वाटत नाहीं. अशा स्थितीला पोंचलेल्या भक्ताला एखादें मोठें दुःख प्राप्त झालें, तर तो ह्मणतो, " मित्रा, दुःखा, ये; मी तुझें स्वागत करितों ! " एखादी मोठी आपत्ति प्राप्त झाली, तर भक्त ह्मणतो, ही ज्या अर्थी परमेश्वराकडून आली आहे, त्या अर्थी हिचें स्वागत असो. एखादा सर्प समोर आला तर त्याचेंही स्वागत भक्त करतो. मृत्यु प्राप्त झाला असतां भक्त सुहास्य वदनानें त्याला सामोरा जातो. "सर्व विश्व ज्याअर्थी मजकडे धांव घेत आहे त्या अर्थी मी धन्य आहें, " असें भक्त ह्मणतो. अशा रीतीनें परमेश्वराची भक्ति करतां करतां भक्ताला पूर्ण वैराग्य प्राप्त झालें ह्मणजे स्वतःच्या संबंधानें सुख आणि दुःख यांतील भेद तो विसरून जातो. दुःख किंवा आपत्ति यांजविरुद्ध तक्रार काय करावी हेंच त्याला समजत नाहींसें होतें. त्यानें आपलें सर्वस्व परमेश्वराच्या हवालीं केलेलें असतें. अशी स्थिति प्राप्त करून घेण्याहून अधिक उच्च आणि अधिक शौर्याचें असें कोणतें कृत्य असणार आहे ?

मनुष्यजातीपैकीं बहुतेकांना शरीर हेंच आपलें सुखसर्वस्व आहे असें वाटत असतें. या एकाच देहांत सारें विश्व सांठविलें आहे, असें त्यांना वाटतें. शारीरिक सुख संपादन करणें हीच आपल्या जन्माची इतिकर्तव्यता, असा त्यांचा समज असतो. शरीरसुखाच्या मागें लावणारी ही आसुरी प्रवृत्ति आपणा सर्वांचा गळा धरून बसलेली आहे. आपण केवढींही लंबीं चवडीं भाषणें केलीं आणि कितीही उंच भराऱ्या मारल्या, तथापि आपली योग्यता वस्तुतः गिधाडाहून अधिक नाहीं. एखादें गिधाड आकाशापर्यंत उंच उडालें असतांही, ज्याप्रमाणें जमिनीवरच्या सडक्या ढोराचा शोध करीत असतें, त्याचप्रमाणें आपण मोठीं तात्त्विक भाषणें करीत असतांही आपलें मन शारीरिक सुखाकडे लागलेलें असतें. एखादा वाघ समोर आला तर

आपण आपल्या शरिराचें रक्षण कां करावें? आपलें हें शरीर आपण त्याला कां देऊं नये? अशाप्रकारें शरीर परक्याच्या संतोषार्थ अर्पण करणें हीसुद्धां एक प्रकारची भक्तीच आहे. हा स्वात्मार्पणाचाच एक भाग आहे. अशा रीतीनें स्वत:बद्दलचा विचार जींत सर्वस्वी नाश पावतो अशी स्थिति प्राप्त करून घेणें आपणास शक्य आहे काय? भक्तिमार्गांतील हें शिखर इतकें उंच आहे कीं, त्याकडे नुसतें पाहूनच आपणास घेरी येते. त्याजवर पोंचलेले असे वीर पुरुष या जगांत फारच थोडे सांपडतील. परंतु या शिखरांवर पोंचल्यावांचून भक्त पूर्ण दशा पावत नाहीं. मोठया खटपटीनें आपण आपलीं शरिरें थोडे अथवा फार दिवस सुखानें सांभाळूं शकूं; पण अखेरीस तीं नष्ट होण्याचा वेळ येणारच. निरंतर टिकणारा असा अंश त्यांच्या ठिकाणीं नाहीं. याकरितां पर-सेवेसाठीं ज्यांचे देह झिजून नष्ट होतात, ते भक्त धन्य होत. आपली सर्व संपत्ति आणि आपलें प्रत्यक्ष जीवितही साधुपुरुष पर-सेवेसाठीं अर्पण करितात. ज्या अर्थी मृत्यु हा केव्हां ना केव्हां तरी येणारच, त्या अर्थी जीविताचा व्यय एखाद्या वाईट कामीं होण्यापेक्षां तो सत्कार्यार्थ खर्च झाला तर अधिक चांगलें असें साधूंस वाटतें. शेंपन्नास वर्षें आपण ही जीवितयात्रा कशी-बशी चालून गेलों तरी अखेरीस काय? अनेक पदार्थांच्या समवायानें ज्याची घटना झाली आहे, त्या शरीरांत विघटनेचें कार्य सुरू होऊन तें नष्ट व्हावें, हीच आपली अखेर आहे. आपण कितीही खटपट केली तरी ही विघट-नेची वेळ केव्हां ना केव्हां येणारच. येशू ख्रिस्त, बुद्ध आणि महंमद हे सर्व याच मार्गानें गेले. जगांतील मोठे गुरु आणि मोठे भविष्यवादि हेसुद्धां असेच नष्ट झाले आहेत. या क्षणभंगुर जगांत सर्वत्र मोडतोड चालू असल्याचें ज्याअर्थी आपल्या नित्य प्रत्ययास येतें, त्याअर्थी जो कांहीं वेळ आपणास मिळाला आहे त्याचा शक्य तितका उत्कृष्ट उपयोग आपण करून घ्यावा असें भक्तास वाटत असतें. सर्व जीवांच्या सुखासाठीं आपलें जीवित अर्पण करणें हाच मानवी जीविताचा अत्युत्कृष्ट उपयोग आहे.

या देहाच्या प्रतिपालनांतच आपलें सुखसर्वस्व सांठविलें आहे, अशी जी आपली भयंकर समजूत आहे, तीमुळेंच स्वार्थाचें साम्राज्य साऱ्या जग-भर पसरलें आहे. आपणाभोंवतालची सारी सृष्टि जशी क्षणभंगुर आहे, त्याप्रमाणेंच आपला देहही क्षणभंगुर असल्यामुळें आपणास मिळेल, तित-

क्या वेळाचा उत्तम उपयोग करून घेणें हेंच आपलें कर्तव्य आहे असें भक्तास वाटत असतें. या शरिराचें संरक्षण करणें आणि त्याला संतुष्ट राखण्याकरितां वाटेल तो यत्न करणें, या भयंकर भ्रमानें आपण वेडावून गेलों आहों. मी ह्मणजे हें शरीर नव्हे, अशी एकवार आपली पक्की खात्री पटली तर लढाईचें अथवा कोणाशीं तंटाभांडण करण्याचें कारण आपणास उरणार नाहीं. ज्या क्षणीं अशी आपली खात्री पटेल, त्याच क्षणीं स्वार्थाच्या सर्व कल्पना आपल्या चित्तांतून निघून जातील. भक्ताची अशी खात्री पटली असल्यामुळें या सर्व लौकिक वस्तूंपासून तो पराङ्मुख होतो; आणि अशा रीतीनें त्याचें स्वात्मार्पण आपोआपच सिद्ध होतें. जग कसेंही चालो अथवा कसलीही आपत्ति येवो, भक्ताच्या चित्ताला कोणत्याही स्थितीपासून उद्वेग प्राप्त होत नाहीं. ' परमेश्वरा, तुझी मर्जी!' असें भक्त नित्य ह्मणत असतो. यांतील मर्म हेंच आहे. कोणाशींही कोणत्याही कारणानें भक्त तंटा करूं इच्छित नाहीं. आपलें सारें दौर्बल्य आणि लौकिक इच्छा या त्यानें परमेश्वरास अर्पण केलेल्या असतात. कित्येक वेळां आपल्या स्वार्थी कल्पनांतूनही जगाचें कांहीं बरें होत असतें; पण हें ईश्वराचें पाहाणें आहे. स्वतःच्या इच्छेनें प्रेरित होऊन कोणतेंही कार्य करणें हें भक्ताचें कर्तव्य नव्हे. "परमेश्वरा, दुसरे लोक तुझ्या नांवानें मोठमोठीं देवळें बांधीत आहेत; तुझ्या नांवानें ते मोठमोठा दानधर्म करीत आहेत; पण मी दरिद्री आहें. तुला देण्यासारखें मजजवळ कांहीं नाहीं. याकरितां हें माझें शरीर मी तुला सर्वस्वी अर्पण करितों." अशी प्रार्थना भक्ताच्या अंतःकरणाच्या खोल भागांतून बाहेर पडत असते. अशा प्रकारचा अनुभव ज्याला प्राप्त झालेला आहे, त्याचें स्वात्मार्पण जगांतील सर्व संपत्तीहून, सर्व कीर्तीहून आणि सुखसाधनांच्या सर्व प्रकारांहून अधिक श्रेष्ठ आहे. परमेश्वराच्या चरणीं आपलें सर्वस्व अर्पण ज्या भक्तानें केलें आहे, त्याच्या चित्ताला जी शांति प्राप्त होते, तिची नुस्ती कल्पनाही आपणास करवणार नाहीं. मग तिची किंमत आपणास करतां येणें शक्य नाहीं हें सांगावयास नकोच. त्याला पूर्ण अप्रातिकुल्य प्राप्त झालेलें असतें. अशा स्थितींत स्वतःची अशी कोणतीही इच्छा त्याच्या ठिकाणीं उरलेली नसते. अशा प्रकारच्या उदात्त स्थितींत त्याच्या अंतःकरणांतून लोभाचें समूळ उच्चाटन झालेलें असतें.

परमेश्वरावर प्रेम करावें, एवढाच लोभाचा अंश त्याच्या ठिकाणीं असतो; पण या लोभामुळें तो बद्ध होत नसून हा लोभ त्याच्या मुक्तीला मात्र कारण होतो.

---

## प्रकरण ६ वें.

## पराविद्या आणि पराभक्ति हीं भक्ताच्या दृष्टीनें एकच आहेत.

उपनिषदांनीं ज्ञानांत दोन भेद कल्पिले आहेत. या दोहोंला त्यांनीं पराविद्या आणि अपराविद्या अशीं नांवें दिलीं आहेत. वास्तविक पाहतां खऱ्या भक्ताच्या दृष्टीनें पराभक्ति आणि पराविद्या यांत कांहीं भेद नाहीं. **द्वे विद्ये वेदितव्ये इति ह स्म यद्ब्रह्मविदोवदन्ति । पराचैवापराच ॥ तत्रापरा ऋग्वेदोयजुर्वेदः सामवेदोऽथर्ववेदः शिक्षाकल्पोव्याकरणम् निरुक्तम् छंदो ज्योतिषमिति । अथ परा यया तदक्षरमधिगम्यते ॥** " दोन प्रकारच्या विद्या जाणण्यायोग्या आहेत, असें ब्रह्मवेत्ते सांगतात. एक पराविद्या आणि दुसरी अपराविद्या. यांपैकीं ऋग्वेद, यजुर्वेद, सोमवद, अथर्ववेद, शिक्षा, कल्प, व्याकरण, निरुक्त, छंद आणि ज्योतिष इतक्यांचा समावेश अपराविद्येंत होतो. याहून श्रेष्ठ अथवा पराविद्येंत अक्षराच्या ज्ञानाचा समावश होतो. अक्षर ह्मणजे जें दिक्कालादि परिस्थितीनें बदलत नाहीं अथवा भेद पावत नाहीं तें, " असें मुंडकोपनिषदांत ह्मटलें आहे. अशा रीतीनें ब्रह्मज्ञान हेंच श्रेष्ठ प्रतीचें ज्ञान आहे असें येथें स्पष्टपणें दर्शित केलें आहे. " एका भांडयांतील तेल दुसऱ्या भांड्यांत ओतलें जात असतां, ज्याप्रमाणें त्याची धार थंड असते, त्याच प्रमाणें मन ज्या वेळीं परमेश्वराच्या चिंतनांत अखंड निमग्न होतें, त्या वेळीं पराभक्ति सिद्ध होते. असें पराभक्तीचें लक्षण देवीभागवतांत सांगितलें आहे. जींत कोणत्याही प्रकारचा व्यत्यय येत नाहीं आणि जींत भक्ताचें अंतःकरण परमेश्वरापासून केव्हांही दूर होत नाहीं, ती परमेश्वराची अत्यंत उच्च भक्ति होय. परमेश्वरावरील मानवी प्रेमाचें दुसरें कोणतेंही स्वरूप याहून अधिक उच्च असूं शकणार नाहीं. याहून भक्तीचे जे अन्य प्रकार आहेत, ते खालच्या पायरीचे असून अशा प्रकारची परा-

भक्ति सिद्ध करण्याकरितां या मार्गांचा फक्त साधनांसारखा उपयोग होतो. परमेश्वराच्या ठिकाणीं मन पूर्णपणें जडलें म्हणजे पराभक्ति सिद्ध होते. एक वेळ ही पराभक्तीची स्थिति भक्ताला साध्य झाली म्हणजे त्याच्या चित्तांत परमेश्वरावांचून दुसऱ्या कोणत्याही विचाराला जागा उरत नाहीं. परमेश्वरावांचून दुसऱ्या कोणत्याही वस्तूचें चिंतन तो कधींही करणार नाहीं. त्याचें चित्त इतकें पवित्र बनतें कीं, तें दुसऱ्या कोणत्याही वस्तूच्या संपर्कानें मलीन होत नाहीं. अशा स्थितींत त्याच्या जीवात्म्याला बद्ध करणारे मनाचे आणि इतर जड वस्तूंचे पाश गळून पडतात आणि तो मुक्त होतो. स्वतःच्या अंतःकरणांतच परमेश्वराची उपासना करणें, ही गोष्ट अशा प्रतीच्या भक्ताला मात्र शक्य असते. त्याला प्रतिमा, ग्रंथ, मतें आणि मतांतरें यांपैकीं कशाचीही जरूर नसते. कारण, यांपैकीं कोणत्याही वस्तूचा त्याला उपयोग होण्याजोगाच नसतो. अशा प्रकारची पराभक्ति सिद्ध करणें ही सोपी गोष्ट नव्हे. ज्या ठिकाणाहून प्रेमाचा मोबदला आपणास मिळतो, त्याच ठिकाणीं मानवी मन बहुधा प्रेम करितें. असा सामान्य नियम असतांही क्वचित् प्रसंगीं याच्या उलट उदाहरण आपणांस आढळून येतें. एखादा मनुष्य मोबदल्याची अपेक्षा नसतांही एखाद्या वस्तूला आपलें अंतःकरण अर्पण करतांना आपणास आढळतो. आपल्या विषयाच्या स्पष्टीकरणार्थ अशा प्रकारचीं उदाहरणें आपणास उपयोगीं पडतील. दिव्याच्या ठिकाणीं दिसून येणारें पतंगाचें प्रेम अशाच प्रकारचें आहे. उलट कसलीही अपेक्षा नसतां पतंग दिव्याच्या ज्योतीला मिठी मारून भस्मीभूत होतो. निरपेक्ष प्रेम या प्रकारचें असतें. प्रेम करणें हा अशा ठिकाणीं स्वभावच होऊन बसलेला असतो. केवळ स्वाभाविकपणेंच—कोणत्याही स्वार्थी हेतूनें प्रेरित न होतां—प्रेम करणें ही प्रेमाची अत्युच्च दशा होय. याहून प्रेमाची अधिक परिपक्व स्थिती या जगांत आपल्या निदर्शनास येणार नाहीं. अशा प्रकारचें प्रेम परमेश्वराच्या ठिकाणीं जडलें म्हणजे त्याचें रूपांतर अखेरीस पराभक्तींत होतें.

---

## प्रकरण ७ वें.

## भक्तीचा त्रिकोण.

भक्ति ही त्रिकोणाकृति आहे, असेंही आपणास ह्मणतां येईल. या तीन कोनांपैकीं प्रत्येकाला कांहीं असे विशिष्ट धर्म आहेत कीं, ते त्या कोनापासून वेगळे करतां येणार नाहींत. प्रत्येक त्रिकोणांत तीन कोन असतात. तीन कोण असल्याशिवाय त्रिकोण होणें शक्यच नाहीं. ज्या भक्तींत पुढील त्रिविध धर्म नाहींत ती खरी भक्तीच होऊं शकणार नाहीं. पहिला धर्म हा कीं, भक्तींत वाणिज्यवृत्ति असतां उपयोगी नाहीं. तींत ‘ दे वाण घे वाण ’ हा प्रकार असूं नये. ज्या भक्तींत कोणत्याही प्रकारच्या प्रतिफलाची अपेक्षा असेल ती खरी भक्तीच नव्हे. पैसा देऊन जिन्नस विकत घेण्यासारखा तो वाणिज्यवृत्तीचा प्रकार होय. परमेश्वराची भक्ति करून तिच्या मोबदल्यांत त्याजकडून कोणत्यातरी प्रकारच्या कृपेची अपेक्षा जोंपर्यंत आपल्या अंत:करणांत असेल, तोंपर्यंत खऱ्या भक्तीची वाढ तेथें होऊं शकणार नाहीं. परमेश्वराच्या कृपेसाठीं जे कोणी त्याची भक्ति करीत असतील, असे लोक तशी कृपा न झाल्यास त्याची भक्ति करणार नाहींत. खरा भक्त केवळ भक्तीसाठींच परमेश्वरावर प्रेम करीत असतो. खऱ्या भक्ताच्या अंत:करणांतील या प्रेमाच्या भावनेचा उगम कोणत्याही प्रकारच्या इच्छेपासून झालेला नसतो.

एके वेळीं एक राजा एका अरण्यांत गेला; आणि तेथें एका ऋषिवर्यांशीं त्याची भेट झाली. ऋषीशीं राजाचें कांहीं वेळ संभाषण झालें. तेव्हां त्याचें ज्ञान आणि पावित्र्य यांजमुळें राजाचें अंतःकरण फार सुप्रसन्न झालें. ऋषीला कांहीं तरी भेट द्यावी अशी इच्छा राजाच्या मनांत उत्पन्न झाली. तेव्हां ऋषि ह्मणाला, “ अरण्यांत प्राप्त होणारीं कंदमुळें माझ्या निर्वाहास पुरेशीं आहेत. पर्वतांतून वाहणारे पाण्याचे झरे माझी तृषा शमन करण्यास समर्थ आहेत. झाडांच्या साली माझें शरीर झांकतात आणि पर्वताच्या गुहा घरासारख्या माझ्या उपयोगीं पडतात. हे राजा, अशा स्थितींत मी कोणापासून कोणतीही जिन्नस कां घ्यावी ? ” राजा ह्मणाला, “ महाराज, माझ्यावर अनुग्रह

करण्याकरितां माझ्या हातून कांहीं तरी दान आपण घ्यावें. शहरांत येऊन माझ्या वाड्यांत मजसन्निध आपण वास करावा अशी माझी मनःपूर्वक इच्छा आहे." अशा रीतीनें राजानें बराच वेळ त्या ऋषीची विनवणी केल्यानंतर त्या ऋषीनें राजाच्या वचनाला मान दिला आणि तो त्याजबरोबर राजवाड्यांत गेला. ऋषीला दान देण्यापूर्वी राजानें पुढील मंत्र म्हटला, " परमेश्वरा, मला अधिक संतती प्राप्त होवो; मला अधिक संपत्ति मिळो, माझी राज्यवृद्धि होवो, माझें शरीर सुखी असो. " अशा रीतीनें तो अनेक प्रकारच्या मागण्या मागत होता. राजाची ही प्रार्थना संपण्याच्या अगोदरच तो ऋषि तेथून उठला आणि त्या खोलीच्या बाहेर चालता झाला. हें पाहून राजाचें मन गोंधळलें. तो ऋषीच्या मागें धांवत गेला आणि मोठ्यानें ओरडून ह्मणाला, " महाराज, आपण कां जातां ? आपण माझें दान कां घेत नाहीं ? " ऋषीनें उत्तर दिलें, " राजा, भिकाऱ्यापासून कोणतेंही दान मी घेत नसतों; अरे, तूं तर स्वतःच पुरा भिकारी दिसतोस, मग तूं मला दान कशाचें करणार ? तुझ्यासारख्या भिकाऱ्यापासून दान घेण्याची नुसती कल्पना करणें हेंसुद्धां मूर्खपणाचें आहे. जा, माझ्या मागें येऊं नकोस. "

वरील गोष्टींत ईश्वराचे खरे भक्त आणि भिकारी भक्त यांतील फरक स्पष्टपणें दाखविलेला आहे. याचनेची भाषा ही खऱ्या प्रेमाची भाषाच नव्हे. " **नलगे मुक्ति धन संपदा** " असेंच खरे भक्त ह्मणत असतात. खऱ्या भक्ताला मुक्तीची सुद्धां इच्छा नसते. मग बाकीच्या वस्तूंची अपेक्षा नसते हें सांगावयास नकोच. खऱ्या प्रेमाला कोणत्याही प्रकारच्या प्रतिफलाची अपेक्षा नसते. खऱ्या प्रेमाचा हेतु प्रेम हाच. खऱ्या भक्ताच्या चित्तांत भक्तीचा जिवंत झरा असतो. यामुळें तो केवळ स्वाभाविकपणेंच वाहातो. एकादा सुंदर देखावा आपणास दिसला ह्मणजे त्या क्षणींच जो आनंदाचा उमाळा आपल्या चित्तांत उद्भवतो, त्यामुळेंच त्या देखाव्यावर आपलें प्रेम जडतें. अशा प्रकारच्या आपल्या प्रेमांत त्या देखाव्यापासून कांहीं प्रतिफल मिळावें अशी अपेक्षा आपल्या चित्तांत नसते. त्याचप्रमाणें तो देखावाही तुमच्यापासून कसलीच अपेक्षा करीत नसतो. अशा रीतीनें परस्परांच्या चित्तांत कोणतीही अपेक्षा नसतां त्या देखाव्याच्या दर्शनाबरोबर तुमच्या चित्तांत आनंदाच्या लहरी उसळतात, अंतःकरण प्रसन्न होतें, तुमचें चित्त शांत होतें आणि त्या

क्षणापुरतें तरी तुह्मीं आपला मानवी भाव विसरतां. केवळ मनुष्यत्व सोडून तुह्मीं जणूं काय, वर जातां. या वेळचा आनंद हा खरोखर दैवी आनंद होय. भक्तीच्या तीन कोनांपैकीं हा पहिला कोन होय. भक्तीच्या मोबदल्यांत कशाचीही अपेक्षा करूं नका. आपण सदोदित दाते आहों अशी भावना धरा. आपलें सारें प्रेम परमेश्वराला द्या, पण त्याबद्दल त्याजपासून परत कोणतीही वस्तु मागूं नका.

भक्तीच्या तीन कोनांपैकीं दुसरा कोन हा कीं, भक्ति सदोदित निर्भय असते. केवळ भीतीमुळें जे परमेश्वराची उपासना करतात ते अत्यंत असंस्कृत आणि अगदीं खालच्या पायरीचे मानव होत. परमेश्वर आपणास दंड करील या भीतीनें ते त्याची भक्ति करितात. परमेश्वर हा मोठा शक्तिमान् प्राणी आहे, असा त्यांचा समज असतो. एका हातांत राजदंड आणि दुसऱ्या हातांत चाबुक असा त्यांचा कल्पनामय परमेश्वर असतो. त्याची आपण प्रार्थना न केली तर त्याच्या हातांतील चाबकाचा तडाखा आपल्या पाठीवर बसेल, अशी भीति त्यांस वाटत असते. अशा प्रकारच्या भयभीत अंतःकरणानें परमेश्वराची प्रार्थना करणें ह्मणजे स्वताला कमीपणा आणणें होय. अशा प्रकारच्या उपासनेला खरोखर उपासना हें नांवही देणें योग्य नव्हे. ही अत्यंत खालच्या दर्जाची उपासना आहे. जोंपर्यंत भीतीचा वास अंतःकरणांत असेल, तोंपर्यंत प्रेमाचा शिरकाव तेथें होईल तरी कसा? खरें परमेश्वरविषयक प्रेम अंतःकरणांत उद्भवलें ह्मणजे भीतीचा नाश आपोआपच होतो. एखादी स्त्री रस्त्यांत उभी असतां एखादा कुत्रा तिच्या आंगावर धाऊन आला तर शेजारच्या घरांत ती आश्रयासाठीं पळते. त्या वेळीं तिच्या अंतःकरणांत भीति उत्पन्न झालेली असते; पण अशी कल्पना करा कीं, तीच स्त्री दुसऱ्या दिवशीं आपल्या मुलासह रस्त्यानें जात असतां एखाद्या वाघानें तिच्या मुलावर उडी मारिली, तर अशा स्थितींत ती काय करील बरें? मुलाच्या रक्षणासाठीं ती वाघाच्या अंगावर धाऊन जाईल ह्यांत संशय नाहीं. मुलाबद्दल जें उत्कट प्रेम तिच्या अंतःकरणांत असतें तें भीतीचा पाडाव करतें. स्वार्थाची आकुंचित कल्पना हीच आपल्या सर्व भीतीचें मूळ आहे. स्वार्थाच्या कल्पनेमुळें आपण एकंदर विश्वापासून विभक्त होत असतों आणि या विभक्तपणामुळेंच भीति आपल्या अंतःकरणांत शिरते. जों जों

आपला स्वार्थ अधिक आकुंचित होत जातो, तों तों हा विभक्तपणा वाढत जातो आणि त्याबरोबरच भीतीचीही वाढ आपल्या अंतःकरणांत, होते. मी ह्मणजे कोणी क्षुद्र प्राणी आहें अशी ज्याची कल्पना त्याच्या अंतःकरणांत भीतीनें घर करावें हें अगदीं युक्त आहे. तुमची स्वतःबद्दलची कल्पना जों जों विशाल व उदात्त होत जाईल तों तों भीति तुमच्या अंतःकरणांतून पळ काढूं लागेल. जोंपर्यंत भीतीचा यत्किंचितही लेश तुमच्या अंतःकरणांत उरला असेल, तोंपर्यंत प्रेमाचा शिरकाव तेथें होणरा नाहीं. भीति आणि भक्ति हीं परस्परांचीं विरोधी आहेत. परमेश्वरावर ज्यांची खरी भक्ति असते, त्यांना परमेश्वराचें भय वाटत नाहीं. "परमेश्वराचें नांव उगीच घेऊं नका" अशी जी एक आज्ञा बायबलांत आहे, ती खऱ्या भक्ताच्या दृष्टीनें अत्यंत उपहासास्पद आहे. खऱ्या भक्ताला परमेश्वराचें नांव केव्हांही घेण्यांत पापात्मक असें काय आहे? परमेश्वराचें जों जों अधिक चिंतन तुह्मीं कराल, तों तों तें तुह्मांस अधिक हितावहच होईल. याच दृष्टीनें '**अजित नाम वदो भलत्या मिषें। सकल पातक भस्म करीतसे॥**' असें भक्त ह्मणत असतात. ज्यांचें परमेश्वराच्या ठिकाणीं खरें प्रेम जडलें असेल, तेच त्याचें अखंड चिंतन करूं शकतील.

भक्तीचा तिसरा कोन '**अनन्यता**' हा होय. भक्ति अगदीं अनन्य असली पाहिजे. ज्याची तुह्मी भक्ति करणार त्यावांचून दुसऱ्या कोणत्याही पदार्थाला अगर हेतूला तुमच्या चित्तांत थारा असूं नये. आपण ज्याची भक्ति करणार तेंच आपलें उच्चतम ध्येय आहे, अशी आपली पक्की भावना झाल्यावांचून त्या ध्येयाबद्दल खरें प्रेम आपल्या अंतःकरणांत उद्भवणार नाहीं. मानवी अंतःकरणांतील प्रेमाची दिशा पुष्कळ वेळां चुकलेली असेल अथवा ती भलत्याच ध्येयावर जडलेली असेल; पण असें असलें तरी आपलें ध्येय उच्चतम आणि सर्वोत्कृष्ट आहे, असेंच त्या भजकास वाटत असतें. एखाद्याच्या ठिकाणीं अत्यंत दुष्ट अशा प्राण्याबद्दल प्रेम उत्पन्न होईल; तर दुसऱ्यांच्या ठिकाणीं तेंच प्रेम अत्यंत उच्च ध्येयाकडे लागल्याचें आढळून येईल, पण अशा स्थितींतही आपलें ध्येय उच्च आहे, अशी भावना त्या दोघांच्याही अंतःकरणांत सारख्याच प्रमाणानें असेल. आपलें ध्येय सर्वोत्कृष्ट आहे, अशी भावना आरंभींच नसेल तर त्या ध्येयावर त्याच्या भजकाचें

प्रेमही जाणार नाहीं. प्रत्येक मनुष्याचें सर्वोत्कृष्ट ध्येय ह्मटलें ह्मणजे परमेश्वर हेंच होय. कोणी ज्ञानी असो अगर अज्ञानी असो, पापी असो अथवा पुण्यवान् असो, पुरुष असो अथवा स्त्री असो, सुशिक्षित असो अथवा अशिक्षित असो, संस्कृत असो अथवा असंस्कृत असो, सर्वांचें उच्चतम ध्येय परमेश्वर हेंच आहे. सौंदर्याची, उदात्ततेची आणि शक्तीची जी परमावधि तेंच परमेश्वराचें स्वरूप, अशी कल्पना आपल्या मनांत आहे. या कल्पनात्रयीचें जें समवायीरूप तेंच परमेश्वराचें स्वरूप असून तेंच आपलें ध्येय आहे असें आपणास वाटतें. प्रत्येक मनुष्याच्या मनांत कोणत्या ना कोणत्या स्वरूपानें हीच कल्पना नित्य वावरत असते. ही कल्पना कोणत्या तरी स्वरूपानें असणें, हा मानवी मनाचा एक घटकच आहे. मनुष्याच्या जीवनक्रमांत जी एकसारखी धडपड सुरू आहे, तिचा अंतिम हेतु ही कल्पना प्रत्यक्ष सिद्ध करणें हाच आहे. मानवी समाजांत चाललेल्या ज्या अनेक प्रकारच्या चळवळी आपल्या पाहण्यांत येतात, त्यांचा उगमही निरनिराळ्या मानवीप्राण्यांचीं ध्येयें सिद्ध करण्याच्या खटपटीपासूनच होतो. मानवीप्राण्याच्या मनांत जें अंतर्गत ध्येय अथवा साध्य ह्मणून असतें तें प्रत्यक्ष आकारास येण्यासाठीं धडपड करीत असतें. निरनिराळ्या मानवी चळवळींचा उगम हाच होय. मनुष्यमात्राच्या मनावर कोणत्यातरी ध्येयाचा सदोदित पगडा बसलेला असतो, आणि तेंच ध्येय त्याच्या सर्व चळवळींना प्रोत्साहन देणारी आदिशक्ति होय. या आदिशक्तीचा जोर मानवी समाजांतून केव्हांही कमी झालेला नाहीं. कदाचित् शेंकडों जन्मांनीं आणि हजारों वर्षें खटपटी करून प्रत्यक्ष सृष्टि आणि आपलें साध्य हीं एकमेकांशीं सुसंगत करतां येत नाहींत, असा अनुभव मनुष्याला येतो. असा अनुभव आला ह्मणजे आपलें स्वतःचें असें कोणतेंही साध्य प्रत्यक्ष सृष्टींत सिद्ध करण्याची खटपट तो सोडून देतो. ही बाह्य खटपट बंद झाली ह्मणजे तें साध्य हेंच आपलें आराध्य दैवत आहे, असें समजून तो त्याची उपासना करूं लागतो. उपासना करतां करतां त्या साध्याबद्दल अत्युत्कट प्रेमाची भावना त्याच्या ठिकाणीं उत्पन्न होते. या एकाच साध्याचें पूर्णत्व त्याच्या चित्तांत बिंबलें, ह्मणजे इतर हलक्या प्रतीचीं साध्यें त्याला तुच्छ वाटूं लागतात. एखाद्या पुरुषाचें एखाद्या स्त्रीवर अत्यंत प्रेम जडलें ह्मणजे तिच्या ठिकाणीं त्याला अप्सरेचें रूपें दिसूं लागतें. इतर मनुष्यांना ती

कितीही कुरूप दिसत असली आणि तिच्यावर तो प्रेम करतो ह्मणून इतरांनीं त्याची कितीही थट्टा केली, तरी त्याच्या दृष्टीला ती रंभाच दिसते. आपल्या प्रेमाच्या व्यक्तीचें स्वरूप कसेंही असो, आपल्या चित्तांतील अत्युत्कट भावना त्या ठिकाणीं जडलेल्या असतात. जग ज्या स्वरूपाची उपासना करतें तें स्वरूप खऱ्या भक्तांच्या दृष्टीनें सर्वथा परिपूर्ण असतें असें नाहीं. प्रत्येक पुरुष आणि स्त्री आपापल्या कल्पनेप्रमाणें आपल्या प्रेमाचें स्थान निवडीत असते आणि तें स्वरूप पूर्ण आहे अशा दृष्टीनें त्याची उपासना करते. यामुळें अत्यंत पूर्ण वृत्तींच्या मनुष्यांच्या देवताही क्रूर स्वरूपाच्या असतात असें आपणास नेहमीं आढळून येतें. या क्रूर भक्तांची अत्युच्च दर्ज्याची कल्पनाही तितक्याच प्रतीची क्रूरतेची असणार हें उघड होय. याच कारणाकरितां खऱ्या सत्पुरुषांनीं वर्णिलेलें जें अत्युच्च स्वरूप तेंच परमेश्वराचें स्वरूप होय हें उघड आहे, आणि यामुळेंच सामान्य मनुष्यांच्या स्वरूपाहून सत्पुरुषांच्या साध्याचें स्वरूप भिन्न असतें.

## प्रकरण ८ वें.

## भक्ताचा परमेश्वर स्वयंव्यक्त असतो.

स्वार्थाचा विचार ज्या भक्ताच्या अंतःकरणांतून सर्वथा निघून गेला असेल, आणि यामुळें ज्याची भक्ति निर्भय आणि निर्व्याज बनली असेल, त्याच्या साध्याचें स्वरूप काय? प्रत्यक्ष परमेश्वर प्राप्त झाला तर असा भक्त त्याला ह्मणेल कीं, "मी माझें सर्वस्व तुझ्या चरणीं वाहतों; आणि उलट तुजपासून मी कशाचीही अपेक्षा करीत नाहीं. वास्तविक माझें असें ह्मणावयास या जगांत कांहींच उरलेलें नाहीं." ज्या भक्ताची अशा प्रकारची वृत्ति बनली असेल, त्याचें साध्य ह्मटलें ह्मणजे पूर्ण प्रेम हेंच होय. ज्या प्रेमाच्या ठिकाणीं पूर्ण निर्भयता आहे अशा प्रकारचें प्रेम प्राप्त करून घेणें हेंच त्याचें साध्य असतें. ज्या मनुष्याच्या साध्यांत कोणत्याही प्रकारचा संकुचितपणा नसतो, तें साध्य विशिष्ट कालापुरतें अथवा फलापुरतें नसतें. तें विश्वव्यापी साध्य असतें. त्या साध्याला कोणतीही सीमा नसते अथवा तें कसल्याही

प्रकारच्या स्वरूपानें अथवा मर्यादेनें बांधलेलें नसतें. तें साध्य कालस्थलादि मर्यादातीत असतें. अशा प्रकारचें साध्य चित्तांत उत्पन्न झालें ह्मणजे त्याचा उपासनामार्गही आकुंचित स्वरूप सोडून देऊन अमर्याद स्वरूपाचा बनतो. त्याला कोणत्याही प्रकारचीं चिन्हें, ग्रंथ, प्रतिमा, इत्यादि उपाधींची जरूर लागत नाहीं. पराभक्तीची ही अतिश्रेष्ठ दशा होय. याहून भक्तीचीं जीं अन्य स्वरूपें आहेत, तीं खालच्या दर्जाचीं असून या श्रेष्ठ स्वरूपाला जाऊन पोहोंचण्याकरितां पायऱ्यांसारखा त्यांचा उपयोग होतो. भक्तीच्या मार्गांत पाऊल ठेवल्यानंतर जे कांहीं जयापजय आपल्या पदरीं पडतात, ते या अत्युच्च साध्याच्या मार्गांतीलच होत. एकामागून एक निरनिराळीं स्वरूपें आपण पुढें ठेवित असतों आणि आपल्या अत्युच्च साध्याच्या स्वरूपाचा आरोप त्याजवर करून आपण त्यांची उपासना करतों. अशी उपासना करतां करतां तीं स्वरूपें कमी प्रतीचीं आहेत, असा अनुभव येऊं लागल्यानंतर आपण त्यांचा त्याग करीत असतों. अशा रीतीनें बराच काळ खटपट केल्यावर बाह्य अथवा जड स्वरूपाच्या सहाय्यानें आपलें अखेरचें साध्य सिद्ध करणें जवळ जवळ अशक्य आहे, असा अनुभव साधकास येऊं लागतो. बाह्य अथवा जड स्वरूपें आपल्या इष्ट स्वरूपाच्या मानानें फारच फिक्कीं पडतात असा अनुभव त्याला येतो. अशा प्रकारें काळ लोटतां लोटतां परोक्ष अथवा निरुपाधिक स्वरूप त्याला प्रत्यक्ष दिसूं लागतें. अशा स्थितीला भक्त पोहोंचला ह्मणजे परमेश्वराचें अस्तित्व सिद्ध करतां येईल कीं नाहीं, अथवा तो सर्वशक्तिमान् आणि सर्वव्यापी आहे कीं नाहीं, अशा प्रकारचे प्रश्न विचारण्याची इच्छाही त्याला होत नाहीं. त्याच्या दृष्टीनें परमेश्वर केवळ प्रेममय आहे असें दिसतें. त्याच्या ठिकाणीं प्रेमाचें अत्युत्कट स्वरूप प्रकट झालेलें असतें; आणि तेवढ्यांतच त्याचा सारा कार्यभाग संपतो. परमेश्वर प्रेममय आहे ही गोष्ट प्रत्यक्ष अनुभवानेंच त्याला कळलेली असते. त्याच्या ठिकाणीं परमेश्वर प्रेमस्वरूपानें स्वतःच व्यक्त झालेला असतो. ती गोष्ट बाह्य पुराव्यानें सिद्ध करण्याची जरूर त्याला उरलेली नसते. परमेश्वर शास्ता आहे, वाइटाला शासन करणारा आणि चांगल्याचें बरें करणारा असें त्याचें स्वरूप आहे, अशी ज्यांची परमेश्वराबद्दल भावना असते, त्यांना परमेश्वराचें अस्तित्व सिद्ध करण्यासाठीं बाह्य पुराव्याची जरूर असते; पण परमेश्वराचें हें स्वरूप

भक्तांच्या अंतःकरणांतून नष्टच झालेलें असतें. परमेश्वर ह्मणजे शुद्ध प्रेम-स्वरूप इतकीच त्यांची भावना असते.

" एखादी स्त्री आपल्या पतीवर प्रेम करिते, पण तें प्रेम पतीकरितां नसून त्याच्या ठिकाणीं जो आत्मा पतिरूपानें व्यक्त झालेला असतो त्यावरच तें प्रेम असतें. तसेंच पति आपल्या स्त्रीवर प्रेम करितो तें स्त्रीकरितां नसून स्त्रीरूपानें व्यक्त झालेल्या आत्मरूपाकरितां असतें " असें श्रुतिवचन आहे. कित्येक असें ह्मणतात कीं, मनुष्याच्या ज्या साऱ्या धडपडी चालू आहेत त्यांची प्रेरक शक्ति स्वार्थ हीच आहे. प्रेमाची मर्यादा आकुंचित झाली ह्मणजे त्याला हलक्या दर्ज्याचें स्वरूप येतें; पण मी विश्वरूपच आहें अशी भावना जर माझ्या चित्तांत उत्पन्न झाली तर तेथें स्वार्थ कसा उरेल? पण ' मी ' ह्मणजे हें शरीर अशी स्वतःबद्दलची माझी भावना आकुंचित झाली ह्मणजे माझी प्रेमाची भावनाही तितक्याच विशिष्ट स्वरूपाची आणि आकुंचित होते. या ठिकाणीं जी चूक होते ती प्रेम मर्यादित करण्यांत होते. विश्वांतील सर्व वस्तूंत परमेश्वरच व्यक्त झालेला असतो याकरितां त्या सर्वांवरच आपण प्रेम ठेविलें पाहिजे. साऱ्या विश्वाचें प्रेम ह्मणजे त्यांतील निरनिराळ्या वस्तूंवरील प्रेमच होय हें लक्ष्यांत ठेविलें पाहिजे. अशा विश्वरूपानें व्यक्त झालेला जो परमेश्वर तोच भक्तांचा परमेश्वर होय. विश्व उत्पन्न करणारा परमेश्वर अर्थात् त्याचा शास्ता परमेश्वर अशाप्रकाराच्या परमेश्वराबद्दलच्या ज्या अनेक उपपत्ति आणि जीं अनेक मतें आहेत, तीं खऱ्या भक्तांच्या दृष्टीनें निरर्थक दिसतात. स्वतःच्या उत्कट प्रेमानें आणि भक्तीनें ते ग्रंथ मर्यादेच्या बाहेर गेलेले दिसतात. अंतःकरण पवित्र झालें आणि त्यांत भक्तीचें अमृत कांठोकांठ भरून गेलें ह्मणजे परमेश्वरविषयक इतर कल्पना तुच्छ होतात, त्या अगदीं कमी दर्ज्याच्या आणि विचारासही अयोग्य अशा वाटूं लागतात. पराभक्तीचें सामर्थ्य अशा प्रकारचें आहे. पराभक्तीचा उदय ज्याच्या चित्तांत झाला असेल अशा भक्ताला परमेश्वराच्या दर्शनासाठीं देवळांत जाण्याचें कारण नाहीं. कारण, परमेश्वराचें जेथें अस्तित्व नाहीं अशी जागा त्याला विश्वांत कोठेंच सांपडत नाहीं. परमेश्वर ज्याप्रमाणें त्याला देवळांत भेटतो त्याचप्रमाणें देवळाच्या बाहेरही तो त्याला दर्शन देतो. सत्पुरुषाच्या सुवर्तनांत ज्याप्रमाणें त्याला

परमेश्वर दिसतो, त्याचप्रमाणें दुष्टाच्या दुर्वर्तनांतही तोच परमेश्वर दिसतो. कारण, स्वतःच्या अंतःकरणांतच परमेश्वराचा उदय झालेला असतो. जी भक्तीची ज्योति त्याच्या अंतःकरणांत पेटलेली असते ती कधींही विझत नाहीं; तिचा प्रकाश सदासर्वदा सारखाच भरून राहिलेला असतो.

---

## प्रकरण ९ वें.

## पराभक्तीचीं मानवी व्यक्तरूपें.

पराभक्तीचें खरें स्वरूप मानवी भाषेनें व्यक्त करणें ही गोष्ट सर्वथा अशक्य आहे. तिचें पूर्णत्व आणि सौंदर्य हीं इतकीं विशाल आहेत कीं, मानवी मनानें कितीही भराऱ्या मारल्या तरी त्यांचें स्वरूप त्यास आकलन करणें शक्य नाहीं. असें आहे तरी निरनिराळ्या देशांत कमी अधिक प्रतीच्या निरनिराळ्या भक्तांनीं आपल्या साध्याचें स्वरूप व्यक्त करण्याकरितां मानवी भाषेचा उपयोग केला आहे. इतकेंच नव्हे तर सामान्य मनुष्याच्या ठिकाणीं प्रेमाचीं जीं निरनिराळीं स्वरूपें आढळून येतात त्यांजवरून परमेश्वरविषयक प्रेमाची कल्पना मनुष्यास समजाऊन देण्याचा यत्न त्यांनीं केला आहे. मनुष्याचें मनुष्यत्व त्याच्या ठिकाणीं शिल्लक आहे तोंपर्यंत परमेश्वरी प्रेम झालें तरी त्याजकडे मानवी दृष्टीनेंच पाहणार. परोक्षाची कल्पना आपणास प्रत्यक्ष भाषेच्या सहाय्याशिवाय करतां येणें शक्य नाहीं. हें विश्व ह्मणजे अव्यक्त आणि अनंत अशा परमेश्वराचें व्यक्त रूप आहे. अनंताचें रूप आपल्या समजुतींत येण्याकरितां तें विश्वरूपानें मर्यादित झालें आहे. याकरितां सामान्य मानवी मनाला प्रेमाच्या ज्या ज्या स्वरूपांचा अनुभव असतो, त्याच स्वरूपांच्या सहाय्यानें परमेश्वरविषयक प्रेम त्याला समजाऊन देण्याचा यत्न भक्त करीत असतात. पराभक्तीवर ज्यांनीं ग्रंथरचना केली आहे, त्यांनीं पराभक्तीचें स्वरूप अशा प्रकारच्या निरनिराळ्या मार्गांनीं व्यक्त करण्याचा यत्न केला आहे. या भक्तीचें अगदीं खालचें स्वरूप त्यांनीं 'शांत' या नांवानें वर्णिलें आहे. ज्या वेळीं भक्ताच्या चित्तांत भक्तीची तीक्ष्ण ज्वाला भडकलेली नसते, आणि ज्या वेळीं भक्तीनें त्याचें मस्तक भ्रमण करूं

लागलेलें नसतें, त्या वेळीं त्याची भक्ति अगदीं सामान्य स्वरूपाची असते. प्रतिमापूजनादि अगदीं क्षुद्र प्रकाराहून ती थोडीशी वरच्या दर्ज्याची असते हीं गोष्ट खरी परंतु त्या भक्तींत भक्तीचा जो अत्युत्कटपणा तो नसतो. भक्तीचें वेड त्याच्या ठिकाणीं नसतें. अशा भक्ताला 'शांत' असें नांव आहे. जगांत कांहीं लोक अत्यंत शांत स्वभावाचे असतात आणि दुसरे कांहीं विलक्षण उतावळे असतात. साध्या गोष्टी झंझावाताच्या वेगानें झाल्या पाहिजेत असें या उतावळ्या लोकांस वाटत असतें. ' शांत ' भक्त सर्व गोष्टींत नेहमींच शांत आणि थंड्या स्वभावाचा असतो.

याहून वरच्या दर्ज्याच्या भक्तीचें स्वरूप ' दास्य ' हें होय. दास्य ह्मणजे सेवकाचा धर्म. आपण परमेश्वराचे सेवक आहों व आपणास त्याची नोकरी केली पाहिजे अशी भावना ज्या भक्तींत असते, ती दास्यभक्ति होय. एखाद्या अत्यंत इमानी नोकराची आपल्या धन्यावर जी प्रीति असते, तशाच प्रकारची प्रीति परमेश्वराचे ठिकाणीं या भक्ताची असते.

याहून आणखी वरच्या दर्ज्याचें भक्तीचें स्वरूप वात्सल्य हें आहे. मुलाच्या ठिकाणीं जें आपलें प्रेम असतें, त्याच स्वरूपाचें प्रेम परमेश्वराच्या ठिकाणीं असणें याचें नांव वात्सल्य. परमेश्वर हा आपला पिता आहे, शास्ता आहे अशी भावना या भक्तींत नसते. कित्येकांना भक्तीचें हें स्वरूप विलक्षण वाटेल, पण या स्वरूपाचेंही एक विशेष स्वरूप आहे. परमेश्वर सर्वशक्तिमान् आहे अशी जी आपली सामान्यपणें कल्पना असते, ती आपल्या चित्तांतून काढून टाकण्याचें साधन वात्सल्य हेंच आहे. परमेश्वर सर्वशक्तिमान् आहे या कल्पनेबरोबरच भीतीची कल्पनाही अंतर्भूत झालेली असते. प्रेमाबरोबर भीतीचा संभव असणें हें भक्तीला हितकारक नाहीं. प्रेमांत भीतीचा यत्किंचितही लेश असतां उपयोगी नाहीं. पूज्यबुद्धि आणि आज्ञाधारकता यांचा उपयोग दानत बनविण्याकरितां होत असतो ही गोष्ट खरी, पण एकदां दानत पक्की झाल्यानंतर भक्ताच्या ठिकाणीं शांति उत्पन्न झाली आणि त्याला भक्तीच्या वेडाचें थोडेंसें वारें लागलें ह्मणजे नीतिशास्त्र आणि रेखींव वर्तणूक यांची त्याला जरुरी नाहीं. ज्याच्या चित्तांत अशा प्रकारची परमेश्वरविषयक भक्ति वाढली असेल त्याच्या दृष्टींत परमेश्वराचें सर्वशक्तिमान्, जाज्वल्य आणि उदात्त असें रूप भरतच नाहीं. अशा प्रकारच्या स्वरूपांत एक

प्रकारची भीति उत्पन्न करण्याचा गुण असतो. या भीतीचा संपर्क आपल्या चित्तास लागूं नये ह्मणून असा भक्त परमेश्वराकडे पितृप्रेमानें पाहत असतो. आपल्या मुलाकडे पाहून कोणत्याही मातेला अथवा पित्याला भीति वाटत नाहीं. तसेंच स्वतःच्या मुलाबद्दल विलक्षण पूज्यबुद्धीही कोणाला वाटत नाहीं. मुलाकडून कांहीं कृपेची याचना करावी अशी इच्छा कोणाला होत नाहीं. मूल हें सदोदित घेणारें असून तें देणारें केव्हांच नसतें; आणि मुलावरील आईबापांचें प्रेम असें उत्कट असतें कीं, त्याजकडून कशाचीही अपेक्षा न करतां तीं आपले देह शेंकडों वेळां त्याच्या कारणीं लावण्यास तयार असतात. त्यांस हजार देह असते तर ते सारे त्यांनीं आपल्या मुलाकरितां खास खर्च केले असते. वात्सल्यभक्तीचें स्वरूप अशाच प्रकारचें आहे. परमेश्वर अवतार घेतो असा समज ज्या धर्मपंथांत प्रचलित आहे, त्या पंथांत वात्सल्यभक्तीचें स्वरूप नेहमीं आढळून येतें. महंमदी धर्मांतील लोकांस वात्सल्य भक्तीची कल्पना अत्यंत भयंकर वाटेल. अशा प्रकारच्या नुसत्या कल्पनेपासूनही ते लांब पळून जातील; पण ख्रिस्तधर्मानुयांना या भक्तीची कल्पना करणें फारसें अवघड नाहीं; कारण येशूच्या स्वरूपानें परमेश्वर अवतरला अशी त्यांची समजूत आहे. याकरितां येशूच्या बालरूपावर प्रेम करणें हें त्यांना अशक्य नाहीं. हिंदुलोकांतही कृष्णाच्या बालरूपावर प्रेम करणारे पुष्कळ आढळतील. कृष्णावर वात्सल्यदृष्टीनें प्रेम करणाऱ्या स्त्रिया हिंदुस्थानांत कितीतरी आहेत. ख्रिस्ती स्त्रियांनाही यांचें अनुकरण करून येशूच्या ठिकाणीं वात्सल्य भक्ति ठेवणें अशक्य नाहीं. परमेश्वराचे ठिकाणीं मातेची वत्सलता आहे, ही कल्पना पाश्चात्य लोकांत अद्यापि पारखी आहे. त्यांच्या ठिकाणीं अशा प्रकारच्या कल्पनेचा उदय होणें अवश्य आहे. हा उदय ख्रिस्तावर वात्सल्यभाव ठेवणाऱ्या स्त्रिया करूं शकतील. परमेश्वराबद्दल आपल्या मनांत भीतीची कल्पना इतकी दृढमूल होऊन बसलेली आहे कीं, ती नष्ट करून टाकण्यास कित्येक वर्षें आपणास खटपट करावी लागेल.

यानंतरचें भक्तीचें स्वरूप सख्य हें होय. परमेश्वर हा आपला जिवलग मित्र आहे अशी उत्कट भावना असणें हिचें नांव सख्य. एखादा मनुष्य आपल्या मित्राजवळ आपलें सारें अंतःकरण उघड करीत असतां ज्याप्रमाणें त्याला मित्राची भीति वाटत नाहीं, त्याचप्रमाणें अशा स्थितींतील भक्तां-

च्या अंतःकरणांस परमेश्वराची भीति वाटत नाहीं. आपल्या कोणत्याही अपराधाबद्दल आपला मित्र आपल्यावर न रागावतां उलट आपणास मदत करण्याचाच यत्न करील, अशी आपली खात्री असते; कारण, मित्रांमध्यें परस्पर बरोबरीचें नातें असतें. सख्यभक्तीचा उदय ज्या भक्तांच्या ठिकाणीं झालेला असतो, त्यांचेंही परमेश्वराशीं असेंच बरोबरीचें नातें असतें. परमेश्वर त्यांचा स्नेही बनलेला असतो. स्वतःच्या अंतःकरणांतील सारे गूढ भाव ते त्याला उघड करून दाखवीत असतात. आपण सदोदित परमेश्वराच्या सन्निध आहों, असें त्यांस नित्य वाटत असतें. स्वतःच्या अंतःकरणांतील सारे बरेंवाईट भाव परमेश्वराला निवेदन केल्यास तो आपला अवश्य पाठिराखा होईल, याबद्दल त्यांची खात्री असते. आपण आपल्या खेळगड्यांकडे ज्या दृष्टीनें पाहत असतों, त्याच दृष्टीनें असे भक्त परमेश्वराकडे पाहत असतात. आपल्या खेळगड्यांशीं जसें बरोबरीचें आणि मोकळेपणाचें नातें असतें, तसेंच परमेश्वराशीं त्यांचें नातें असतें. या विश्वांत आपण सारे खेळाडूच जमलों आहों, असेंही ह्मणावयास हरकत नाहीं. ज्याप्रमाणें मुलें आपला खेळ खेळतात अथवा ज्याप्रमाणें भक्तिमान् राजे आणि चक्रवर्ति स्वतःचा खेळ खेळत असतात, त्याचप्रमाणें प्रेममय परमेश्वर हासुद्धां या विश्वाशीं आपला खेळ खेळत आहे. तो पूर्ण स्वरूप आहे. त्याला कशाचीही गरज नाहीं, कशाचीही उणीव त्याला नाहीं. त्यानें सृष्टि उत्पन्न कां करावी ? कोणत्याही क्रियेचा संभव त्याच्या ठिकाणीं कां व्हावा ? आह्मीं मनुष्यें सदोदित क्रियारत असतों हें रास्तच आहे; कारण, आम्हांस आमच्या जीवनक्रमांत ज्या अनेक उणीवा भासत आहेत, त्या दूर करण्याकरितां ही आमची खटपट आहे; पण परमेश्वर पूर्ण आहे, त्याला कशाचीही गरज नाहीं. मग त्यानें सृष्टि उत्पन्न करण्याचें कार्य सदोदित करीत कां रहावें ? असें करण्याचें त्याला काय कारण आहे ? या प्रश्नाला उत्तर ह्मणून ज्या अनेक उपपत्ति सांगण्यांत येतात, त्यांना वास्तविक कांहीं किंमत नसून त्या केवळ मुलांस शोभण्यासारख्या गोष्टी मात्र आहेत. हें विश्व ह्मणजे निव्वळ खेळ आहे. परमेश्वर केवळ लीलेनें तो खेळ खेळत आहे. हें सारें विश्व त्याला एखाद्या प्रचंड खेळाप्रमाणें संतोषकारक वाटत असलें पाहिजे. याकरितां या साऱ्या विश्वाकडे आणि संसाराकडे केवळ खेळ या दृष्टीनें आपण पाहिलें पाहिजे. तुह्मीं

दरिद्री असलां, तर दारिद्र्याचा हा खेळ मौजेनें खेळा. तुह्मीं श्रीमंत असलां तर त्या खेळांतही तुम्हीं तितकीच मौज करा. एखादी भीति उद्भवली तर तीही एक मजाच झाली असें समजा. कांहीं सुखाची प्राप्ति झाली तर ती थोडी अधिक मजेची गोष्ट आहे. हें जग एखाद्या मोठ्या खेळखान्यासारखें आहे. येथें आपण अनेक मौजा करीत आहों व अनेक प्रकारचे खेळ खेळत आहों. आपण खेळ खेळत असतां परमेश्वरही आपला खेळगडी झाला असून तो व आपण बरोबरच खेळत आहों. परमेश्वर हा आपला अक्षय्य खेळगडी आहे. आपला खेळ किती सुंदर रीतीनें तो खेळत आहे पहा! एक डाव संपला, एक चक्र पुरें झालें, एक प्रलय झाला. या वेळीं थोडा अथवा अधिक वेळ आपणास विश्रांति मिळते आणि नंतर आपण सारे बाहेर पडून पुन्हां नव्या डावास सुरवात करतों. हा खेळ आहे, ही गोष्ट ज्या वेळीं आपण विसरतों आणि आपण परस्परांचे खेळगडी आहों ही गोष्ट आपल्या ध्यानांतून जाते, त्याच वेळीं दुःखें आणि संकटें आपणाकडे धांऊन येतात, त्याच वेळीं आपलें अंतःकरण मूढ बनून जातें, आणि असें झालें ह्मणजे जगाचें प्रचंड ओझें आपणास दडपूं लागतें; पण हें जग खरें आहे या कल्पनेचा त्याग आपण एकवार केला आणि एका मोठ्या रंगभूमीवर आपण हा खेळ करीत आहों व अशा रीतीनें परमेश्वराला त्याच्या क्रीडेंत सहाय्य करीत आहों, ही गोष्ट आपल्या चित्तांत बाणली ह्मणजे सर्व प्रकारचीं दुःखें आपोआप लयास जातात. प्रत्येक अणुरेणूंत परमेश्वर खेळत आहे. चंद्र, सूर्य आणि पृथ्वी यांसारखे अनेक गोल तो खेळतां खेळतां निर्माण करतो. मनुष्याच्या अंतःकरणाशीं, पशुपक्ष्यांशीं आणि वृक्षवेलीशींही त्याचा खेळ सुरू आहे. एकवेळ आपली रचना तो एक प्रकारें करतो आणि कांहीं वेळानें ती मोडून दुसऱ्या प्रकारें दुसरी रचना करतो. या साऱ्या कार्यांत आपली मदत त्यास होत आहे, ही गोष्ट आपल्या समजुतींत येत असली अथवा नसली तरी ती खरी आहे. आपण परमेश्वराचे खेळगडी आहों, ही केवढ्या आनंदाची गोष्ट आहे बरें?

परमेश्वरावरील प्रेमाचें आणखीही एक स्वरूप आहे. त्याला ‘ मधुर ’ असें नांव आहे. भक्तीच्या अनंत स्वरूपांत हें स्वरूप सर्वश्रेष्ठ आहे. मानवी अंतःकरणांत प्रेम करण्याचें जेवढें कांहीं सामर्थ्य असेल, तेवढें सारें या

स्वरूपांत व्यक्त होतें. मनुष्याचा मानवी भाव ज्या प्रेमाच्या संयोगानें मुळा-पासून हालला जातो, जें प्रेम त्याच्या ठिकाणीं आ-नख-शिखाग्र प्रत्येक जागीं भरून जातें, जें त्याला वेडा करून सोडतें, जें त्याचा आत्मभाव विसरवितें, जें त्याचें स्वरूप पालटून टाकतें, जें त्याला परमेश्वराचें अथवा दैत्याचें रूप देतें आणि जें स्त्री आणि पुरुष यांच्या ठिकाणीं अत्युच्च प्रकारें अनुभवास येतें तें हेंच स्वरूप होय. परमेश्वर पति आणि आपण सारे पत्निरूप आहों, अशा प्रकारच्या भक्तीचें नांव ‘ मधुरभक्ति ’ होय. या विश्वांत त्या वेळीं एकाच पुरुषाचा वास असतो. तो पुरुष ह्मणजे परमपुरुष हाच. तो साऱ्यांचा पति आहे. एकादा पुरुष स्त्रीला अथवा एखादी स्त्री पुरुषाला जेवढें कांहीं प्रेम देऊं शकेल, तें सारें परमेश्वराच्या ठिकाणीं दिलें जाणें याचें नांव ‘ मधुरभक्ति. ’ प्रेमाचे जे निरनिराळे प्रकार या जगांत आपण पहातों आणि ज्या प्रकारांशीं आपण या जगांत खेळ खेळत आहों, त्या साऱ्यांचा एकच हेतु आहे. तो हेतु परमेश्वराची भेट हाच होय; पण मोठ्या दुर्दैवाची गोष्ट ही कीं, प्रेमाच्या या लहान लहान नद्या कोणत्या अनंत समुद्रास जाऊन मिळत आहेत, ही गोष्ट आह्मां मनुष्यांस कळत नाहीं. ही गोष्ट लक्ष्यांत न आल्यामुळें आपण अनेक वेळां आपल्या प्रेमाचा ओघ एखाद्या क्षुद्र बाहुलीकडे वळविण्याचा यत्न करीत असतों. मानवी अंतःकरणांत अपत्यप्रेम अत्यंत दृढ असतें; पण तें वस्तुतः त्या अपत्याच्या बाह्यरूपावर नसतें. हें बाह्यरूप एखाद्या निर्जीव बाहुली सारखें आहे. जर तुमचें प्रेम अंधपणें केवळ या बाहुलीवरच जडलें, तर त्यापासून तुह्मांस दुःखाची प्राप्ति होईल; पण ह्या दुःखापासूनही तुह्मांस एक फायदा होईल. तो असा कीं, एखाद्या मानवी प्राण्याला आपलें सर्व प्रेम अर्पण केल्यास लवकर किंवा उशिरां दुःखाची प्राप्ति आपणास होते, असा धडा तुह्मांस मिळेल, तुमचे अंध नेत्र उघडतील. याकरितां आपण आपलें प्रेम एकाच अत्युच्च ठिकाणीं अर्पण केलें पाहिजे. जें स्वरूप कधींही मरण पावत नाहीं व जें नित्य एकरूपच असतें, आणि तसेंच ज्या प्रेमसागराला कधींही भरती अथवा ओहोटी होत नाहीं, अशाच स्वरूपाच्या ठिकाणीं आपण आपलें प्रेम अर्पण केलें पाहिजे. जें आपलें खरें अखेरचें साध्य आहे, त्याच साध्याच्या दिशेकडे आपण आपल्या प्रेमाचें सुकाणूं वळविलें पाहिजे.

जो अनंत प्रेमसागर आहे त्यालाच आपली प्रेमसरिता जाऊन मिळाली पाहिजे. सर्व नद्या एकसारख्या समुद्राकडे वाहात असतात. पाण्याचा एक थेंब• सुद्धां पर्वताच्या कड्यावरून खालीं सुटला ह्मणजे एखाद्या ओढ्याला अथवा नदीला मिळूनच तो थांबत नाहीं. ती नदी केवढीही मोठी असली तरी तिच्याशीं एकरूप होऊन त्या थेंबाची तृप्ति होत नाहीं. अखेरीस कोणत्या तरी रीतीनें तो जलबिंदु समुद्राकडे जाण्याचा रस्ता अवश्यपणें शोधून काढतोच. आपल्या चित्तांत ज्या अनेक भावना आणि लालसा आहेत, त्या सर्वांचें ध्येय एक परमेश्वर हेंच आहे. तुह्मांला क्रोध आला तर तोसुद्धां तुह्मीं परमेश्वरालाच अर्पण करा. आपला सखा जो परमेश्वर त्याजवरच रागावत जा. तुह्मी कितीही रागावलां तरी तें सारें विसरून जाणारा तुह्मांस दुसरा कोण भेटणार आहे? तुह्मीं एखाद्या मनुष्यावर रागावलां तर तुमचा राग तो निमूटपणें सहन करून घेत नाहीं. तुमचा राग तो तुह्मांला पुन्हां परत करतो. तुह्मीं माझ्यावर रागावलां तर मजकडून त्याची प्रतिक्रिया झाल्यावांचून राहत नाहीं. कारण तो सहन करण्यास लागणारी सहनशीलता माझ्या आंगीं नाहीं. "तूं मजकडे कां येत नाहींस? तूं मला या जगावर एकटें कां सोडलेंस?" असे प्रश्न आपण आपल्या प्रियकरास करावे. तो जेथें नाहीं तेथें आनंदाची व्याप्तीही नाहीं. त्याच्यावांचून आनंदानें व्याप्त असणारें असें एकही ठिकाण या विश्वांत नाहीं. आपणासभोंवतीं पसरलेल्या या मातीच्या गोळ्यांत सुख तें कशाचें असणार? आपणास साऱ्या सुखाचा अर्थ शोधून काढावयाचा आहे आणि तो परमेश्वरावांचून इतरत्र कोठेंही सांपडावयाचा नाहीं. याकरितां आपण आपल्या साऱ्या भावना आणि लालसा त्या एकाच दिशेकडे वळविल्या पाहिजेत. या भावना आपल्या ठिकाणीं असण्याचा एकच उद्देश आहे. तो उद्देश सिद्ध न झाला तर त्या क्षुद्र मार्गांकडे वळून भ्रष्ट होतात आणि त्याच भावना योग्य दिशेकडे जाऊन साध्याला बरोबर पोहोंचल्या ह्मणजे त्यांचें रूप एकदम पालटतें. मानवी शरिरांत आणि मनांत जी चिच्छक्ति भरून राहिली आहे, ती कितीही निरनिराळ्या रूपांनीं प्रकट होत असली, तरी तिचें अंतिमसाध्य एकच आहे. तें साध्य ह्मणजे परमेश्वराप्रत पोहोंचणें हेंच होय. आपलें सर्व प्रेम आणि आपले सर्व विकार परमेश्वराकडे वळविले पाहिजेत.

आपल्या प्रेमाला पात्र असा तोच एक आहे. मग आपण आपलें प्रेम दुसऱ्या कोणास अर्पण करावें ? आपल्या अंतःकरणानें दुसऱ्या कोठें जावें ? जगांतलें सारें सौंदर्य आणि सारी उदात्तता त्या एकाच्याच ठिकाणीं आहे. किंबहुना सौंदर्याचें सौंदर्य आणि उदात्ततेची उदात्तता तोच आहे. त्याहून अधिक सुंदर असें या विश्वांत काय सांपडणार आहे ? प्रेम करण्याला अधिक योग्य अशी दुसरी एक तरी वस्तु या विश्वांत आहे काय ? या विश्वाचा पति होण्यास त्यावांचून दुसरा कोण योग्य आहे ? याकरितां त्यालाच पतिरूप होऊं द्या. त्या एकावरच प्रेम करा. कित्येक वेळां भक्तिमार्गांत मेरु मण्याच्या जागीं आरूढ झालेले अत्युच्च दर्ज्याचे भक्त आपलें हें प्रेम व्यक्त करावयास मानवी भाषेचा उपयोग करीत असतात. मूर्खांना त्यांची ही भाषा समजत नाहीं. त्या भाषेंतील रहस्य त्यांना कधींही कळणार नाहीं; कारण, या भाषेकडे ते आपल्या जड नेत्रांनीं मात्र पाहतात. परमेश्वराच्या प्रेमानें वेडावून गेलेल्या अंतःकरणाची उदात्त भाषा सामान्य मनुष्याला कशी कळणार ? " प्रियकरा, तुझें एकवार चुंबन केलें ह्मणजे तुझ्या प्रेमाची लालसा एकसारखी वाढतच जाते. त्या वेळीं सारीं दुःखें विलयास जातात; मी सारें विश्व विसरतों आणि तुजवांचून दुसऱ्या कशाचेंही स्मरण मला राहत नाहीं " असें भक्त ह्मणतात. हें चुंबन प्राप्त करून घेण्याची लालसा आपणही धरिली पाहिजे. ज्या चुंबनानें भक्त वेडा होतो आणि ज्या चुंबनानें मनुष्याचें परमेश्वरांत रूपांतर होतें, तें चुंबन प्राप्त करून घेण्याकरितां आपलें अंतःकरण पिळवटत राहिलें पाहिजे. ज्याला हें चुंबनसौख्य प्राप्त झालें असेल, त्याला सारें विश्व निराळेंच भासूं लागतें. चंद्रसूर्यादि गोल त्याच्या दृष्टीनें नष्ट होतात, आणि अखेरीस सारें विश्व वितळून जाऊन अनंत प्रेमसागराशीं एकरूप झाल्यासारखें तें दिसूं लागतें. भक्तीच्या वेडाचें हें अखेरचें पर्यवसान आहे. खरा भक्त येथेंही थांबत नाहीं. पति आणि पत्नी या रूपांत व्यक्त होणारी ' मधुर ' भक्तीही त्याला पुरेशी वाटत नाहीं. पति आणि पत्नी यांजमधील प्रेमाला एक प्रकारचें सदाचाराचें रूप असतें. उलटपक्षीं व्यभिचारी प्रेमाला दुराचाराचें रूप असलें तरी त्याची उत्कटता पतिपत्नीप्रेमाहूनही अधिक असते. याकरितां अशा प्रकारचें दुराचारी प्रेमही

भक्ताला आवडतें. दुराचारी प्रेमाचा मार्ग अशुद्ध आहे ही गोष्ट त्यांच्या लक्ष्यांत येत नाहीं. त्याच्या ठिकाणीं असणारी अत्यंत उत्कटताच ते पाहत असतात. व्यभिचारी प्रेमांत जों जों अडथळे अधिक तों तों त्याची उत्कटताही वाढत जाणें, असा या प्रेमाचा स्वभाव आहे. पति आणि पत्नी यांजमधील प्रेमांत अडथळा नसतो. यामुळें त्याची तीव्रताही कमी प्रमाणाची असते. एखादी तरुणी आपल्या पियकरावर प्रेम करीत असतां, तिचे आईबाप तिला अडथळा करितात. तिच्या मार्गांतील हा अडथळा जों जों वाढत जातो, तों तों, तिचें प्रेम अधिकच बळावत जातें. हीच गोष्ट भक्त स्वतःच्या ठिकाणीं कल्पितात. वृंदावनांत गोपी कृष्णावर कशा प्रकारचें प्रेम करीत होत्या; त्याच्या मुरलीच्या आवाजाबरोबर सारें भान विसरून जाऊन जगांतील आपलीं सारीं कर्तव्यें, आपले आनंद, आपलीं दुखें आणि आपलीं सर्व बंधनें विसरून जाऊन त्या त्याजकडे कशा धांव घेत होत्या याचें वर्णन मानवी भाषेनें करणें शक्य नाहीं. अरे मानवीप्राण्या! भक्तीच्या अघळपघळ गोष्टी तोंडानें सांगत असतां जगांतल्या साऱ्या दिखाऊ गोष्टींकडे तुझें चित्त धांव घेत असतें. तुझी अशा प्रकारची भक्ति खरी ह्मणतां येईल काय? "ज्या अंतःकरणांत रामाचा वास आहे, तेथें इतर इच्छा कशा राहणार? ज्या ठिकाणीं इच्छा राहतात तेथें रामाला राहण्यापुरती जागा नसते. या दोघांचा वास एकत्र असणें शक्य नाहीं. ज्याप्रमाणें अंधार आणि उजेड एकत्र नांदूं शकत नाहींत, त्याचप्रमाणें राम आणि इतर लालसा हीं एकत्र नांदूं शकत नाहींत असें बुद्ध ह्मणतात.

## प्रकरण १० वें.

## उपसंहार.

भक्तिमार्गाच्या या अत्युच्च पायरीवर आपण आरूढ झालों ह्मणजे सारें तत्त्वज्ञान आपण झुगारून देऊं शकतों. अशा स्थितींत तत्त्वज्ञानाची काळजी कोण करीत बसतो? मुक्ति, निर्वाण इत्यादि गोष्टींची सुद्धां जरूर आपणास पडत नाहीं. परमेश्वरी प्रेमाच्या अखंड आनंदाचा उपभोग घेत असतां

मुक्तीची इच्छा कोण करील? "परमेश्वरा! मला संपत्तीची जरूर नाहीं, मित्रांची जरूर नाहीं, तसेंच मला विद्येची अथवा मुक्तीचीही जरूर नाहीं. मला पुनःपुनः जन्माची प्राप्ति होऊन तुझ्या प्रेमाच्या आनंदांत मी निमग्न असावें. तूं आणि मी यांजमधील प्रेम अखंड असावें. मला स्वतः साखर होण्याची इच्छा नसून साखरेची गोडी घेण्याची इच्छा आहे. मग अशा स्थितींत तुझ्याशीं एकरूप होऊन मुक्त होण्याची इच्छा कोण करितो? तूं आणि मी एकरूपच आहों, अशी माझी खात्री झाली, तरी तुजपासून मी भिन्नच राहीन; कारण, त्यामुळें तुझ्या प्रेमाचा उपभोग मला मिळेल." परा-भक्तीच्या उच्च कोटीला पोंचलेला भक्त अशा प्रकारची भाषा बोलत असतो. केवळ परमेश्वराच्या प्रेमासाठींच त्याचें परमेश्वरावर प्रेम असतें, आणि त्याच्या सुखसर्वस्वाचें साधनही तेंच. अशाप्रकारचें प्रेम प्राप्त करून घेण्यासाठीं हजारों वेळां पुनःपुनः बंधनांत कोण पडणार नाहीं? भक्ताला भक्तीवांचून दुसऱ्या कशाचीही गोडी नसते. या भक्ताच्या प्रेमाचा झरा नदीच्या मुखापासून उगमाकडे उलटा वाहत असतो. या स्थितीला पोंचलेल्या भक्ताला जग वेडा समजत असतें. अशाच प्रकारचा एक भक्त माझ्या पाहण्यांत आला होता. जग तुह्मांला वेडा समजतें असें मी त्याला ह्मटलें, तेव्हां तो ह्मणाला, "माझ्या मित्रा, जग हें एक जंगी वेड्याचें इस्पि-तळ आहे. कित्येक लौकिक प्रेमासाठीं वेडे झाले आहेत, दुसरे कित्येक नांवा-साठीं आणि कोणी कीर्तीसाठीं वेडे झाले आहेत, दुसरे कित्येक पैशाकरितां वेडे झालेले असतात. कोणाला स्वर्गसुखाचें तर कोणाला मुक्तीचें वेड आहे. एवढया वेड्यांच्या इस्पितळांतला मीही एक वेडा आहें. मी परमेश्वरासाठीं वेडा झालों आहें. तुह्माला जसें पैशाचें वेड असतें, तसें मला परमेश्वराचें वेड लागलें आहे. तुह्मीं जसे वेडे, तसाच मीही वेडा. या सर्व वेडांत माझेंच वेड चांगलें असें मला वाटतें." भक्ताला अशा प्रकारचें वेड लागलेलें असलें कीं, त्याच्या तीव्रतेमुळें इतर साऱ्या वस्तूंचा हव्यास पार वितळून जातो. सारें विश्व केवळ प्रेमानें ओथंबलें आहे, असेंच त्याच्या प्रत्ययास येतें. ज्या कोणाला अशा प्रकारचें वेड लागलें असेल, तो खरोखर धन्य होय. तो सदोदित केवळ आनंदरूप असतो. आपल्या ठिकाणीं सं-साराचा जो रोग जडलेला आहे, तो नाहींसा करणारी दिव्य औषधी एकच

आहे. ती औषधी भक्ति हीच होय. असा मनुष्य परमेश्वरासन्निध गेलेला असतो. त्याच्या ठिकाणीं स्वार्थाचें आणि इतर कोणत्याही आकांक्षेचें नांवही उरत नाहीं.

भक्तिमार्ग हा आरंभीं द्वैताचा मार्ग असतो. आरंभीं परमेश्वर आपणापासून भिन्न आणि आपण त्याहून भिन्न असें वाटत असतें. या दोन भिन्न वस्तूंस प्रेमाचा दुवा जोडलेला असतो. या दुव्यांमुळें परमेश्वर आणि भक्त हे परस्परांजवळ ओढले जातात. संसारांत पिता, माता, पुत्र, स्नेही, धनी इत्यादि जीं अनेक बंधनें भक्ताच्या चित्तांत असतात, त्या सर्वांची स्थापना तो परमेश्वराच्या ठिकाणीं करतो. या सर्वांचें एकवटलेलें प्रेम तो परमेश्वराच्या चरणीं अर्पण करितो. शेवटीं त्याच्या प्रेमाचा विषय जो परमेश्वर आणि तो भक्त हे एकरूप होऊन जातात. आपल्या प्रेमाचें स्वरूप आरंभीं अत्यंत आकुंचित असतें. आपलें प्रेम केवळ आपणा स्वत:वर मात्र असतें. आपल्या स्वत:चें स्वरूप जितकें आकुंचित आहे, तितकेंच या प्रेमाचें स्वरूपही आकुंचित असतें; पण शेवटीं भक्ताला प्रकाशाचा एवढा प्रचंड झोत प्राप्त होतो कीं, त्यांत त्याचा आकुंचितपणा नाहींसा होऊन तो अनंताशीं एकरूप झाला असल्याचें आढळून येतें. प्रेमाच्या या प्रचंड प्रकाशामुळें मनुष्याचें सर्वथा रूपांतर होऊन जातें आणि पूज्य, पूजक आणि पूजा ही त्रयी वस्तुत: एकरूपच आहे असा प्रत्यय भक्ताला येतो.



# हिंदुस्थानचा भविष्यकाल.



दुसऱ्या कोठेंही जाण्यापूर्वी ज्या ठिकाणीं सरस्वतीनें आपलें माहेरघर केलें, असा हा हिंदुस्थान देश आहे. त्याच्या पृष्ठावर समुद्राप्रमाणें विशाल नद्या वाहतात आणि तेथें बर्फानें आच्छादिलेलीं आपलीं शिखरें थेट गगनास भिडवून त्यांतील गुप्त वस्तूंचा जणूं काय शोध घेऊं पाहणारा हिमालय पर्वतही आहे. जगांत अतुल्य अशा ऋषिवर्गाच्या पादधूलीनें पवित्र झालेली आपली भूमि आहे. मानवी हृदयाच्या आणि त्याचप्रमाणें विश्वाच्याही अत्यंत गूढ भागांत काय भरलें आहे, याचाही शोध प्रथम याच भूमींत सुरू झाला. आत्मा अमर आहे असें मत प्रथम याच भूमींत प्रादुर्भूत झालें. सर्वव्यापी आणि सर्वांतर्यामी असें परमेश्वराचें स्वरूप प्रथम याच भूमींत समजलें गेलें; आणि याच भूमींत धर्म आणि तत्त्वज्ञान हीं अत्यंत उच्चतेस पावलीं आहेत. भरतीच्या लाटा ज्याप्रमाणें जमिनीकडे एकसारख्या धांव घेत असतात, त्याचप्रमाणें या देशांतून धर्म आणि तत्त्वज्ञान यांच्या लाटा सर्व जगभर पसरल्या; आणि याच देशांतून अशा लाटा यापुढेंही पसरावयाच्या आहेत. मृत्युपंथास लागलेल्या मानववंशाच्या आंगीं चैतन्य आणि जिवटपणा याच देशानें आणला पाहिजे. शेंकडों वर्षांचे आघात सोसून पुन्हां कायम राहिलेला असा हाच देश आहे. परकीयांच्या शेंकडों स्वाऱ्या याजवर आल्या आणि शेंकडों वेळां सामाजिक चालीरीतींची उलथापालथ झाली; पण हे सर्व आघात गिळून टाकून तो आज पहिल्यासारखाच आहे. हजारों वर्षांचे आघात एखादा खडक ज्याप्रमाणें केवळ लीलेनें सहन करितो, त्याचप्रमाणें आपल्या चैतन्याच्या आणि अभेद्य जीवनशक्तीच्या जोरावर हिंदुस्थानानें हजारों तडाखे आजपर्यंत लीलेनें सहन केले आहेत. आत्मा ज्याप्रमाणें अनादि आणि अनंत असतो, त्याचप्रमाणें ही आमची मातृभूमि अनादि आणि अनंत आहे. अशा प्रकारच्या भूमीचीं आपण लेंकरें आहों.

हिंदमातेच्या मुलांनों, आज कांहीं लौकिक गोष्टींविषयीं तुह्मांस मला सांगावयाचें आहे; आणि भूतकालीन् उच्चतेची मी तुह्मांस आठवण करून

दिली, यांतही माझा एक हेतू आहे. आपल्या जुन्या मोठेपणाची वारंवार आठवण केल्यामुळें आपण दिवसेंदिवस अधिक हीनत्वास मात्र जातों. अशा प्रकारचें कांहीं लोकांचें मत अनेकवार माझ्या कानीं आलें आहे. अशा रीतीनें जुन्या आठवणी काढणें या लोकांच्या मतें निरुपयोगी असून, आपण आपली नजर सदोदित भविष्यकाळाकडे ठेविली पाहिजे, असें ते ह्मणतात. त्यांचें हें ह्मणणें खरें आहे; पण भविष्यकाळही भूतकाळांतूनच निर्माण होतो हेंही लक्ष्यांत ठेवणें अवश्य आहे, याकरितां भूतकाळांतही जितकी खोल बुडी मारतां येईल तितकी मारून, तेथील झऱ्याचें पाणी आपण प्राशन केलें पाहिजे; आणि त्यानंतर आपली नजर दूरवर—अत्यंत दूरवर—फेंकून आपल्या भूमीचें स्वरूप पूर्वीपेक्षांही अधिक उज्वल, अधिक मोठें आणि अधिक उच्च केलें पाहिजे. आपले पूर्वज फार मोठे होते याची आठवण आपण प्रथम केली पाहिजे. आमच्या मुळाशीं असलेलीं तत्त्वें कशीं होतीं, हें प्रथम अवगत करून घेतलें पाहिजे. आमच्या नाड्यांतून कोणाचें रक्त वाहात आहे, याचा विचार प्रथम केला पाहिजे. त्या रक्तानें भूतकालीं कशा प्रकारची कामगिरी बजाविली, हें प्रथम लक्षांत आणलें पाहिजे आणि त्याच्या प्रभावाबद्दल आपल्या चित्ताची पक्की खात्री करून घेतली पाहिजे. आमच्या भूतकालीन महत्त्वाबद्दल पक्की खात्री आमच्या हृदयांत भिनली म्हणजे त्याहूनही अधिक मोठेपणा हिंदुस्थानास आपण प्राप्त करून दिला पाहिजे, अशी भावना जागृत होईल. अवनतीचा काळही येथें मधून-मधून येऊन गेला. अशा काळाला मी फारसें महत्व देत नाहीं. मधूनमधून असा काळ येणें आवश्यकच होतें. एखाद्या महावृक्षावरून एखादें सुंदर आणि पक्व फळ खालीं पडतें. जमिनीवर पडल्यावर तें सडूं लागतें आणि त्या सडूं लागण्याच्या क्रियेंतून भावी वृक्षाचें मूळ निर्माण होतें; आणि हा वृक्ष कालें-करून कदाचित् पहिल्यापेक्षांही अधिक मोठा होतो. आपल्याला जो अवन-तीचा काळ येऊन गेला तोही अत्यंत आवश्यक होता. या अवनतींतूनच भविष्यत्कालचा हिंदुस्थान देश निर्माण होणार आहे. या भावी महावृक्षाचीं पहिलीं कोंवळीं पानें बाहेर पडलीं आहेत. ऊर्ध्वमूल असा हा महावृक्ष हळू-हळू वर डोकाऊं लागला आहे आणि त्याच्या स्वरूपाबद्दलच मी तुह्मांस आज सांगणार आहें.

दुसऱ्या कोणत्याही देशांतील परिस्थितीपेक्षां हिंदुस्थानांतील परिस्थिति अधिक गुंतागुंतीची आणि अधिक बिकट आहे. मानववंश, धर्म, भाषा आणि राज्यपद्धति इत्यादि अनेक वस्तुसंघ मिळून एक राष्ट्र बनत असतें. जगांतील अनेक मानववंशांचीं राष्ट्रें तपासून पाहतां आमच्या देशांत अनेक तत्त्वांचें जितकें मिश्रण आढळतें तितकें इतर कोठेंही आढळत नाहीं. या ठिकाणीं आर्य, द्राविड, तार्तार, तुर्क, मोंगल, युरोपियन इत्यादि अनेक वंशांचें बीज आहे. या सर्व वंशांतील रक्ताचा ओघ या भूमीकडे वळला आहे. भाषेसंबंधीं पाहतांही हाच प्रकार आढळून येतो. त्याचप्रमाणें समाजपद्धती व चालीरिती इतक्या भिन्न भिन्न आहेत कीं, खुद्द हिंदुस्थानांतील दोन जातींत जें वैचित्र्य आढळून येतें, तितकें वैचित्र्य पौर्वात्य आणि पाश्चात्य या अत्यंत भिन्न समाजांतही आढळून येणार नाहीं.

सर्वांनां सामान्यपणें एकत्र होतां येईल अशी एकच बाब आमच्या देशांत आहे; ती बाब ह्मणजे आमचा धर्म. आमच्यांत अनेक प्रकारचे जातिभेद आणि इतर विविधता असली, तथापि आपणा सर्वांचा धर्म एकच आहे; आणि या पायावरच आपली भावी इमारत आपण उठविली पाहिजे. युरोपांत राजकीय मताच्या समानत्वानें राष्ट्रीय ऐक्य उत्पन्न होत असतें, आणि आशिया खंडांत ही गोष्ट धर्ममतांच्या समानत्वानें शक्य होते. याकरितां हिंदुस्थानच्या भावी राष्ट्रीय इमारतीस धर्माचें ऐक्य ही अत्यंत जरुरीची बाब आहे. आतां धर्माचें ऐक्य ह्मणजे काय याचा खुलासा केला पाहिजे. या शब्दाचा अर्थ ख्रिस्ती, मुसलमान अथवा बौद्ध लोकांत जो रूढ आहे, त्या अर्थानें मी हा शब्द वापरला नाहीं. येथें अनेक पंथ अस्तित्वांत असले तरी त्या सर्वांना सामान्य असा एक पाया आहे, ही गोष्ट आपणाला ठाऊक आहेच. प्रत्येक पंथाचें साध्य वेगवेगळें असलें अथवा प्रत्येक पंथाचा मार्ग भिन्न भिन्न असला, तरी या सर्व पंथांची उभारणी एकाच पायावर झालेली असते. अशा प्रकारचा सामान्य पाया सर्वांस उपलब्ध असल्यामुळें प्रत्येकास अवश्य असणारें स्वातंत्र्य आपल्या धर्मांत मिळूं शकतें; आणि प्रत्येकाला आपापली उन्नति आपापल्या इष्ट-मार्गानें करून घेतां येते. अशा प्रकारच्या सवडीमुळें आमच्या धर्मांत आश्चर्योत्पादक विविधता उत्पन्न झाली आहे. आपणांपैकीं जे कांहीं विचारशील आहेत, त्यांच्या लक्षांत ही गोष्ट येऊन चुकली असेलच. आतां आह्मांस

जो मुख्य कार्यभाग करावयाचा तो हाच कीं, आह्मांस चैतन्य देणाऱ्या या धर्मतत्त्वांचा सर्वत्र प्रसार करावयाचा, त्यांचें ग्रहण आबालवृद्धांकडून करवावयाचें आणि त्यांचा अभ्यास व प्रत्यक्ष आचार त्यांजकडून करवावयाचा. आमच्या भावी इमारतीची ही पहिली पायरी असल्यामुळें ही गोष्ट प्रथम साध्य करून घेतली पाहिजे. आशियाखंडांत आणि विशेषत: हिंदुस्थानांत अनेक प्रकारच्या अडचणी धर्मकार्यांपुढें कशा पळून जातात, याचा अनुभव आपणास आहेच. जातिभेदाच्या अडचणी, भाषेच्या अडचणी सामाजिक अडचणी आणि राष्ट्रीय अडचणी या धर्मांपुढें नष्ट होतात. धर्मकल्पनांव्यतिरिक्त दुसऱ्या कोणत्याही गोष्टींनीं आह्मां हिंदूलोकांचें मन हालून जात नाहीं. आह्मां हिंदूंच्या आयुष्यक्रमांतील हीच मोठी गुरुकिल्ली आहे. धर्मजीवनापेक्षां दुसरें कोणतेंही साध्य अधिक मोठें नाहीं. ही गोष्ट सर्वथैव खरी आहे. आणि आमच्या देशासंबंधानें पाहतां तर आमची भावी उन्नति घडवून आणण्यासाठीं हा एकच मार्ग आह्मांस मोकळा आहे. आपण अनेक प्रकारच्या चळवळी केल्या, तरी त्यांस धर्माचा पाया नसेल तर त्यांचा कोणताही इष्ट परिणाम घडून येणार नाहीं. याकरितां भावी इमारतीची रचना करण्यास जो कोणी पुढें सरसावेल त्यानें धर्मैक्याची ही पहिली पायरी प्रथम बांधिली पाहिजे. आह्मां हिंदूंत द्वैती, विशिष्टाद्वैती, अद्वैती, शैव, वैष्णव, पाशुपत इत्यादि अनेक पंथ असले, तथापि या सर्वांच्या मुळाशीं एकच तत्त्व आहे ही गोष्ट सर्वांकडून ग्रहण करविली पाहिजे. आपणा स्वत:च्या कल्याणाकरितां आणि आपल्या वंशाच्या कल्याणाकरितां आपणांतील लहानमोठे भेद विसरून या मूलतत्त्वांतील ऐक्याकडे आपण सर्वांनीं नजर देण्याचा काल आतां आला आहे, ही गोष्ट सर्वांच्या ध्यानीं आणून दिली पाहिजे. पंथापंथांतील हे तंटे निव्वळ मूर्खपणाचे आहेत, हें आपण पक्कें ध्यानांत धरा. श्रुतिस्मृतींनीं हे तंटे अमान्य केले आहेत. आपल्या पूर्वजांनींही या तंट्यांवर बहिष्कार घातला आहे. ज्यांचें रक्त आपल्या शिरांत वाहतें असा अभिमान आपण बाळगितों, ते आपले पूर्वज हीं आपलीं भांडणें पाहून आपला तिरस्कार करीत आहेत.

अशा प्रकारचीं भांडणें समूळ नाश पावलीं ह्मणजे इतर प्रकारच्या सुधारणा हळू हळू घडून येतील. जीवनदायी रक्ताचा झरा शुद्ध आणि बळकट

असला ह्मणजे त्या शरिरांत कोणत्याही रोगाचीं बीजें जिवंत राहूं शकत नाहींत. आपल्या राष्ट्रीय जीवनाचा झरा धर्म हाच होय. जर त्याचा प्रवाह शुद्ध आणि जोराचा असेल, तर बाकीच्या सर्व गोष्टी आपोआप नीट होतील. जर त्याचा प्रवाह पवित्र आणि जीवनदायी असेल, तर राजकीय, सामाजिक आणि इतर प्रकारच्या सांसारिक अडचणी दूर होतील. फार काय सांगावें? पण हा झरा शुद्ध असेल तर दारिद्र्याची जी मोठी अडचण तीही दूर होईल. रक्तांतील रोगजंतू निघून गेले आणि तें शुद्ध झालें ह्मणजे तेथें नव्या जंतूंचा प्रवेश होणार नाहीं. एखाद्या रोगाचा प्रवेश शरिरांत होण्यास दोन प्रकारचीं कारणें लागत असतात. एक बाह्य रोगजंतू आणि दुसरें शारीरिक स्थिति. त्या रोगजंतूंचा प्रवेश शरिरांत होण्याजोगी शारीरिक स्थिति नसेल, तर त्यांचा प्रवेश तेथें होणार नाहीं. शरिराचा जिवटपणा कमी झाल्यानंतर रोगबीजें त्यांत प्रवेश करितात, पुष्ट होतात आणि शेंकडोंपटीनें वाढतात; पण अशा प्रकारची शारीरिक स्थिति नसेल तर जगांतील कोणत्याही रोगजंतूंच्या वाढीस तेथें अवसर मिळणार नाहीं. हीच गोष्ट राष्ट्रीय देहासही लागू आहे. राष्ट्रीय देह अशक्त झाला ह्मणजे राजकीय अथवा सामाजिक रोगबीजांचें आरोपण त्या देहांत होतें. त्या राष्ट्राचें शिक्षण आणि त्याची बुद्धि यांस कीड लागूं लागते आणि नंतर सर्व देहभर रोगाचा प्रसार होतो. आपणास हा रोग दूर करावयाचा असेल तर '**मूले कुठारः**' हा प्रयोग आपणास केला पाहिजे. त्या रोगबीजाच्या रक्तांतील उगमापर्यंत आपणांस पोहोंचलें पाहिजे. राष्ट्रदेहाची शक्ति वाढवून त्यांतील रक्त शुद्ध केलें पाहिजे. ह्मणजे तो बळकट होऊन बाहेरून येणाऱ्या विषाचा प्रतिकार करण्यास अथवा आंतील विष बाहेर फेंकून देण्यास समर्थ होईल. अशा प्रकारचा जिवटपणा प्राप्त करून देण्यास धर्म समर्थ आहे कीं नाहीं अथवा एकंदरीनें असें करणें योग्य आहे कीं नाहीं, इत्यादि प्रश्नांची चर्चा मला कर्तव्य नाहीं. धर्माच्या या सामर्थ्याचा शेवटीं सदुपयोग झाला किंवा दुरुपयोग झाला, तथापि धर्माच्या आंगीं सामर्थ्य आहे ही गोष्ट नाकबूल करतां यावयाची नाहीं. यांतून बाहेर पडावयास मार्ग नाहीं. तुह्मांस जें कांहीं कर्तव्य असेल, त्याची उभारणी धर्माच्या पायावर केल्यावांचून गत्यंतर नाहीं. आपल्या धर्मासंबंधीं माझ्या हृदयांत जो दृढ विश्वास आहे तो तुह्मांपाशीं

असला अथवा नसला तरी धर्माला धरूनच भावी कार्यांची उभारणी तुह्मीं केली पाहिजे. आमच्या राष्ट्राचें धर्माशीं इतकें ऐक्य होऊन गेलें आहे कीं, त्याला सोडून तुह्मीं कोणतीही गोष्ट करूं लागलां कीं तुमच्या कार्याचा खुर्दा झालाच. आमच्या राष्ट्राचें हें जीवनतत्त्व आहे. आणि त्यालाच दृढता आणण्याचा यत्न केला पाहिजे. या तत्त्वाला आपण चिकटून राहिल्यामुळेंच अनेक शतकांचे प्रचंड तडाखे सोसण्याचें सामर्थ्य आपणांस प्राप्त झालें. धर्माकरितां बाकीच्या सर्व गोष्टींची होळी केल्यामुळेंच आजवर काळाचे तडाखे आपण लीलेनें सोशित आलों आहों. आपल्या बापदाद्यांनीं आपलें सर्वस्व अर्पण केलें आणि वेळीं जीवही गमावले; पण त्यांनीं आपल्या धर्माचें रक्षण केलें आहे. परधर्मीयांच्या टोळधाडींनीं देवळांमागें देऊळ उध्वस्त केलें; पण त्यांची पाठ फिरतांच देवळाचीं शिखरें पुन्हां दिसूं लागत. दक्षिण हिंदुस्थानांतील व गुजराथेंतील सोमनाथासारखीं अनेक ठिकाणें तुह्मांस ओझेंभर ग्रंथांहूनही अधिक शहाणपण शिकवितील. आमच्या हिंदु मानववंशाचा इतिहास तुह्मांस शिकावयाचा असेल, तर भाराभर ग्रंथ वाचूनही जें ज्ञान तुह्मांस होणार नाहीं, तें ज्ञान हींच स्थळें तुह्मांस सहज साध्य करून देतील. शेंकडों टोळधाडीच्या खुणा या ठिकाणीं अद्यापिही आहेत. हजारों वेळां तेथें मोडतोड झाली तरी तितक्या वेळांही तीं पुन्हां बांधलीं गेलीं. त्यांची बळकटी अद्यापपर्यंत पूर्वीसारखीच कायम राहिली आहे. हिंदूंच्या मनोभूमिकेचा हा स्पष्ट चित्रपट आहे. आमच्या जीवितांत कशा प्रकारच्या रक्ताचा ओघ वाहात आहे हें या इतिहासावरून स्पष्टपणें समजण्याजोगें आहे. याकरितां आपल्या प्रत्येक चळवळीच्या मुळाशीं धर्म पाहिजे असें मी ह्मणतों. आतां दुसऱ्या कोणत्याही प्रकारची चळवळ तुह्मीं करूं नका असें माझें म्हणणें नाहीं. राजकीय किंवा सामाजिक चळवळी आवश्यक नाहींत, असें माझें मुळींच ह्मणणें नाहीं. माझें ह्मणणे इतकेंच कीं, धार्मिक सुधारणा ही पहिल्या पायरीची असून, दुसऱ्या सुधारणा कमी प्रतीच्या आहेत. आह्मां लोकांच्या मनाचा कल अत्यंत जोरानें जर कोणीकडे वाहात असला तर तो प्रथम धर्माच्या बाजूकडे आणि नंतर तो इतर गोष्टींकडे वळतो. याकरितां प्रथम त्याला अधिक बळकट केलें पाहिजे. हें कार्य कसें साध्य करावयाचें याबद्दल ज्या कांहीं

कल्पना माझ्या चित्तांत आहेत, त्या तुह्मांस सांगावयाच्या आहेत. अमेरिकेचा जाण्यासाठीं मी मद्रासचा किनारा सोडला, त्याच्या अगोदरही कित्येक वर्षांपासून या कल्पना माझ्या चित्तांत घोळत आहेत. मी अमेरिकेला आणि इंग्लंडला गेलों यांत माझा हेतु या कल्पनांना अधिक चालन देण्याचाच होता. अमेरिकेंतील धर्मपरिषदेंत भाषणें करण्याचा माझा यत्किंचितही हेतु नव्हता. त्या परिषदेमुळें माझ्या कल्पनांस मूर्त स्वरूप देण्याची संधी मिळाली इतकेंच. सर्व जगभर प्रवास करण्यांत या कल्पनाच मुळाशीं होत्या.

आपल्या ग्रंथांतरीं तत्त्वमौक्तिकांचा जो मोठा संग्रह आहे तो बाहेर आणणें हें आपलें पहिलें कार्य आहे असा माझा समज आहे. तो संग्रह एखाद्या अरण्यांत अथवा गुप्त तळघरांत असल्याप्रमाणें कांहीं थोड्याशा लोकांच्या हातांत मात्र आहे. तो तेथून बाहेर काढून चवाठयावर आणणें हें आपलें पहिलें काम आहे. तो ज्यांच्या हातांत आहे त्यांजपासून तो मिळविणें, एवढेंच नव्हे, तर ज्या भाषारूपी तिजोरींत तो सांठविला आहे, त्या तिजोरींतून तो बाहेर काढणें हें आपलें पहिलें कर्तव्य आहे. थोडक्यांत इतकेंच सांगावयाचें कीं, हा तत्त्वसंग्रह अगदीं सामान्य मनुष्यासही सुलभ करून देण्याची कामगिरी आपण प्रथम केली पाहिजे. कोणाला संस्कृत येत असो वा नसो, त्याला या तत्त्वसंग्रहाची ओळख करून द्यावयाचें काम आपलें आहे. या मार्गांतील पहिली अडचण ह्मटली ह्मणजे संस्कृत भाषा ही होय. ही आपली पुरातन भाषा अत्युच्च आहे यांत शंका नाहीं. पण आपलें सारें राष्ट्र संस्कृत भाषेच्या पंडितांचें बनल्याशिवाय हा संग्रह सर्वांस साध्य होणार नाहीं. संस्कृत भाषेच्या अभ्यासासंबंधीं तुह्मांस इतकेंच सांगावयाचें कीं, सारा जन्म मी त्या भाषेचा अभ्यास करीत असतांही अद्यापि प्रत्येक नवें पुस्तक मला खरोखरच अपरिचित वाटतें. अशा स्थितींत ज्यांना या भाषेचा अभ्यास करावयास फुरसत मिळाली नाहीं, अशांना ती शिकण्यास किती जड जाईल, हें तुह्मींच आपल्या मनाशीं ठरवा. याकरितां लोकांच्या चालू भाषेंत हीं सर्व तत्त्वें गुंफिलीं पाहिजेत, आणि त्याबरोबरच संस्कृताच्या अभ्यासासही जारीनें सुरवात झाली पाहिजे. कारण, संस्कृत भाषेचा केवळ ध्वनीही आमच्या मानवशाखेला तेज आणि शक्ति देण्यास

समर्थ आहे. श्रीरामानुज, चैतन्य आणि कबीर यांनीं आपापल्या वेळीं हिंदुस्थानांतील निकृष्ट वर्गास वर आणण्यास जे यत्न केले त्यांना किती सुंदर फलें आलीं ! तथापि त्यांच्या शिक्षणाला त्यांच्या हयातीनंतर मुळींच पालवी कां फुटली नाहीं व एका शतकाच्या आंतच त्यांचें शिक्षण नामशेष कां झालें, याचाही विचार आपण केला पाहिजे. निकृष्ट वर्गांची स्थिति त्यांनीं सुधारली यांत शंका नाहीं. या वर्गानें वर यावें अशी त्यांची उत्कट इच्छाही होती; पण या वर्गांत संस्कृत भाषेचा प्रसार करण्याच्या कामीं त्यांनीं आपलें सामर्थ्य खर्चिलें नाहीं. त्यांचें शिक्षण लौकर नष्ट होण्याचें कारण हेंच होय. संस्कृत भाषेचा अभ्यास बंद करण्यांत बुद्धांनींही फार मोठी चूक केली. आपल्या शिक्षणास अगदीं लौकर फळ यावें अशी बुद्धाची इच्छा होती; आणि याकरितां त्यानें त्या वेळीं प्रचारांत असलेल्या पाली भाषेचा उपयोग केला. बुद्धाची ही कल्पना फार उदात्त होती यांत शंका नाहीं. लोकांच्या चालू भाषेंत तो बोलत असे आणि यामुळें सामान्य जनाची समजूतही लौकर पटे. बुद्धानें ही मोठी अवर्णनीय कामगिरी केली. यामुळें तत्त्वप्रसाराचें कार्य दूरवर आणि लौकर झालें. पण त्याबरोबरच संस्कृत भाषेचा प्रसारही व्हावयास पाहिजे होता. उपयुक्त ज्ञानाचा प्रसार झाला खरा, पण त्याबरोबर संस्कृतीचा प्रसार झाला नाहीं; आणि संस्कृतीच्या अभावीं त्या कार्याला कांहीं वजनही राहिलें नाहीं. जगांत ज्ञानाचा कितीही मोठा प्रसार तुह्मीं केला, तथापि नुसत्या ज्ञानाचा फारसा उपयोग होणार नाहीं. त्याबरोबरच संस्कृतीही उत्पन्न झाली पाहिजे. ज्ञानाबरोबरच संस्कृतीही मानवी रक्तांत खेळूं लागली पाहिजे. ज्यांत ज्ञानाचा अत्यंत प्रसार झाला आहे, अशीं कित्येक राष्ट्रें आपणास ठाऊक आहेत; पण त्यांना या ज्ञानाचा खरा उपयोग कितपत झाला आहे पहा. ज्ञान असूनही संस्कृतीच्या अभावीं हीं राष्ट्रें वाघांच्या संघापेक्षां अथवा रानटी मनुष्यांच्या टोळ्यांपेक्षां अधिक किंमतीचीं नाहींत. ज्ञान हें मनुष्याच्या अंतःकरणांत फारसें खोल जात नाहीं. त्याचा प्रवेश फार तर वरच्या चामडीच्या आंत होऊं शकतो. एखाद्या कारणानें या चामडीचा ओरखडा निघाल्याबरोबर आंतील पशुत्व ताड्कन् उडी मारून बाहेर पडतें. अशा गोष्टी नित्य घडत आहेत आणि भावी संस्कृतीच्या प्रसारास हेंच मोठें भयावह स्थान आहे. सामान्य लोकांत

ज्ञानाचा प्रसार त्यांच्या चालू भाषेंत अवश्य करा. त्यामुळें त्यांस अनेक प्रकारची नवी माहिती मिळेल; पण एवढें केल्यानेंच आपला कार्यभाग संपतो असें मात्र समजूं नका. ज्ञानाच्या प्रसाराबरोबरच सुसंस्कृतीचा प्रसारही सामान्य लोकांत केला पाहिजे. ही संस्कृती प्राप्त झाल्याशिवाय सामान्य लोकांची परिस्थिति थोडीशी उच्च दर्जाची झाली तरी तो दर्जा टिकाऊ होणार नाहीं. ज्यांच्याजवळ संस्कृत भाषेचें भांडार आहे असा वर्ग पुन्हां वर येईल आणि सामान्य वर्गाच्या डोक्यावर पुन्हां आपलें प्रमुखत्व गाजवील यांत शंका नाहीं. याकरितां सामान्य वर्गास वरच्या पायरीस चढवून ती पायरी कायम ठेवावयाची असेल, तर संस्कृताचा अभ्यास त्यांनीं जारीनें सुरू केला पाहिजे, असें मी त्यांस पुनःपुनः बजावून सांगतों. वरिष्ठ जातीविरुद्ध लेख लिहून आणि तोंडास फेंस येईपर्यंत मोठमोठीं भाषणें करून कांहीं फायदा नाहीं. अशा भाषणांनीं यत्किंचितही हित न होतां दुर्दैवानें आधींच फाटलेला समाज अधिकाधिक फाटत मात्र जाईल. सर्व जातींची समानता साध्य करून घ्यावयाची असली तर उच्च जातींच्या विद्या आणि त्यांची संस्कृती हीं स्वतःच्या आंगीं मुरविण्यावांचून सामान्य वर्गीयांस दुसरें गत्यंतर नाहीं. तुह्मीं हें साध्य करून घेतलें तर तुमचे सर्व हेतू सफल होतील. आतां मद्रासेंतील एका विशिष्ट प्रश्नासंबंधीं थोडीशी चर्चा मला करावयाची आहे. या प्रश्नाचें महत्व विशेषतः मद्रास इलाख्या-पुरतेंच आहे. दक्षिण हिंदुस्थानांत द्रावीड या नांवाचा एक मानववंश होता, आणि उत्तर हिंदुस्थानांतील आर्यवंशाहून तो अगदीं भिन्न होता, अशा प्रकारची एक उपपत्ति बाहेर आली आहे. दक्षिण हिंदुस्थानांत जे सध्यां ब्राह्मण आहेत तेवढेच काय ते उत्तरेकडून आलेले आर्य असून दक्षिणेंतील इतर जातींचे लोक भिन्न शाखेचे आहेत असें ही उपपत्ति ठरवूं पाहात आहे. या उपपत्तीच्या उत्पादकांस मला हात जोडून इतकेंच सांगावयाचें आहे कीं, महाराज, तुमच्या या उपपत्तीला यत्किंचितही पुरावा कोठें आढळत नाहीं. त्यांच्या दृष्टीनें असलेला पुरावा ह्मणून इतकाच कीं, उत्तर आणि दक्षिण यांत भाषाभिन्नत्व आहे. या भाषाभिन्नत्वाखेरीज दुसरें कोणतेंही भिन्नत्व उत्तर आणि दक्षिण या भागांतील लोकांत आढळून येत नाहीं. आपल्या या सभेंत उत्तर आणि दक्षिण या दोन्ही भागांतील लोकांची सरमिसळ झाली

आहे. यांतून वेगवेगळे वर्ण कोणीही युरोपियनानें ओळखून काढावे असें मी त्यांस आव्हान करतों. भिन्नत्व काय तें भाषेपुरतेंच आहे. ब्राह्मण वर्ण येथें आला तेव्हां संस्कृत भाषा बोलत होता; पण आतां आपली भाषा विसरून द्राविड भाषा त्यांनीं घेतली आहे ही गोष्ट निःसंशय आहे. मग इतर वर्णांनींही असेंच केलें नसावें असें मानण्यास काय पुरावा आहे? प्रत्येक जात उत्तरेकडून आली; तिनें द्राविडी भाषा आपलीशी केली आणि ती स्वतःची भाषा विसरली, असें झालें असण्याचा संभव कां नसावा? असल्या प्रकारच्या मूर्खपणाच्या गोष्टींवर मुळींच भरंवसा ठेऊं नका. मद्रासेकडे द्राविडी लोक प्राचीन काळीं कदाचित् राहत असतील; पण एकतर ते कदाचित् तेथून गेले असावे अथवा जे कोणी थोडे तेथें राहिले असतील, त्यांनीं अरण्याचा आश्रय केला असावा. उत्तरहिंदुस्थानांतून आलेल्या आर्यांनीं त्यांची भाषा घेतली असेल हें संभवनीय आहे; पण तेथें सांप्रत जी वस्ति आहे, ती सर्व उत्तरेकडील आर्यांचीच आहे. सर्व हिंदुस्थानांत आर्यांचेच वंश आहेत. त्यावांचून दुसरा कोणताही वंश येथें नाहीं. त्याचप्रमाणें शूद्र या नांवाची पूर्वींची एक रानटी जात येथें असावी अशीही एक कल्पना आहे; पण शूद्र ह्मणजे कोण? शूद्र ह्मणजे गुलाम. इतिहासाची पुनरावृत्ति होत असते अशा अर्थाची एक ह्मण इंग्रजींत आहे. या ह्मणीची आठवण येथें होते. अमेरिकन्, इंग्रज, डच आणि पोर्तुगीज् हे लोक आफ्रिकेंत गेले आणि तेथील रानटी लोकांस त्यांनीं कामास लाविलें. त्याच स्थितींत त्या लोकांत अनेक प्रकारच्या वर्णांची भेसळही झाली. अशा प्रकारची गुलामगिरी तेथें बराच काळ चालू राहिली. हें उदाहरण लक्ष्यांत आलें ह्मणजे आपलें मन हजारों वर्षांमागें उडी मारतें आणि हिंदुस्थानांतही असाच प्रकार घडला असावा, अशी कल्पना करूं लागतें. आमचे पुराणवस्तुसंशोधकही हिंदुस्थानांत पूर्वीं जिकडे तिकडे रानटी लोक होते आणि शुभ्रवर्णी आर्य येथें आले अशा प्रकारच्या कल्पना करूं लागतात; पण हे आर्यलोक आले कोठून, हें मात्र एका परमेश्वरासच माहित! कित्येक ह्मणतात कीं, ते मध्य तिबेटांतून आले. दुसरे कित्येक असें सांगतात कीं, ते मध्यआशियांतून आले. कांहीं देशाभिमानी इंग्रजांच्या मतें आर्यांचे केंस तांबडे होते, आणि दुसऱ्या कित्येकांच्या मतें ते काळे होते. आर्यलोक स्विट्झरलंडांतील तळ्यांभोंवतीं राहत होते असें

सिद्ध करण्याचाही एक नवा प्रयत्न होऊं लागला आहे. या सर्व कल्पना आणि त्यांचे उत्पादक यांना एकदमच जलसमाधी मिळाली तर मला खरोखरच फारसें वाईट वाटणार नाहीं. दुसरे कित्येक असेंही ह्मणतात कीं, ते उत्तरध्रुवाकडून आले. असल्या प्रकारच्या अनेक कल्पनांना आमच्या ग्रंथांतरीं निव्वळ एका शब्दाचाही आधार नाहीं. आर्यलोक हिंदुस्थानाबाहेरून आले असें ह्मणण्याला आमच्या प्राचीन ग्रंथांतरीं एकही पुरावा नाहीं. आतां आर्यावर्त या शब्दांत प्राचीन काळीं अफगाणाचाही समावेश होत असे ही गोष्ट मात्र खरी. या साऱ्या कल्पनांची अशा रीतीनें वासलात लागते. याकरितां शूद्र हा वर्ण अनार्य असावा आणि ते लोक रानटी असावे हें ह्मणणेंही चुकीचें ठरतें. अशा प्रकारचें मत बुद्धिग्राह्य होऊं शकत नाहीं. कांहीं मूठभर आर्य बाहेरून येथें आले आणि लक्षावधि गुलाम निर्माण करून येथें राहिले असावे हें संभवनीय नाहीं. असल्या मूठभर आर्यांची या लक्षावधि गुलामांनीं पांच मिनिटांच्या आंत चटणी केली असती. अनेक वर्ण कसे निर्माण झाले याचें विवेचन महाभारतांत केलें आहे. सत्ययुगाच्या कालीं फक्त ब्राह्मणांचा वर्णच अस्तित्वांत होता; आणि त्यानंतर निरनिराळे धंदे अस्तित्वांत आले; आणि त्या धंद्याबरोबरच जातींही निर्माण झाल्या असें भारतकारांचें ह्मणणें आहे. हें ह्मणणें अगदीं खरें आणि बुद्धीला पटण्यासारखें दिसतें. पुढें येणाऱ्या सत्ययुगांत हल्लींच्या अनेक जाती नाहींशा होऊन पूर्वीप्रमाणेंच पुन्हां सर्व परिस्थिति निर्माण होईल. याकरितां वर्णभेद नष्ट करण्याच्या नादीं लागून वरच्या वर्णांना खालीं ओढणें किंवा ब्राह्मणवर्ण नष्ट करून टाकणें चुकीचें आहे.

ब्राह्मणत्व हें साऱ्या वर्णांचें साध्य आहे. भगवद्गीतेवरील आपल्या टीकेच्या आरंभीं श्रीशंकराचार्यांनीं हेंच सांगितलें आहे. ब्राह्मणत्वाचें रक्षण करण्याकरितांच भगवान् श्रीकृष्णांनीं अवतार घेतला, असें श्री शंकराचार्यांनीं ह्मटलें आहे. श्रीकृष्णांच्या अवताराचा हाच हेतु होता. ब्राह्मण ह्मणजे ब्रह्म जाणणारा, ब्राह्मण ह्मणजे पूर्णत्व पावलेला, ब्राह्मण ह्मणजे ईश्वरास जाणलेला. असा ब्राह्मण हा सर्व वर्णांचें ध्येय असल्यामुळें नष्ट होतां उपयोगीं नाहीं. सांप्रतच्या ब्राह्मण जातींत अनेक प्रकारचे दोष असले, तथापि एक गोष्ट मात्र आपणा सर्वांस कबूल केलीच पाहिजे. ती गोष्ट ही कीं, खरें

ब्राह्मणत्व ज्यांच्या आंगीं आहे, अशीं माणसें त्या जातींत आजपर्यंत जितकीं निर्माण झालीं, तितकीं दुसऱ्या कोणत्याही जातींत निर्माण झालीं नाहींत, ही गोष्ट सर्वथैव खरी आहे. सर्व जातींनीं हें श्रेय ब्राह्मण जातीला दिलेंच पाहिजे. त्या जातीचे दोष दाखविण्यास लागणारा धीटपणा आणि शौर्य आपल्या आंगीं असावें ही गोष्ट खरी; पण त्याबरोबरच त्यांचे गुणही कबूल करण्यास आपण तयार असलें पाहिजे. मित्र हो! जातीजातींनीं आपापसांत तंटे करीत राहावें हें योग्य नाहीं. यापासून कोणता चांगला परिणाम होईल असें तुह्मांस वाटतें? यापासून भेद अधिक होतील, संघशक्ति नाहींशी होईल, सर्वांस अधिक दुर्बलता येईल आणि सर्वांचीच अधोगति मात्र होईल. समाजांत कांहीं विशिष्ट व्यक्तींस विशिष्ट प्रकारचे सामाजिक हक्क असण्याचा काळ निघून गेला. ब्रिटिश अमलांत जे अनेक लाभ आपणांस झाले, त्यांपैकींच हा एक मोठा लाभ आहे. मुसलमानी अमलांतही हें विशिष्ट हक्कांचें खूळ बरेंच नष्ट झालें होतें. एकंदरींत विचार करतां मुसलमानी अमदानीही फारशी वाईट नव्हती असें आढळून येईल. सर्वच चांगली अथवा सर्वच वाईट अशी एकही वस्तु या जगांत नाहीं. पायाखालीं तुडविल्या गेलेल्या लक्षावधि गरीब लोकांस मुसलमानांच्या राज्यांत सुखाचे दिवस दिसले. आपल्या लोकांपैकीं एक पंचमांश प्रजा मुसलमान कां झाली याचें कारण हेंच होय. केवळ तरवारीच्या धारेनेंच मुसलमानी धर्माचा इतका प्रसार येथें झाला नाहीं. जाळपोळ आणि कापाकापी या साधनांनीं मुसलमानी धर्म येथें इतका फैलावला असें ह्मणणें मूर्खपणाचें आहे. पूर्वी ज्याप्रमाणें एक पंचमांश लोक मुसलमान झाले त्याचप्रमाणें आतां एक पंचमांश काय, पण अर्धे लोकही ख्रिस्ती होतील. असें होऊं नये याची खबरदारी तुह्मींच घेतली पाहिजे. मलबारांत मला जो एक देखावा दिसला, त्याहून अधिक प्रतीचा मूर्खपणा इतरत्र कोठें आढळेल असें मला वाटत नाहीं. ज्या रस्त्यांतून एखादा उच्चवर्णीय ब्राह्मण जात असेल, त्यावरून एखाद्या महाराला जाण्याची परवानगी तेथें नाहीं; पण तेंच त्यानें एखादें वेडेंवांकडें इंग्रजी नांव घेतलें किंवा तोच उद्यां एखादा हुसेनमिया झाला कीं त्याचा सारा विटाळ नष्ट होतो. अशा प्रकारच्या गोष्टी ऐकल्या ह्मणजे मलबारी लोक शुद्ध वेडे असून त्यांचीं घरें ह्मणजे वेड्यांचीं

इस्पितळें असावीं असें वाटूं लागतें. असल्या प्रकारच्या लोकांवर त्यांनीं आपल्या रीतीभाती सुधारीपर्यंत सर्व हिंदवासियांनीं तिरस्काराचा वर्षाव केला पाहिजे. असल्या प्रकारच्या दुष्ट आणि राक्षसी चालीरितींचा आश्रय करणारांस धि:कार असो. महारांचीं मुलें भुकेनें मेलीं तर त्यांच्या तोंडांत अन्नाचा एक घांसही कोणी घालणार नाहीं; पण त्यांनीं आपला धर्म सोडला तर मात्र त्यांस पोटभर खाण्यास मिळतें ! याकरितां जातीजातींतील सर्व तंटे यापुढें प्रथम नष्ट करणें अवश्य आहे.

हिंदुस्थानांतील जातीजातींमधील तंट्यांचें निर्मूलन व्हावयाचें असेल तर हें कार्य उच्चवर्णीयांना खालीं ओढून होणार नाहीं. हें साध्य करण्यास खालच्या वर्णाची परिस्थिति सुधारून त्यांस अधिक उच्च केलें पाहिजे. आमच्या जुन्या ग्रंथांतही हाच उपाय सांगितला आहे. स्वत:च्या जुन्या ग्रंथांचें ज्ञान आणि त्यांतील रहस्य समजण्याची पात्रता ज्यांच्या आंगीं यत्किंचितही नाहीं अशा शेंकडों लोकांनीं जुन्या ग्रंथांची केलेली निंदा तुह्मी खरी मानूं नका. हें रहस्य जाणण्याची पात्रता त्यांच्या आंगीं नाहीं; पण ज्यांच्या आंगीं ही पात्रता आहे त्यांना ही गोष्ट समजली आहे; आणि भावी कार्याची दिशा कशी असावी याचेंही पूर्ण अनुमान त्यांस झालें आहे. अशीं मनुष्यें तंट्यभांडणांत गुरफटलेलीं सांपडावयाचीं नाहींत. त्यांचा मार्ग सर्वांहून अगदीं भिन्न असतो. राष्ट्रीय जीवनाचा झरा युगानुयुगें कसा वाहत आला आहे हें त्यांच्या अवलोकनांत असतें. ब्राह्मणत्व हें हिंदुसमाज पद्धतीचें अखेरचें साध्य असून चांडालत्व ही तळची पायरी आहे. समाजाला चांडालत्वापासून ब्राह्मणत्वापर्यंत पोहोंचविणें हें आपलें साध्य आहे. हळूहळू चांडालांची पायरी वर येत आहे व त्यांस अधिकाधिक हक्क प्राप्त होत आहेत हें तुमच्या ध्यानीं येईल. "शूद्रानें वेदवाक्य ऐकलें तर त्याच्या कानांत शिशाचा रस ओतावा आणि श्रुतींतील एखादी ओळ त्याच्या ध्यानांत राहिली तर त्याची जीभ कापावी. त्यानें ब्राह्मणाचा अधिक्षेप केला तरी सुद्धां त्याची जीभ कापावी" असल्याप्रकारचीं वाक्यें ज्यांत लिहिलीं आहेत असे ग्रंथ आढळण्यांत येतात ही गोष्ट खरी; पण हा निव्वळ राक्षसी रानटीपणा आहे यांत शंका नाहीं. तथापि समाजांतील कांहीं चालीरितींची नुस्ती नोंद ज्यांनीं करून ठेविली त्या स्मृतिकारांस दोष देण्यांत तात्पर्य

नाहीं. सर्व युगांत राक्षसी वृत्तीचे लोक जन्मास येत असतात. अशीं माणसें कधीं कमी अथवा कधीं अधिक प्रमाणांत आढळतात; पण प्रत्येक युगांत तीं थोडीफार असतातच; ही पहिली राक्षसी वृत्ति पुढें हळूहळू मावळत गेल्याचेंही दृष्टोत्पत्तीस येतें. उदाहरणार्थ "शूद्राचा छळ करूं नका, पण त्यांना उच्चप्रतीचें ज्ञान शिकवूं नका" अशीं वाक्येंही कोठें कोठें आढळतात. यानंतर ज्या स्मृति अस्तित्वांत आल्या व ज्यांना सध्यां अधिक महत्व आहे त्यांत शूद्रांना ब्राह्मणांच्या आचरणाचें अनुकरण करण्यास उत्तेजन द्यावें अशाही अनुज्ञा आढळतात; व अशा रीतीनें शूद्रत्वाची पायरी हळूहळू वर येत आहे. हें कार्य कसें होत आहे त्याचा सर्व तपशील सांगण्यास मला वेळ नाहीं; परंतु ज्या गोष्टी आज स्पष्ट दिसत आहेत त्यांवरून खालच्या जाती हळूहळू वर येत आहेत हें स्पष्ट दिसून येईल. हजारों जातींपैकीं कित्येकांचा हळूहळू ब्राह्मण वर्णांत प्रवेश होत आहे. आपण ब्राह्मण आहों असें ह्मणविण्यास सध्यां कोणत्याही जातीला कसल्या तरी प्रकारचा प्रत्यवाय आहे काय? दहा हजार लोक जींत आहेत अशी एखादी जात आहे अशी कल्पना आपण करूं. आतां असें समजा कीं, या सर्वांनीं मिळून उद्यांपासून स्वतःस ब्राह्मण म्हणविण्याचें ठरविलें तर तसें करण्यास त्यांस कोण अडथळा आणूं शकणार आहे? अशा प्रकारचीं उदाहरणें मीं आपल्या डोळ्यांनी पाहिलीं आहेत. कित्येक जाती वरच्या पायरीस चढतात आणि स्वतःस ब्राह्मण म्हणवूं लागतात. अशाच प्रकारें येथें हजारों जाती निर्माण झाल्या आहेत. जोंपर्यंत कोणतीही जात इतर जातीशीं तंटाभांडण करूं इच्छित नाहीं व केवळ स्वतःच वेगळी होऊं पहाते तोंपर्यंत तिला तसें करण्यास कोणतीही आडकाठी नाहीं. एखाद्या जातींतील पोटजातींतही असा प्रकार घडून आला तथापि इतर पोट जाती तिकडे लक्ष्य देत नाहींत. श्रीशंकराचार्यादि शककर्त्यांनीं अनेक प्रकारच्या जाती निर्माण केल्या. त्यांनीं जे अनेक घोंटाळे केले त्या सर्वांची तपशिलवार यादी मला तुह्मांस देतां येत नाहीं; आणि तसें केल्यास तुह्मांस तें रुचणारही नाहीं; पण माझ्या प्रवासांत मला जे कित्येक अनुभव आले त्यांवरून अनेक घोंटाळे मला समजले आहेत. या शककर्त्यांनीं कित्येक वेळां हजारों बलुची लोकांस क्षत्रियत्व दिलें आहे; आणि दुसऱ्या कित्येकांनीं कोळ्यांस ब्राह्मण केलें आहे. हे शककर्ते ऋषी

आणि सत्पुरुष होते. यांनीं केलेल्या कृतीपुढें आपण आपली मान वांकविलीच पाहिजे. याकरितां ज्यांना या ऋषींची आणि सत्पुरुषांची ही शक्ति हवी असेल त्यांनीं स्वतः ऋषि व्हावें हाच योग्य मार्ग आहे. ऋषींचें सामर्थ्य मिळविण्याचें रहस्य स्वतः ऋषी होऊनच मिळण्याजोगें आहे. आपणा सर्वांस ऋषी होतां येईल; कारण, ऋषि म्हणजे पवित्र पुरुष. मग आपणा सर्वांस पवित्रत्व प्राप्त करून घेण्यास काय हरकत आहे? प्रथम पवित्र व्हा म्हणजे सर्व प्रकारचें सामर्थ्य तुह्मांस आपोआप प्राप्त होईल. पण " मी ऋषी आहें " एवढें नुस्तें तोंडानें ह्मटलें म्हणजे मात्र हें कार्य होणार नाहीं. खरें ऋषित्व तुमच्या आंगीं आलें म्हणजे सामान्य लोक तुमच्या आज्ञा आपोआप पाळूं लागतात. तुमच्या आंगीं अशा स्थितींत जें गुप्त तेज असतें तें इतरांस तुमची आज्ञा ऐकावयास भाग पाडतें. सामान्य लोकांची इच्छा असो वा नसो तुमचें म्हणणें त्यांस निमुटपणें ऐकावें लागतें आणि तुमच्या इच्छेप्रमाणें त्यांस चालावें लागतें. खरें ऋषित्व अशा प्रकारचें आहे.

अनेकप्रकारच्या जातींतील तंटे नाहींसे करण्यास जे अनेक उपाय योजिले पाहिजेत त्यांची घटना थोड्याशा काळांत साध्य होणार नाहीं. या घटनेचें कार्य पिढ्यांमागें पिढ्या चाललें पाहिजे. हें कार्य सिद्ध होण्याची किती आवश्यकता आहे हेंच प्रथम मला तुह्मांस सांगावयाचें आहे. सध्यां जातींजातींत अनेक प्रकारचे वादविवाद सुरु आहेत, ही मोठ्या दुःखाची गोष्ट आहे. हे वादविवाद प्रथम बंद झाले पाहिजेत. दोन्हीं पक्षीं या वादविवादांचा उपयोग नाहीं. विशेषतः ब्राह्मणांनीं तरी या वादांत पडूं नये. कारण, विशिष्ट हक्काचे दिवस पूर्वीच निघून गेले, हें मीं अगोदरच सांगितलें आहे. अशा विशिष्ट हक्कवाल्यांनीं आपल्या हक्कांवर तिलांजली देण्यास सिद्ध झालें पाहिजे. आणि हें कार्य ते जितक्या लवकर करतील तितकें बरें. आपल्या हक्कांसाठीं ब्राह्मण जों जों अधिक ओढाताण करतील तों तों त्रास मात्र अधिक; यावांचून दुसरा कोणताही फायदा त्यांच्या पदरीं पडणार नाहीं. याकरितां हिंदुस्थानांतलि सर्व कनिष्ठ जातींच्या उद्धारार्थ कंबर बांधणें हें आज ब्राह्मणांचें पहिलें कर्तव्य आहे. ब्राह्मणवर्ग जोंपर्यंत हें कार्य करीत असेल तोंपर्यंतच तो खरा ब्राह्मण. पैसे मिळ-

विण्याचा धंदा करणारा मनुष्य ब्राह्मण नव्हे. तसेंच इतर जातीनींही खऱ्या ब्राह्मणांना शक्य त्या प्रकारची मदत केली पाहिजे. खऱ्या ब्राह्मणांचा योगक्षेम इतर जातींनीं चालविला पाहिजे. पण असें करतांना खरें ब्राह्मणत्व कोणापाशीं आहे याचाही विचार त्यांनीं अवश्य करावा. अपात्रीं दान दिल्यानें अधोगती प्राप्त होते आणि सत्पात्रीं केलेल्या दानानें स्वर्ग मिळतो असें ग्रंथांतरीं सांगितलें आहे. याकरितां पात्राची योग्यता पाहणें हेंही अवश्य आहे. ज्याला कोणत्याही प्रकारचा लौकिक-धंदा नाहीं तो ब्राह्मण. लौकिक धंदे ब्राह्मणांकरितां नसून इतर जातीं-करितां आहेत. स्वतःस जें ज्ञान प्राप्त झालें आहे तें इतर जातीस देऊन त्यांची स्थिति सुधारण्याविषयीं मी ब्राह्मणवर्णास विनंति करितों. कित्येक शतकेंपर्यंत जी संस्कृति ब्राह्मणवर्णानें आपल्या आंगीं मुरविली आहे ती आतां त्यांनीं इतरांस दिली पाहिजे. खरें ब्राह्मणत्व कशांत आहे हें ब्राह्मणांनीं जाणिलें पाहिजे. " सर्व सद्गुणांचा संग्रह ब्राह्मणांपाशीं असल्यामुळें त्यांना विशिष्ट हक्क आणि विशेष मान हीं दिलीं पाहिजेत " असें मनूनें ह्मटलें आहे. ब्राह्मणांपाशीं हा जो निधि आहे तो खुला करून त्यांतील संपत्ति त्यांनीं आतां जगाला वांटली पाहिजे. हिंदूधर्माचें अखेरचें साध्य त्याग हें आहे. मानवी जीवनक्रमांतील अखेरचें साध्य जी मुक्ति ती साधण्यास त्यागाची आवश्यकता आहे. हा त्यागाचा मार्ग प्रथम ब्राह्मणांनीं स्वीकारला व ज्या वेळीं इतर जातींस या कल्पनेचा स्पर्शही झाला नव्हता, तेव्हां त्या गोष्टीचा प्रत्यक्ष आचार प्रथम करून ब्राह्मणांनींच इतरांस धडा घालून दिला ही गोष्ट खरी. यांत ब्राह्मणांनीं सर्वांच्या पुढें आघाडी मारिली हा त्यांचा दोष नव्हे. ब्राह्मणांच्या बरोबरीनें चालून त्यांचे सर्व गुण आपल्या आंगीं आणण्याची इतर जातींस कोणी मनाई केली होती काय ? ब्राह्मण एकसारखे पुढें सरसावत असतां इतर जाती हात जोडून स्वस्थ कां बसल्या ? तथापि सद्गुणांचें सामर्थ्य आंगीं आणून घेणें हें वेगळें आणि त्याचा पुढें दुरुपयोग करणें हें वेगळें. सामर्थ्याचा दुरुपयोग केला तर तें कृत्य राक्षसी ह्मटलें पाहिजे. सामर्थ्याचा उपयोग फक्त सत्कार्य-सिद्धीकडेच केला पाहिजे. अनेक युगांच्या संस्कृतीची ठेव ब्राह्मणवर्णापाशीं आहे आणि तींतील भाग त्यानें आतां सर्व सामान्य लोकांस दिला

पाहिजे. ही ठेव ब्राह्मणवर्ग आजपर्यंत कृपणाप्रमाणें दडपून बसल्यामुळें हिंदुस्थानावर मुसलमानी राज्य होणें शक्य झालें. आज हजारों वर्षें कोणत्याही जेत्यापुढें आह्मास मान वांकवावी लागत आहे, याचेंही कारण हेंच कीं, या ठेवीचा उपयोग सामान्य लोकांस न होतां ती फक्त एका वर्गाच्याच ताब्यांत आहे. आज जी आमची इतकी अवनति झाली आहे, तिचेंही कारण हेंच. याकरितां आमच्या पूर्वजांनीं जो बहुमोल ठेवा सांठवून ठेविला आहे, तो या गुप्त तळघराचीं दारें फोडून तेथून बाहेर काढणें हें आपलें पहिलें कर्तव्य आहे. त्यांतील अंश प्रत्येकास मिळण्याची तजवीज केली पाहिजे; आणि ही तजवीज करणें हेंही ब्राह्मणांचेंच काम आहे. साप चावला असतां त्या जखमेंतील विष त्याच्याकडून चोखविलें तर रोगी उतरतो असा एक जुना समज बंगाल्यांत आहे. त्याचप्रमाणें ज्या विषाचें बिजारोपण ब्राह्मणांनीं केलें, तें विष त्यांनींच आतां चोखून घेतलें पाहिजे. ब्राह्मणेतर जातींस माझें इतकेंच सांगणें आहे कीं, बाबांनों, जरा दमानें घ्या; फार घाई करूं नका. ब्राह्मणांशीं तंटे करण्याचा प्रत्येक प्रसंग वायां जाऊं द्यावयाचा नाहीं असें करूं नका. कारण, एक गोष्ट पक्की ध्यानांत धरा कीं, तुमचें जें नुकसान झालें आहे, त्याला कारण तुमचे तुह्मीच आहां. संस्कृतविद्या आणि धर्मतत्त्वें हीं शिकूं नका, असें तुह्मांस कोणी सांगितलें होतें काय? आतांपर्यंत तरी तुह्मी काय करीत आहां? या विद्येबद्दल तुमच्या ठिकाणीं जी उदासीनता आजही दिसून येते ती कां? इतर लोकांनीं आपल्या मेंदूचा अधिक चांगला उपयोग केला याबद्दल तुह्मां आतां हातपाय कां आपटावे? इतरांनीं या विद्येच्या मागें लागण्यांत अधिक चिकाटी आणि अधिक आतुरता दाखविली याबद्दल तुह्मी कां संतापावें? याकरितां वर्तमानपत्रांतून अथवा स्वतःच्या घरांतून वादविवाद करीत बसण्याऐवजीं ब्राह्मणांनीं जी संस्कृति आपलीशी केली आहे, ती तुह्मीही आपलीशी करा. फुकटचा वादविवाद करण्यापेक्षां तुह्मी स्वतःच सुसंस्कृत झालांत ह्मणजे कार्यभाग संपला. तुह्मीं संस्कृत भाषेंत प्राविण्य कां मिळवीत नाहीं? हिंदुस्थानांतील सर्व जातींस संस्कृत भाषेचें ज्ञान प्राप्त व्हावें एतदर्थ लक्षावधि रुपये तुह्मी कां खर्च करीत नाहीं? तुह्मी या सर्व गोष्टी केल्या तर ब्राह्मणांच्या बरोबरीचे आपोआपच तुह्मी व्हाल. हिंदुस्थानांत सामाजिक शक्ति प्राप्त करून घेण्याचा हाच मार्ग आहे.

संस्कृत भाषेंतील प्राविण्य आणि मनुष्याचें समाजांतील महत्व हीं आमच्या देशांत बरोबरीनें चालतात. यांतील पहिलें प्राप्त झालें, कीं दुसरें आपोआप येतें. मग तुह्माविरुद्ध कोणी एक चकार शब्दसुद्धां उच्चारणार नाहीं. हें रहस्य ध्यानांत बाळगून त्याचा फायदा घ्या. आमच्या जुन्या अद्वैत सिद्धांताप्रमाणें सर्व विश्व एका प्रकारच्या भारलेल्या स्थितींत आहे. स्वतःची इच्छा हीच शक्ति आहे. प्रत्येकाचें सामर्थ्य त्याच्या इच्छाशक्तीवर अवलंबून आहे. ज्याची इच्छाशक्ति अत्यंत प्रबल असेल, असा मनुष्य स्वतःभोंवतीं तेजोवलय उत्पन्न करीत असतो; आणि त्याच्या भोंवतीं जे कोणी असतील, त्यांस तो स्वतःच्या इच्छेप्रमाणें वागावयास लावतो. असे विशाल इच्छाशक्तीचे पुरुष मधूनमधून निर्माण होत असतात. अशाप्रकारचे पुरुष निर्माण झाले ह्मणजे स्वतःतील विचारांची प्रेरणा ते सामान्य जनांत करतात, आणि त्या विचारांच्या चालनेमुळें सामान्य जनही सामर्थ्यवान् होतात. सामान्य जनांच्या संघटित समूहांत जें सामर्थ्य नेहमीं दिसून येते तें कां? संघटना ही केवळ लौकिक आहे असें समजूं नका. संघटनेंत सामान्य शक्तीहून अधिक प्रतींच्या शक्तींचा वास असतो. चार कोट इंग्रजलोक तीस कोट हिंदवासियांवर अंमल कां करितात, याचें रहस्य ध्यानीं आणा. या देखाव्याचें अंतर्गत रहस्य काय आहे, याचा विचार करा. हे चार कोट लोक संघटनेनें आपल्या सर्व इच्छाशक्ती एकवटून ठेवीत आहेत. या समीकरणांतून अपरिमित शक्ति बाहेर पडत असते, आणि तुह्मां तीस कोट लोकांत ही सर्व शक्ति आपापल्यापरी वेगवेगळ्या मार्गानें जात असते. याकरितां भावी हिंदुस्थानास उन्नतावस्था प्राप्त व्हावी अशी तुमची इच्छा असेल तर या अनेक इच्छाशक्तींचें समीकरण झालें पाहिजे, या सर्व इच्छाशक्ती एकवटल्या पाहिजेत. या सर्व इच्छाशक्तींनीं परस्परांस पोषक झालें पाहिजे. अथर्ववेद संहितेंतील एक सुंदर ऋचा मला आठवते, ती अशीः—" तुह्मी सर्व एकचित्ताचे व्हा. तुह्मा सर्वांच्या हृदयांत एकाच प्रकारचे विचार असूं द्या. कारण पूर्वकालीं सर्व देव एकच विचारानें वागत, यामुळें हविर्भाग मिळविण्याची योग्यता त्यांस प्राप्त झाली. सर्व देव एकचित्ताचे आहेत ह्मणूनच मनुष्यांनीं त्यांची पूजा करावी अशी योग्यता त्यांस प्राप्त झाली. " आपल्या मनुष्यसमाजासही हीच गोष्ट लागू आहे. सर्वांनीं एक दिलानें असणें

हेंच समाजाच्या सामर्थ्याचें रहस्य आहे; आणि 'हा द्राविड आणि हा आर्य व हा ब्राह्मण व तो शूद्र ' असल्या प्रकारचीं शुष्क भांडणें जोंपर्यंत तुह्मीं भांडत राहाल, तोंपर्यंत तुह्मांस सामर्थ्य प्राप्त होणार नाहीं. ज्या सामर्थ्यांतून आणि इच्छाशक्तींतून भावी हिंदुस्थना निर्माण होणार त्या इच्छाशक्तीची प्राप्ति तुह्मांस अशारीतीनें होणार नाहीं. भावी हिंदुस्थानाचें दैव तुमच्या हातीं आहे, ही गोष्ट पक्की ध्यानांत धरा. इच्छाशक्तींची संघटना आणि अनेक इच्छाशक्तींचें समीकरण हेंच भावी उदयाचें रहस्य आहे. चिनांत कोट्यवधि मनुष्यांची वस्ती आहे; पण त्यांतील प्रत्येकाची विचारशक्ति वेगवेगळ्या मार्गानें जात आहे. उलटपक्षीं मूठभर जपानी लोकांच्या इच्छाशक्तीचें एकीकरण झालें आहे. या दोन वेगवेळ्या प्रकारांचें फळ काय आहे, हें आज आपण प्रत्यक्ष पहात आहोंच. साऱ्या जगाच्या इतिहासांत हाच नियम अबाधित चालला असल्याचें तुह्मास आढळून येईल. राष्ट्र लहान पण सर्व एक विचाराचें असलें ह्मणजे विस्कळित अशा एखाद्या मोठ्या राष्ट्रावर तें अम्मल चालवीत असतें. असें असणें हें एका अर्थी रास्तच आहे. राष्ट्र लहान असलें ह्मणजे सर्व इच्छाशक्ती एका केंद्रांत आणण्यास सोपें जातें, व यामुळें त्याच्या उन्नतीचा मार्ग मोकळा होतो; आणि तेंच राष्ट्र फार मोठें असलें ह्मणजे त्याची संघटना करणें जड जातें. मोठ्या राष्ट्रांतील समाज एखाद्या अव्यवस्थित कळपाप्रमाणें वागत असल्यामुळें त्यांत संघटना उत्पन्न होत नाहीं. याकरितां हे क्षुल्लक तंटे आपण प्रथम थांबविले पाहिजेत.

याशिवायही आणखी एक उणीव आपल्यांत आहे. अनेक शतकांच्या दास्यामुळें आपलें राष्ट्र अगदीं बायकी बनून गेलें आहे. माझ्या भगिनींनो, मला क्षमा करा; जें सत्य आहे तें मला कथन केलेंच पाहिजे. आमच्या या देशांत काय, अथवा दुसऱ्या देशांत काय, तीन बायका पांच मिनिटें सुद्धां तंटा केल्याशिवाय एकत्र नांदावयाच्या नाहींत. युरापांतील देशांत बायका मोठमोठे संघ स्थापन करितात, आणि स्त्रियांची शक्ति मोठी अफाट आहे, अशा प्रचंड वल्गनाही करतात; पण पुढें थोड्याच काळानें त्या भांडूं लागतात. मग त्यांचीं भांडणें सोडविण्यास एखादा पुरुष पुढें येतो आणि पुढें त्याचा अंमल जारी होतो. स्त्रियांना शिस्तीनें वाग-

विण्यास कोणीतरी पुरुषच पाहिजे हें साऱ्या जगभर आढळून येतें. सांप्रत आह्मी पुरुषही स्त्रियांप्रमाणेंच झालों आहों. स्त्रियांचा पुढाकार घेण्यास एखादी स्त्री पुढें सरसावली, तर त्याच स्त्रिया वाग्बाणांचा वर्षाव करतील, आणि तिला फाडफाडून घेतील. अशा स्थितींत त्या बिचारीला आपलें काम सोडणें भाग पडेल; पण त्यांचा पुढारी पुरुष असला आणि त्यानें चार कडक शब्दांनीं त्यांची झाडणी केली व मधूनमधून हें झाडणीचें काम असेंच चालू ठेविलें तर त्या तें सर्व निमूटपणें ऐकून घेतील. कारण, कडक शब्दांच्या जादूनें भारलें जाणें हें स्त्रियांच्या अंगवळणीं पडलें आहे. सारें जग असल्या शाब्दिक जादुगारांनीं आणि मांत्रिकांनीं भरलेलें आहे. अशाच रितीनें आपला एखादा देशबंधु कसल्याही कार्यांत थोडेंसें डोकें वर काढूं लागला, कीं वरून काठी हाणण्यास आपण नेहमीं तयार असतों; व तोच एखादा विदेशी आह्मांस लाथा मारूं लागला, तर त्याची आह्मांला मुळींच क्षिति वाटत नाहीं. लाथा खाणें जणूंकाय आमच्या अगदीं अंगवळणींच पडून गेलें आहे. असले गुलाम मोठ्या धन्याच्या पदवीपर्यंत चढूं पाहतात हें आश्चर्य नव्हे काय? याकरितां ही गुलामगिरी प्रथम सोडून द्या. पुढील पन्नास वर्षें या एकाच मुद्यावर आपण खर्च केलीं पाहिजेत. या पन्नास वर्षांत आपल्या मातृभूमीचीच देवता आपल्या हृदयांत बाळगिली पाहिजे. या काळांत सगळ्या देवदेवतांस रजा द्या. आपल्या हृदयांत जो देव बाळगावयाचा तो हा एकच. सर्वत्र त्याचेच हात, पाय व इतर अवयव आपणास दिसले पाहिजेत. वस्तुमात्रांत याच देवतेची व्याप्ति आपण पाहिली पाहिजे. दुसरे देव सध्या झोंपीं गेले आहेत. आपल्या भोंवतीं असलेल्या या विराट स्वरूपाची पूजा न करितां दुसऱ्या अनेक देवतांच्या मागें आपण कां लागावें? प्रथम या देवतेची पूजा करावयास आपण शिकलों, म्हणजे इतर देवतांची पूजा आपणांस साध्य होईल. आपणा सन्निध असलेल्या या देवतेची पूजा आपण प्रथम करूं या. अर्धा मैल रांगण्याचेंही सामर्थ्य नसतां हनुमानाप्रमाणें समुद्र उल्लंघन करण्याची वेडी हांव आपण कशाला बाळगावी? असें होणें शक्य नाहीं. प्रत्येक जण ध्यान धारणा करून योगी होऊं पाहात आहे; पण ही गोष्ट शक्य नाहीं. सारा दिवस जगाशीं मिसळून अनेक प्रकारचीं कर्मे करावीं आणि संध्याकाळीं नाक दाबून योगसाधन करावें इतकें तें सोपें

आहे काय? मिनिट दोन मिनिटें तुह्मीं नाक दाबलें म्हणजे सारा ऋषिगण हवेंतून उडत उडत तुह्मांपाशीं येईल, असें तुह्मांस वाटतें काय? अशा रीतीनें या विषयाची तुह्मी निवळ थट्टा आरंभिली आहे. आपणास जर कोणत्याही गोष्टीची प्रथम जरूर असेल, तर ती गोष्ट चित्तशुद्धि ही होय. ही चित्तशुद्धि प्राप्त करून घेण्याचा खरा मार्ग म्हणजे विराटस्वरूपाचें पूजन हाच होय. आपणाभोंवतीं जें स्वरूप प्रत्यक्ष पसरलें आहे त्याचें पूजन करावें. आपणाभोंवतीं या साऱ्या परमेश्वराच्या मूर्ती पसरल्या आहेत. ज्यांचें पूजन आपणांस करावयाचें आहे, ते आपले देव ह्मणजे आपले देशबांधवच होत. आपणास त्यांच्याशीं भांडणें करणें अथवा त्यांचा मत्सर करणें, हीं कर्मे सोडून द्यावयाचीं आहेत. आपणास त्यांची भक्ति करावयाची आहे. पूर्वकालीं ज्या घोर कर्मांचें आचरण आपण केलें आहे, त्याचींच कडू फळें आपण सध्या चाखीत आहोंत. इतके चटके बसत असतांही आपले डोळे अद्यापि उघडूं नयेत ही केवढ्या आश्चर्याची गोष्ट आहे बरें!

हा विषय इतका विस्तीर्ण आहे कीं, तो कोठें पुरा करावा, हेंच मला समजत नाहीं. तथापि माझें भाषण मला पुरें केलेंच पाहिजे. याकरितां पुढील बेताची थोडी रूपरेषा दर्शवून तें मी पुरें करणार आहे. आपल्या देशाच्या ऐहिक आणि पारमार्थिक शिक्षणाची दोरी आपल्या हातांत राहिली पाहिजे. हें कार्य कसें करतां येईल, हाच विचार तुमच्या चित्तांत सदोदित जागृत राहिला पाहिजे. याच विषयाची बडबड तुह्मी सदोदित करीत राहावी. स्वप्नांत सुद्धां तुह्मांला हेंच दिसलें पाहिजे, आणि याच कार्यास तुह्मी स्वतः वाहून घेतलें पाहिजे. हें कार्य साध्य होईपर्यंत आमचा देश अवनतींतून वर येणार नाहीं. सांप्रत जें शिक्षण तुह्मांस मिळत आहे, त्यांत कांहीं चांगल्या गोष्टी आहेत; पण त्यापासून जो एक तोटा होत आहे, तो इतका मोठा आहे कीं, त्याच्यापुढें या चांगल्या गोष्टींचें चांगुलपण पार नाहींसें होतें. या शिक्षणापासून मर्द गडी तयार होत नाहींत, हा त्यांत मोठा दोष आहे. सध्याच्या शिक्षणानें जुन्याची मोडतोड करण्याचें काम मात्र चांगलें केलें आहे. असल्या प्रकारचें मोडतोडीचें शिक्षण हें मृत्यूहूनही वाईट आहे. मुलाला शाळेंत घातला, कीं तो पहिली गोष्ट शिकतो ती हीच कीं, त्याचा बाप मूर्ख आहे, त्याचा आजा वेडा होता, त्याचे गुरू दांभिक आहेत, आणि या सर्व

शिक्षणावरचा कळस ह्मणजे जुने धर्मग्रंथ सर्व खोटे आहेत, या ज्ञानानें बसविण्यांत होतो. अशा रीतीनें तयार झालेला हा बांड सोळा वर्षांचा झाला, ह्मणजे शुद्ध निर्जीव हाडांचा सांगाडा बनतो. अमुक असें नाहीं आणि तमुक तसें नाहीं, व हें खोटें व तें वाईट, असल्या नकारात्मक ज्ञानानें मात्र त्याचें डोकें तुडुंब भरलेलें असतें. अर्धशतक आपलें राष्ट्र सांप्रतच्या पद्धतींचें शिक्षण घेत असतांही, त्यांत स्वतंत्र शोधक बुद्धीचा एकही मनुष्य उभ्या हिंदुस्थानांत आढळूं नये हा कशाचा परिणाम आहे ? जि-च्यांत थोडी तरी स्वतंत्र बुद्धीचा झुळूक दिसून आली, अशा प्रत्येक व्यक्तीचें शिक्षण या देशांत झालें नसून, तें दुसऱ्या कोठें तरी झालें असल्याचें आढळून येईल. नुसती अनेक प्रकारची माहिती डोक्यांत खचून भरणें हें शिक्षण नव्हे. अनेक प्रकारचें कचें ज्ञान डोक्यांत राहिलें ह्मणजे सारा जन्म तें तेथें गोंधळ उडवून देत असतें. ज्यापासून आपला भावी आयुष्यक्रम पक्का होईल, ज्यापासून आपणास पौरुष प्राप्त होईल, आणि ज्यापासून दानतीची वाढ होईल,अशा प्रकारचें शिक्षण आपणास मिळालें पाहि-जे. जीं तत्त्वें आपणास शिकविलीं जातात, त्यांचें पुरें पचन होऊन त्यांतील सत्त्व आपल्या अंगीं मुरलें पाहिजे. अशा प्रकारचीं पाचक तत्त्वें तुमच्या अंगीं पूर्णपणें मुरलीं असतील आणि तीं तुमच्या दानतींत आणि आयुष्यक्रमांत प्रत्यक्ष दिसूं लागलीं असतील, तर नुसत्या आझेंभर पुस्तकांतील ज्ञानानें ज्यानें आपलें डोकें भरून घेतलें आहे, अशा माणसापेक्षां तुह्माला अधिक शिक्षण मिळालें आहे असें ह्मणतां येईल. ' **यथा खरश्चंदनभारवाही भारस्य वेत्ता न तु चंदनस्य** ॥ ' चंदनाचें ओझें वाहणारा गाढव त्याचें ओझें मात्र जाणतो, पण त्याची किंमत जाणत नाहीं. नुसती पुष्कळ माहिती असणें एवढ्याचाच अर्थ जर शिक्षण असा होऊं लागेल, तर जगां-तील पुस्तकालयें हींच मोठीं पंडित ह्मटलीं पाहिजेत. अशा स्थितींत मोठ्या ऋषिवर्यांचें स्थान विश्वकोशांस दिलें पाहिजे. याकरितां आपलें मुख्य साध्य हें आहे कीं, आमचें ऐहिक आणि पारमार्थिक साधन आमच्याच हातांत असलें पाहिजे; आणि शक्य असेल तोंपर्यंत तें राष्ट्रीय पद्धतीनें व राष्ट्रीय परंपरेस धरून दिलें गेलें पाहिजे. ही गोष्ट अचाट आहे, फारच मोठी आहे हें मी कबूल करितों. हें कार्य आपल्या हातून कधीं काळींतरी पार पडेल

कीं काय, याची मला शंकाच वाटते; तथापि कामाला आरंभ कलाच पाहि-जे. आतां हा आरंभ कसा केला पाहिजे, याचें थोडें दिग्दर्शन केलें पाहिजे. प्रथम आपणाला एक देऊळ बांधलें पाहिजे; कारण आमच्या हिंदूंच्या मानसिक परिस्थितीला धर्मापासून आरंभ करणें हेंच उचित आहे. अशा प्रकारें आरंभ केल्यास अनेक पंथ आणि पोटपंथ आपापसांत भांडूं लागतील, अशी कोणी शंका घेईल. या शंकेचें समाधान इतकेंच कीं, हें देऊळ कोणत्याही विशिष्ट पंथाचें नसून तेथें फक्त ' ॐ ' या ध्वनिदेवतेची प्रार्थना करावी. ही देवता अर्थातच सर्व पंथांना मान्य होईल. ' ॐ ' ज्याला मान्य नाहीं, तो स्वतःला हिंदु म्हणविण्यास पात्र नाहीं, असें खुशाल समजावें. सनातन-धर्माचें प्रतिपादन प्रत्येकानें आपापल्या कल्पनेप्रमाणें वेगवेगळें केल्यास हरकत नाहीं; तथापि आपणा सर्वांस सामान्य असें एक देऊळ पाहिजे. स्वतःच्या मताला योग्य वाटणाऱ्या प्रतिमांचें अथवा चिन्हांचें पूजन इतरत्र करण्यास कोणास हरकत नाहीं; पण या देवळांत मात्र त्यानें कोणाशीं तंटा करतां नये. या ठिकाणीं सर्व पंथांच्या मुळाशीं जीं आद्य तत्त्वें सर्वांस सारखींच उपयोगी पडणारीं आहेत, तीं शिकविलीं जावीं. त्याचप्रमाणें निरनिराळ्या पंथांच्या आचार्यांनीं आपापल्या पंथांचें प्रतिपादन तेथें करण्यास हरकत नसावी. त्यांनीं कोणाशीं तंटे करूं नयेत एवढा प्रतिबंध मात्र अवश्य आहे. तुह्मांला स्वतःचीं जीं कांहीं तत्त्वें शिकवावयाचीं असतील, तीं तुह्मी खुशाल जगाला सांगा. जगाला तीं हवींच आहेत; पण इतरांबद्दल तुमचें काय मत आहे, हें जाणण्याची जगाची इच्छा नाहीं. व वेळही नाहीं याकरितां हीं आपलीं मतें तुह्मी आपल्या जवळच ठेवावीं हें बरें. दुसरें असें कीं या देवळांत शिक्षक तयार करण्याचीही संस्था असावी. या शिक्षकांनीं आसपासच्या सामान्य लोकांत हिंडून त्यांस धार्मिक आणि ऐहिक शिक्षणाचें दान करावें. परा आणि अपरा या दोन्ही विद्यांचा सांठा या शिक्षकांपाशीं असला पाहिजे. ज्याप्रमाणें धर्माचा प्रचार करीत आपण दारोदार हिंडतों, त्याचप्रमाणें ऐहिक शिक्षणही आपण घरोघर पोंचतें केलें पाहिजे. हें काम फारसें कठीण आहे असें नाहीं. आपल्या या देवालयांतून जे शिक्षक व धर्मोपदेशक अशा रीतीनें तयार होतील, त्यांजकडून या कार्याचा अधिकाधिक

प्रसार होत जाईल. याच रीतीनें या देवळाप्रमाणें दुसरींही अनेक मध्यवर्ती ठिकाणें आपणास इतकीं निर्माण करतां येतील कीं, त्यांचें जाळें सर्व हिंदुस्थानभर पसरून जाईल. माझ्या दृष्टीप्रमाणें आपल्या भावी कार्याची ही रूपरेषा आहे. हें कार्य फार प्रचंड आहे असें वाटेल, पण तें अवश्य केलें पाहिजे असें आहे. एवढ्या कार्याला लागणाऱ्या पैशाची वाट काय? असाही प्रश्न कोणी करील. या कार्याला पैशाची जरुरी नाहीं. पैशाला वास्तविक कांहीं किंमत नाहीं. गेलीं बारा वर्षें उद्यांचें जेवण कोठें मिळणार हें मला माहित नव्हतें; पण पैसा आणि मला लागणाऱ्या इतर वस्तु आपोआप आल्याच पाहिजेत; कारण या साऱ्या वस्तूंचा मी गुलाम नसून त्यांचा धनी आहें. माझ्या इच्छेप्रमाणें वर्तन करणें त्यांना भाग आहे.'भाग आहे' असें मी पुन्हां निक्षून म्हणतों. मुख्य प्रश्न हा आहे कीं, माणसें कोठें आहेत? मद्रासेंतल्या तरुणांनो तुमच्यावर माझी सारी भिस्त आहे. आपल्या राष्ट्राच्या हांकेला तुह्मी उभे राहणार कीं नाहीं, हाच प्रश्न सध्या तुमच्यापुढें आहे. तुमचा माझ्यावर विश्वास असेल, तर तुमचा भविष्यकाल फार उज्वल आहे, असें मी तुह्मांस सांगतों. तुमच्या ठिकाणीं जाज्वल्य आत्मविश्वास मात्र पाहिजे. लहानपणापासून माझ्या ठिकाणीं अशाच प्रकारचा आत्मविश्वास होता आणि त्याच्याच धोरणानें माझा सांप्रतचा आयुष्यक्रम चालू आहे. आपल्या प्रत्येकाच्या ठिकाणीं अनंतशक्तीचा वास आहे, असा पक्का आत्मविश्वास तुह्मापैकीं प्रत्येकाच्या ठिकाणीं असला, ह्मणजे सर्व देशास तुह्मी चेतना आणूं शकाल. हिंदुस्थानांतील प्रत्येक जातींत आणि देशोदेशींच्या इतर लोकांतही आपणास कार्य करावयाचें आहे. या कार्यासाठीं तरुणांनीं कंबर कसली पाहिजे. तरुण, सुदृढ, निकोप आणि तीव्रबुद्धीच्या लोकांनाच परमेश्वरप्राप्ति शक्य आहे, असें श्रुतिवचन आहे. आपला भावी आयुष्यक्रम ठरविण्याची हीच वेळ आहे. '**अंगं गलितं पलितं मुंण्डं**' अशी स्थिति झाली ह्मणजे तुमच्या हातून काय होणार? तारुण्याचा जोम अंगीं आहे तोंवरच कोणतीही गोष्ट शक्य होईल. कार्याला लागण्याची अत्यंत उचित अशी हीच वेळ आहे. ज्यांना कोणीही हुंगलें नाहीं अथवा ज्यांना कोणी स्पर्श केला नाहीं, अशीं अगदीं ताजीं फुलें मात्र भगवंताच्या चरणीं अर्पण करण्यास योग्य असतात; आणि त्यांचाच तो

स्वीकार करतो. आयुष्य कोणाच्या हातचें नाहीं, तें केव्हां संपेल याचा नेम नाहीं. याकरितां जागे होऊन आजच कार्यास लागा. वकील होऊन भांडणें भांडत बसण्यापेक्षां अधिक उच्च दर्जाचीं कार्यें माणसांकरितां वाट पाहात बसलीं आहेत. आपल्या बांधवांच्या सुखाकरितां आणि साऱ्या मनुष्यजातीच्या सुखाकरितां स्वतःस अर्पण करणें याहून अधिक मोठें कार्य तें कोणतें? या आपल्या आयुष्याची खरी किंमत काय आहे? तुह्मीं हिंदु आहां त्या अर्थी जीवात्मा अमर आहे हा विश्वास जन्मादारभ्यच तुमच्या चित्तांत खिळलेला आहे. पुष्कळ तरुण मजकडे येऊन नास्तिकवादाविषयीं माझ्याशीं बोलत असतात. कोणताही हिंदु नास्तिक होईल असें मला वाटत नाहीं. युरोपीय ग्रंथांच्या वाचनानें तो कांहीं काल चार्वाकवादी झाल्यासारखा दिसेल, तथापि त्याच्या चित्तावरचें हें पटलसुद्धां फारच थोडा वेळ टिकेल. चार्वाकवाद अथवा निरीश्वरवाद हे तुमच्या रक्तांतच नाहींत. ज्या कल्पना तुमच्या हाडींमासीं खिळलेल्या नाहींत, त्या तुम्हांस कधींही आपल्याशा करतां येणार नाहींत. त्या तुम्हीं आपल्या करूं पहाल तर तुमची फसगत मात्र होईल. याकरितां असल्या कल्पनांच्या मागें लागणें सोडून द्या. एकदां लहानपणीं मीसुद्धां हा उद्योग करून पाहिला; पण ती गोष्ट मला साध्य झाली नाहीं. आपलें आयुष्य क्षणभंगुर आहे, पण आपला जीवात्मा अमर आहे. निश्चयानें घडून येणारी गोष्ट ह्मटली ह्मणजे मृत्यु हाच होय. याकरितां मोठ्या कार्यालाच आपण आपलें सारें आयुष्य वाहूं या. हा निश्चय आजच आपण करूं या. '**धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे**' असें वचन ज्यानें आपणास दिलें आहे, त्या भगवान् श्रीकृष्णाचा आशीर्वाद आपण मागूं या. तो परमात्मा आपल्या सर्वांचे मनोरथ पूर्ण करील.



# पाश्चात्य देशांत हिंदुधर्मविचारांचें कार्य.

( कलकत्ता येथील 'स्टार' नांवाच्या नाटकगृहांत तारीख ११ मार्च सन १८९८ रोजीं भगिनी निवेदिता यांचें व्याख्यान झालें. निवेदिता बाईची ओळख श्रोतृसमाजास करून देतांना स्वामी विवेकानंद यांनीं पुढील भाषण केलें. )

सभ्य स्त्रीपुरुषहो,

आशियाखंडाच्या पूर्वभागांत मीं प्रवास करीत असतां मला एक विशेष गोष्ट आढळून आली. ती गोष्ट अशी कीं, आशियाखंडाच्या पूर्वेकडील देशांत हिंदुधर्मविचारांचा बराच प्रसार झाला आहे. कित्येक सुप्रसिद्ध संस्कृत मंत्र चिनी आणि जपानी देवळांवर लिहिलेले असल्याचें पाहून मला केवढें नवल वाटलें असेल याची तुह्मांच कल्पना करा. हे मंत्र प्राचीन बंगाली लिपींत लिहिले आहेत या गोष्टीचें तर तुह्मांस खरोखर फारच कौतुक वाटेल. बंगाल्यांतील आपल्या पूर्वजांनीं धर्मप्रचारार्थ केवढा उत्साह आणि केवढी चिकाटी दाखविली होती याचें प्रत्यंतर या गोष्टी आजही आपणास पटवीत आहेत.

आशियाखंडांतील देश वगळले, तर पाश्चात्य देशांतही आमचे धर्मविचार प्रसार पावले होते, याबद्दलच्या निश्चित खुणा आढळून येतात. हे विचार तिकडील जनतेच्या मनांत किती खोल रुजले होते व त्यांचा परिणाम किती झाला होता हें थोड्याशा खोल दृष्टीनें पाहाणारास आजही आढळून येण्यासारखें आहे. हिंदुलोकांच्या धर्मकल्पनांचा प्रसार पाश्चात्य व पौर्वात्य देशांत प्राचीन काळीं झाला होता ही गोष्ट आतां इतिहासानेंही सिद्ध केली आहे, प्राचीन हिंदुलोकांनीं केलेल्या धर्माभ्यासानें जगाचा किती फायदा झाला आणि मानवी संस्कृतीचें पाऊल पुढें पडण्याला त्याचा पूर्वी केवढा उपयोग झाला व सांप्रतही किती उपयोग होत आहे, हें कोणास नव्यानें सांगावयास नको. या सर्व गोष्टी गतकालच्या आहेत. तसेंच पाश्चात्य देशांत आणखीही एक विशेष गोष्ट आढळून आली ती अशी कीं, मानवजातीची सामाजिक प्रगति करण्याच्या बाबतींत अँग्लोसॅक्सन वंशाचेंच

श्रम मुख्यतः कारणीभूत झाले आहेत. फार काय, पण अँग्लोसॅक्सन वंशाच्या ठिकाणीं असें सामर्थ्य नसतें तर आज आपण धर्माच्या बाबतींत विचार करण्यास येथें जमलोंही नसतों. या मानववंशाच्या आंगीं अनेक दुर्गुण असतील तथापि त्यांच्यांत विशेष सद्गुणही आहेत हें मला स्पष्ट दिसत आहे आणि याच सद्गुणांच्या जोरावर त्यानें आपलें महत्कार्य घडवून आणलें आहे. संस्कृती आणि वाढ या दोन ब्रिटिश कल्पनांनीं आह्मांस पुढें ढकललें आहे आणि अद्यापिही त्या आपणास एकसारख्या पुढें ढकलीत आहेत. पाश्चात्य देशांतील संस्कृतीचा मूळ पाया ग्रीक संस्कृति हा होय. प्रत्यक्ष आचरण हें ग्रीक संस्कृतीचें प्रधान आंग आहे. आम्हीं हिंदुस्तानवासी लोक अधिक विचारी आहों. आमचा काळ विचारांत अधिक खर्च होतो; पण दुर्दैवानें कित्येक वेळां आमचें सारें बळ विचारांतच खर्च होऊन आचाराच्या वेळीं आह्मीं दुर्बळ होतों. प्राचीन काळींही हाच दोष आमच्या आंगीं असल्यामुळें आमचे विचार आचारांत उतरलेले जगास दिसले नाहींत. याचा परिणाम काय झाला पहा. याचा परिणाम असा झाला कीं, आमच्याजवळ जें जें कांहीं होतें तें तें दडवून ठेवण्याचा उद्योग आह्मीं सुरू केला. प्रथमतः ही संवय फक्त वैयक्तिक होती; पण पुढें पुढें तिचें प्रमाण वाढत जाऊन तिनें साऱ्या राष्ट्रास पछाडिलें आणि अखेरीस ही संवय इतक्या विकोपास गेली कीं, जगानें आह्मांस धृतराष्ट्राच्या पंक्तीस बसविलें. विचारांना आचाराचें प्रत्यक्ष रूप प्राप्त न झालें तर आह्मीं जिवंत तरी कसे राहूं? वाढ आणि प्रत्यक्ष आचार हीं पाश्चात्य संस्कृतीचीं प्रधान आंगें होत. अँग्लोसक्सन वंशांनीं हिंदुस्थानांत प्रवेश केल्यापासून आह्मांत जागृति उत्पन्न झाली, आमच्या विचारांस प्रत्यक्ष आचारांत येण्याचा काळ प्राप्त झाला. याच वंशानें जी परस्पर विनिमय-साधनांची तरतूद आपणास करून दिली आहे, तिचा उपयोग करून आमचें गुप्त ज्ञान जगापुढें मांडण्यास आज आह्मांस प्रोत्साहन मिळत आहे. अँग्लोसॅक्सन वंशानें हिंदुस्थानाला भविष्यकाळ उत्पन्न करून दिला. भविष्यत् काळीं तरी आह्मीं पुढें सरसावूं अशी आशा आमच्या मनांत उत्पन्न झाली. आमच्या पूर्वजांनीं निर्माण करून ठेविलेल्या धर्मकल्पनांस वावरण्यास आतां पूर्ण संधी प्राप्त झाली. आमच्या पूर्वजांनीं प्राचीन सनातनधर्माचा प्रसार केला तेव्हां त्यांना किती तरी साधनें सुलभ होतीं. बुद्धानें आपल्या विश्वबंधुत्वाच्या

उज्वल मताचा प्रसार केला त्या वेळींही त्यास येथें अशींच साधनें उपलब्ध होतीं. त्या प्राचीन काळींही सुखाचा मार्ग शोधून काढण्यास व त्याचा प्रसार साऱ्या जगभर करण्यास अनेक साधनें आपणांस उपलब्ध होतीं. आतां आपण अँग्लोसॅक्सन वंशापर्यंत प्रवेश केला आहे. या वंशांत व आपणांत परस्परविनिमयाचें कार्य आतां चालू झालें आहे. आमचें म्हणणें काय आहे हें त्यांस समजलें असून, त्यांजकडून त्याचें उत्तर येण्यास हळू-हळू सुरवात झाली आहे. आमच्या कार्यास मदत करण्याकरितां इंग्लंदांतून-ही उच्च बुद्धिमत्तेचीं माणसें आह्मांस मिळूं लागलीं आहेत. याच जागीं बसलेल्या माझ्या भगिनी मुल्लरबाई पुष्कळांच्या माहितीच्या असतील. या बाईचा जन्म एका थोर कुलांत झाला असून, त्या चांगल्या सुशिक्षित आहेत. केवळ भरतभूमीवरील प्रेमानें प्रेरित होऊन त्यांनीं आपला देह आमच्या मातृभूमीच्या सेवेकरितां वाहिला आहे. त्या हिंदुस्थानास आतां आपली मातृभूमि समजत आहेत. दुसऱ्या एका इंग्रज स्त्रीनेंही हिंदुस्थानच्या बऱ्यासाठीं आपलें आयुष्य वेंचण्याचा संकल्प केला असल्याचें आपणास ठाऊक असलेच. ही दुसरी स्त्री ह्मणजे प्रसिद्ध बेझंट बाईच होय. आज या ठिकाणीं अमेरिकेंतील दोन विदुषी आपणास दिसत असून दोघींचेंही कार्य एकच आहे. आमच्या हतभाग्य देशाच्या कल्याणासाठीं प्रसंग पडल्यास प्राणही देण्याची त्यांची तयारी आहे असें मी खात्रीपूर्वक तुह्मांस सांगतों. या ठिकाणीं आपल्याही एका देशबांधवाचें तुह्मांस स्मरण करून देणें वावगें होणार नाहीं. या सद्गृहस्थानें इंग्लंडांत आणि अमेरिकेंत प्रवास केला आहे. त्याच्या कर्तबगारीबद्दल मला पूर्ण खात्री आहे. हा सद्गृहस्थ आपल्या देशाच्या बऱ्याकरितां शांतपणें सतत उद्योग करीत आहे. या सदगृहस्थाचें नांव मोहिनीमोहन चतर्जी असें आहे. आतां इंग्लंडानें आपणास आणखीही एक मोठें दान केलें आहे. मार्गारेट नोबल बाई येथें आल्या असून त्या महत्कार्य करतील असा आम्हांस फार भरंवसा आहे.

भगिनी निवेदिता यांचें भाषण झाल्यानंतर स्वामीजींनीं त्या व्याख्यानाचा समारोप पुढीलप्रमाणें केलाः—

आतां मला फक्त चारच शब्द सांगावयाचे आहेत. आमच्या आंगीं थोडीशी तरी कर्तबगारी आहे, अशी कल्पना आमच्या ठिकाणीं प्रादुर्भूत

होऊं लागली आहे. पुष्कळ बंगाली लोक या कल्पनेची थट्टा करीत असतात, पण ही थट्टा करण्यासारखी गोष्ट आहे असें मला वाटत नाहीं. तुमच्या सर्वांच्या चित्तांत कांहीं तरी चैतन्य उत्पन्न करून द्यावें हीच माझ्या आयुष्याची इतिकर्तव्यता आहे. तुह्मी अद्वैती आहांत कीं द्वैती आहांत, कीं तुह्मांस विशिष्टद्वैत आवडतें, हा प्रश्न मला फारसा महत्वाचा वाटत नाहीं. मला पुनःपुन: तुह्मांस एकच गोष्ट सांगावयाची आहे. तुह्मांस मला एवढाच उपदेश करावयाचा कीं ' आमत्मश्रद्धा ' धरा. आत्मश्रद्धेचा धडा दुर्दैवानें आपण वारंवार विसरत असतों. आत्मश्रद्धेवांचून परमेश्वरावरील निष्ठेची प्राप्ति आपणास व्हावयाची नाहीं. खरी भक्ति प्राप्त करून घेण्याकरितां प्रथम आत्मश्रद्धा दृढ पाहिजे. तुह्मी द्वैती असां अथवा अद्वैती असां, तुह्मी योगी व्हा अथवा श्रीशंकराचार्यांच्या ज्ञानमार्गाचा अवलंब करा, तुह्मी श्रीव्यासांचे शिष्य व्हा अथवा विश्वामित्राचे शिष्य व्हा, या बाबींचें महत्त्व फारसें नाहीं. आमचा सर्व जगाशीं कोठें मतभेद असला तर तो याच बाबतींत आहे. जगांतील इतर साऱ्या देशांत आणि इतर साऱ्या धर्मांत मानवी आत्म्याच्या अंतर्गत शक्तीला फारसें महत्त्व दिल्याचें आढळून येत नाहीं. तो शक्तिहीन कोणतेंही कार्य करण्यास असमर्थ असा मानला गेला असल्याचें आढळून येतें. येथेंच आमचा मतभेद होतो. मानवी आत्मा अनंतस्वरूप असून तो सदोदित अनंतरूप राहणार असें आमचें मत आहे. उपनिषद्ग्रंथांनीं जें ज्ञान सांठवून ठेविलें आहे, तें आपण नित्य ध्यानांत धरिलें पाहिजे.

आपल्या जीवितांत आपला अंतिम हेतु काय आहे, हें आपण नित्य लक्ष्यांत ठेविलें पाहिजे. आपणा हिंदूंच्या मनांत आणि विशेषत: बंगाली हिंदूंच्या डोक्यांत परकीय कल्पनांनीं पक्कें घर करून ठेविलें असून त्या कल्पना आमच्या राष्ट्रीय धर्माचीं जिव्हारें खात आहेत. आपलें पाऊल सध्या असें मागें कां पडत आहे, आपणांतील शेंकडा नव्याण्णव लोक परकीयांच्या उष्ट्या कल्पनांनीं घेरलेले आढळतात असें कां ? जगांतील इतर राष्ट्राच्या पंक्तींत आपल्या राष्ट्राचें महत्व आपणांस वाढवावयाचें असेल, तर या कल्पनांचा आपण त्याग केला पाहिजे. आपणांस आपलें राष्ट्र वर आणावयाचें असेल तर पाश्चात्यांकडूनही पुष्कळ विद्या आपणांस शिकण्यासारख्या आहेत, हें आपण

लक्ष्यांत ठेविलें पाहिजे. यंत्रकला आणि भौतिक शास्त्रें यांचें ज्ञान आपण त्यांजकडून घेतलें पाहिजे. भौतिक शास्त्रांचें ज्ञान त्यांजकडून घ्यावयाचें ही गोष्ट जशी खरी, तसेंच धर्मज्ञान पाश्चात्यांनीं आह्मांकडून शिकलें पाहिजे. हेंही खरें. धर्मज्ञानाच्या कामीं आपण हिंदुलोक साऱ्या जगाचे गुरु आहोंत असा दृढविश्वास आपण बाळगिला पाहिजे. राजकीय हक्क अधिक प्रमाणावर मिळावे, यासाठीं आपण आरडाओरड करीत आहों. हें सर्व ठीक आहे; पण हक्क आणि त्या जातीच्या इतर गोष्टी यांची प्राप्ति स्नेहावांचून होणार नाहीं; आणि परस्पर बरोबरीचें नातें असल्यावांचून स्नेह उत्पन्न होणार नाहीं. दोन मनुष्यांपैकीं एक भिकारी असेल आणि दुसरा श्रीमंत असेल, तर त्या दोघांत स्नेहभाव कधींतरी उत्पन्न होईल काय ? यासंबंधीं नुसत्या उपपत्तीची तोंडानें बडबड करणें ठीक आहे, पण मी निश्चयपूर्वक असें ह्मणतों कीं, परस्परसंघटनावांचून आमच्या ठिकाणीं बळ उत्पन्न होणार नाहीं. हें संघटन साधण्यासाठीं आमच्या लोकांनीं इंग्लंड आणि अमेरिका या देशांत प्रवास केला पाहिजे असें माझें सांगणें आहे; पण हा प्रवास भिकारी या नात्यानें न करतां आपण धर्मगुरु आहों, हें लक्ष्यांत ठेऊन त्या नात्यानें केला पाहिजे. परस्पर देवघेवीच्या तत्त्वाची अंमलबजावणी आपण शक्य तितक्या पूर्णपणें केली पाहिजे. या जगांत सौख्य कसें मिळवावें, हें आपणास पाश्चात्यांकडून शिकावयाचें असेल, तर त्याच्या मोबदल्यांत अनंतकालचें सुख मिळविण्याचा मार्ग त्यांस आपण कां दाखवूं नये ?

मानवजातीच्या कल्याणासाठीं आपणास काय करावयाचें आहे हें विसरूं नका. सध्यांच्या जुनाट आणि आकुंचित दृष्टीच्या राहाणीचा त्याग आपण ताबडतोब केला पाहिजे. आमच्या प्राचीन वाङ्मयांत भरलेलें अनंत ज्ञान शिकण्यासाठीं जगांतील सर्व राष्ट्रांस भरतभूमीच्या पायीं लोटांगण घालावें लागेल, हे माझे शब्द आपण पक्के लक्षांत ठेवा. इतिहासानें ही गोष्ट पूर्वी अनेक वार दाखविली आहे आणि तिची पुनरावृत्ति होईल यांत संशय नाहीं. हिंदुस्थान, चीन किंवा जपान हीं राष्ट्रें कालाच्या उदरांत कधींही गडप व्हावयाचीं नाहींत. धर्म हाच आमच्या राष्ट्राचा जीवनहेतु आहे, हें आपण कधींही विसरतां कामा नये. याचा विसर आपणास पडूं नये असा मार्ग

आह्मांस जो कोणी दाखवील, असा वाटाड्या आह्मांस हवा आहे. हिंदुधर्म हा शुद्ध चैतन्याचा धर्म नाहीं असें ज्या कोणा हिंदूस वाटत असेल, तो खरा हाडाचा हिंदूच नाहीं असें मी स्पष्ट ह्मणतों. एके वेळीं काश्मीर प्रांतांतील एका खेड्यांत मी गेलों असतां तेथें एक वृद्ध मुसलमान बाई मला भेटली. 'बाई, तुमचा धर्म कोणता?' असें मी तिला विचारलें, तेव्हां ती मला ह्मणाली, 'परमेश्वराच्या कृपेनें मी मुसलमानधर्माची आहें. त्या धर्मांत त्यानें मला जन्म दिला त्या अर्थी तो परमेश्वर धन्य असो!' हाच प्रश्न मी एका हिंदूला विचारला, तेव्हां साध्या आणि थोड्या शब्दांत तो ह्मणाला, 'मी हिंदू आहें' या दोन उत्तरांतील फरक लक्ष्यांत ठेवण्यासारखा आहे. कठोपनिषदांत 'श्रद्धा' हा शब्द वारंवार आढळून येतो. नाचिकेताच्या चरित्रांत श्रद्धेचें महत्व फार उत्तम रीतीनें गोविलें आहे. श्रद्धावान् व्हा, हें सांगण्याकरितांच माझा जन्म आहे असें मला वाटतें. सर्व धर्मांत श्रद्धेलाच फार महत्व दिलें आहे. मानवी जीवितांत अंतिम हेतु साध्य करून देणारीं जीं कांहीं साधनें आहेत, त्यांपैकींच श्रद्धा हें एक महत्वाचें साधन आहे. आत्मश्रद्धा प्रथम पाहिजे. समुद्रावर एके ठिकाणीं एक लहानसा बुडबुडा दिसला आणि दुसऱ्या ठिकाणीं पर्वतासारखी उंच लाट दिसली तरी त्या दोघांचेंही सामान्य अधिष्ठान एकच समुद्र असतो. यामुळें बाह्यत: दिसणाऱ्या कमी-अधिक परिमाणानें त्या दोघांच्या स्थितींत वास्तविक फरक पडत नाहीं. याकरितां जगांत मुक्तीची वाट सर्वांना सारखीच मोकळी आहे. मायापाश तोडणें सर्वांना शक्य आहे. कोणाचे पाश आज तुटले तर कोणाचे उद्यां तुटतील, इतकाच काय तो फरक. आमची नष्ट झालेली आत्मश्रद्धा आह्मी परत मिळविली तर व्यास आणि अर्जुन यांचा कालही आपणास पुन्हां परत मिळेल. ज्या कालीं मानवजातीला अत्युच्च विचाररत्नांचा लाभ झाला, तसा काळ आपणास पुन्हां येईल. आज धर्माच्या बाबतींतही आह्मी फार मागासलेले आहों. धर्मज्ञानाची वाण आमच्यांत आहे असें नाहीं. वास्तविक आमचें धर्मज्ञान इतकें आहे कीं, जगांतील साऱ्या मानवकुलांत हिंदुकुल अद्यापिही श्रेष्ठ आहे. बंगाल्यांतील तरुणांनो, पैशाच्या मदतीकरितां श्रीमंत आणि मोठ्या लोकांच्या तोंडाकडे पाहूं नका. जगांतील मह-

त्याचा कार्यभाग आजपर्यंत दरिद्री लोकांनींच उचलला आहे. बंगाल्यांतील भिकारी तरुणांनों, तुह्मीच आतां पुढें सरलें पाहिजे. तुमच्याच हातून सर्व गोष्टी होण्यासारख्या आहेत. तुह्मी कंबर बांधली ह्मणजे बाकीचा देश आपोआप तुमच्या मागें येईल. आपली भवितव्यता काय आहे, हें कधींही विसरूं नका. तिजवर नजर ठेऊन एकसारखें पुढें सरा. पवित्र अंत:करणानें आणि मन:पूर्वकतेनें एकसारखें पाऊल टाका. हिंदुस्थानची उन्नति तुह्मां तरुणांच्याच हातांत आहे, ही गोष्ट विसरूं नका. मी काय ह्मणतों तें तुह्मांस आज खरें वाटत नसलें, तरी तें तुह्मीं लक्ष्यांत ठेवा. ही गोष्ट एकदोन दिवसांत साध्य होईल असें नाहीं; पण ती केव्हांना केव्हां साध्य होईल याबद्दल मात्र मला मुळींच संशय नाहीं. यामुळें तरुण बंगाल्यांनो, माझें अंत:करण तुह्मांकडे एकसारखें धांव घेत आहे. दरिद्री तरुणांनो, तुह्मी दरिद्री आहां ह्मणूनच तुह्मी मोठे कार्यकर्ते व्हाल असा भरंवसा मला वाटतो. तुमच्यापाशीं द्रव्य नाहीं ह्मणूनच तुह्मी मनापासून काम कराल आणि द्रव्याच्या अभावामुळेंच तुह्मी खरे संन्यासी व्हाल, अशी माझी उमेद आहे. तुह्मांला जें कांहीं मला सांगावयाचें आहे तें हेंच. तुमच्यापुढें हा एकच पाढा मला पुन:पुन: वाचावयाचा आहे. तुमच्या जीविताची इतिकर्तव्यता हीच. तुह्मीं कोणत्या धर्ममताचा स्वीकार करतां हें पाहण्याची जरुरी मला मुळींच वाटत नाहीं. हिंदुस्थानांतील एका टोंकापासून दुसऱ्या टोंकापर्यंत मानवी जीविताच्या पूर्णत्वाबद्दल सारखीच श्रद्धा आहे हें मला ठाऊक आहे; याबद्दल माझा पूर्ण दृढविश्वास आहे. याच आत्मश्रद्धेचा प्रसार हिंदुस्थानच्या एका टोंकापासून दुसऱ्या टोंकापर्यंत आपणास करावयाचा आहे.



# संन्यास, त्याचें साध्य आणि अभ्यास.

( बेलूर मठांतील संन्याशांस केलेला. )

लांबलचक व्याख्यान देण्याचा हा प्रसंग नसल्यामुळें कांहीं विशेष गोष्टीं-बद्दलच चार शब्द मी तुम्हांस सांगणार आहें, ते ध्यानांत धरून त्याप्रमाणें तुह्मीं प्रत्यक्ष आचरण कराल, असा मला भरंवसा आहे. आपणास कोणतीही गोष्ट करावयाची झाली, तर तिचें अंतिम साध्य काय आहे याचा विचार प्रथम केला पाहिजे; आणि त्यानंतर कोणत्या रीतीनें ती प्रत्यक्ष आचरणांत आणतां येईल, हेंही पाहिलें पाहिजे. तुम्हांपैकीं ज्यांनीं संन्यस्तवृत्तीचा स्वीकार केला आहे त्यांनीं सदोदित परोपकारीं रत असलें पाहिजे; कारण संन्यास या शब्दाचा अर्थच तसा आहे. त्यागासंबंधी लांबलचक व्याख्यान देण्यास आज मला वेळ नाहीं; पण थोडक्यांत त्याची व्याख्या करावयाची म्हटलें तर ती ‘मरणाचें प्रेम’ या शब्दानें करतां येईल. संसारी लोकांना जीविताचें प्रेम असतें. संन्याशांनीं मृत्यूवर प्रेम केलें पाहिजे. याचा अर्थ आत्महत्या केली पाहिजे असा मात्र समजूं नका. मृत्यूवर प्रेम आणि आत्म-हत्या या गोष्टी परस्परांपासून अत्यंत भिन्न आहेत. आत्महत्या करणारे लोक मृत्यूवर प्रेम करणारे नसतात. एखादा मनुष्य आत्महत्या करूं लागला आणि एक वेळ त्याचा हेतु सिद्धीस गेला नाहीं, तर तो पुन्हां त्या भानगडींत पडत नाहीं. मग मृत्यूवरचें प्रेम ह्मणजे काय? त्याचा अर्थ इतकाच कीं, ज्या अर्थी आपणास केव्हांतरी मरावयाचें आहे, त्याअर्थी एखाद्या सत्कार्यासाठीं तरी आपण मरूं या. आपलें प्रत्येक कर्म ह्मणजे त्या महायज्ञांतली एकेक आहुतीच असली पाहिजे. खानपानादि सामान्य व्यवहारही याच दृष्टीनें आपण चालविले पाहिजेत. पुष्कळ खाऊन तुह्मी आपलें शरीर पुष्ट केलें व तें परक्याच्या उपयोगीं न पडलें आणि अशा रीतीनें त्यानें महायज्ञांत आपली आहुती न दिली, तर त्याच्या पुष्टपणाचा उपयोग काय? अनेक ग्रंथ वाचून तुह्मीं आपलें मन पुष्ट करतां, पण तें मन जगाच्या चरणीं तुह्मीं न वाहिलें तर पुस्तकें वाचण्याचा उप-

योग तरी काय ? केवळ स्वतःचें महत्व वाढवीत बसण्यापेक्षां आपल्या लक्षावधि बांधवांच्या सेवेस लागणें हेंच तुमचें कर्तव्य आहे. अशा रीतीनें प्रत्येक क्षणीं यज्ञ करीत करीत तुह्मीं मृत्यूची वाट चालली पाहिजे. अशा प्रकारच्या मृत्यूंत स्वर्गसुख आहे. अशा प्रकारचा मृत्यु परम कल्याणकारक आहे. याच्या उलट जीं जीं कर्में तीं तीं सर्व दुष्टपणाचीं आणि राक्षसी कृत्यें आहेत.

आतां या अंतिमसाध्याच्या दृष्टीनें प्रत्यक्ष वर्तणूक कशी करावयाची, याचा विचार करूं. प्रथम आपलें साध्य अशक्य कोटींतील असूं नये याबद्दल आपण खबरदारी बाळगावी. एखाद्या राष्ट्राचें साध्य अत्यंत उच्च ह्मणजे जवळ जवळ अशक्य कोटींतलें असलें, तर तें राष्ट्र दिवसेंदिवस कमजोर होऊन अखेर त्याची हानी होते. बौद्ध आणि जैन यांच्या कालानंतर हिंदुस्थानदेशाची अशी स्थिति झाली. उलटपक्षीं अत्यंत संसारिक दृष्टीही विघातकच आहे, हेंही लक्षांत ठेविलें पाहिजे. तुमच्याजवळ कल्पनाशक्तीला यत्किंचितही वाव नसला आणि तुमच्यापुढें थोडेंसेंही उच्च साध्य नसलें तर तुह्मीं मनुष्यें आणि पशु यांत फरक तो काय राहिला? याकरितां आपलें साध्य अगदीं निकृष्ट प्रतीचेंही असूं नये. आपलें ध्येय उच्च कोटीचें पण व्यवहार्य होईल, अशा बेताच्या स्वरूपाचें असावें. मुख्य मुद्दा इतकाच कीं, कोणत्याही गोष्टींत अतिरेक असूं नये. आमच्या देशांतील संन्याशाबद्दलची फार जुनी कल्पना ह्मटली ह्मणजे, त्यानें गुहेंत बसून ध्यान करावें आणि मरावें अशा प्रकारची होती. अशा रीतीनें एकट्यानेंच मुक्ति मिळविणें हीसुद्धां चूकच आहे. आपल्या बंधूंच्या मुक्तीसाठीं यत्न न करणारास स्वतःसही मुक्तिलाभ होत नाहीं, हा धडा प्रत्येकानें केव्हां ना केव्हां शिकलाच पाहिजे. उच्च कोटीचें ध्येय आणि उच्च दर्जाचे प्रयत्न यांचा संगम करण्याचा यत्न तुह्मी आपल्या आयुष्यांत केला पाहिजे. एका क्षणीं ध्यानांत पूर्णपणें निमग्न होण्याचा यत्न जसा करावयाचा, तसाच पुढच्या क्षणीं वेळ पडल्यास या समोरच्या शेतांत नांगरही धरावयाचा अशी तयारी तुह्मी ठेवली पाहिजे. येथें बसून जिज्ञासूंपुढें शास्त्रचर्चा करीत असतां दुसऱ्या क्षणीं धान्याची गोणी पाठीवर घेऊन ती विकण्याकरितां बाजारांत जाण्याचीही तुमची तयारी पाहिजे. कोणतेंही क्षुल्लक काम करण्यास तुह्मांस लाज वाटूं नये. केवळ आपल्या घरींच

नव्हे तर बाहेरसुद्धां वाटेल तें हलकेंसलकें काम करण्याची तुमच्या चित्ताची तयारी असली पाहिजे.

पुरुषार्थ संपादन करणारीं माणसें तयार करणें, हा या मठाचा उद्देश आहे, हें तुह्मी नित्य ध्यानांत ठेवा. ऋषींनीं काय शिकविलें एवढेंच पहावयाचें हें तुमचें कर्तव्य नव्हे. ते ऋषी आतां गेले आणि त्यांजबरोबर त्यांचीं मतेंही नष्ट झालीं. आतां तुह्मी स्वतःच ऋषी बनलें पाहिजे. अवतारी पुरुषही मनुष्येंच होतीं आणि तुह्मीही तशींच मनुष्यें आहां हें ध्यानांत ठेवा. नुसत्या पुस्तकी विद्येनें काय होणार? नुसतें ध्यान कसलें फल देणार? मंत्र आणि तंत्र यांनीं तुह्मी काय संपादन करणार? तुह्मीं आतां स्वावलंबी झालें पाहिजे. आतां नव्या पद्धतीचा स्वीकार करून तुह्मीं पुरुषार्थ संपादन केला पाहिजे. प्रत्यक्ष शक्तीइतका जो समर्थ असतो, तोच खरा पुरुष होय; पण एवढ्या सामर्थ्याबरोबरच त्याचें अंतःकरण स्त्रीच्या अंतःकरणाइतकें कोमल असलें पाहिजे हेंही विसरूं नका. आपल्या भोंवतालच्या लक्षावधि जीवांसाठीं तुमचें अंतःकरण तीळतीळ तुटत राहिलें पाहिजे, आणि त्याच वेळीं तुह्मी सामर्थ्यवान् असलें पाहिजे. तसेंच तुह्मांपाशीं आज्ञाधारकतेचाही गुण असला पाहिजे. माझ्या या सांगण्यांत परस्परविरोधी वचनें तुह्मांस आढळतील; पण तुह्मांपाशीं असे परस्परविरोधी गुण असले पाहिजेत, हें मात्र विसरूं नका. तुमच्या गुरूनें नदींत उडी घेऊन सुसर पकडण्यास तुह्मांस सांगितलें, तर ती आज्ञा प्रथम पाळून नंतर वाटल्यास तिच्या बऱ्यावाइटपणाबद्दल वादविवाद करा. हुकुम चुकीचा असला तरी आज्ञापालन प्रथम आणि वादविवाद नंतर, असा क्रम तुह्मीं स्वीकारला पाहिजे. बंगाल्यांतील निरनिराळ्या पंथांत जो एक भयंकर दोष आढळून येतो, तो हा कीं, एखाद्या पंथवाल्याचा मूळपंथाशीं थोडासाही मतभेद झाला तर यत्किंचितही वाट न पाहतां तो नवा पंथ काढावयास धांवतो. तुह्मांला आपल्या संघाबद्दल फार अभिमान असला पाहिजे. आज्ञेचें उल्लंघन केव्हांही करावयाचें नाहीं असा निश्चय तुह्मीं करा. कोणी यत्किंचितही आज्ञेचें उल्लंघन केलें, तर ताबडतोब त्याला तुमच्यांतून हांकून बाहेर काढा. आपणामध्यें असले हितशत्रु क्षणभरही राहूं देऊं नका. तुमच्या वृत्तींत वायूचें स्वातंत्र्य आणि कुत्र्याची आज्ञाधारकता यांचा संगम असला पाहिजे.

---

# आमचा धर्म.

अति प्राचीन काळीं धर्मविचाराच्या बाबींत आमच्या देशानें फार आघाडी मारली होती. या प्राचीन काळच्या इतिहासाचें थोडेंसें निरीक्षण आपण करूं या. प्राचीन काळच्या वैभवाच्या दिवसांसंबंधी विचार करण्यांत एक मोठें धोक्याचें स्थळ आहे. गतकालीन वैभवाच्या विचारांत आपलें चित्त तल्लीन झालें ह्मणजे आपणापुढें असलेल्या स्थितीचा विसर आपणास पडण्याचा संभव असतो. जुन्या वैभवाच्या आनंददायी विचारांचें मनन करून आपण त्यांतच अभिमानानें गर्क होऊन बसतों. अशी आपली स्थिति न होईल, याबद्दल काळजी घेणें अवश्य आहे. प्राचीन काळीं सत्याची प्रत्यक्ष भेट घेतलेले ऋषि आणि महर्षी पुष्कळ होते यांत शंका नाहीं; पण या प्राचीन काळच्या दिवसांच्या विचारापासून आपणास आपलें खरें कल्याण करून घ्यावयाचें असेल, तर आपणही पूर्वीसारखे ऋषि बनलें पाहिजे. माझी अशी पक्की खात्री आहे कीं, पूर्वकालच्या ऋषींहूनही अधिक महत्वाचें पद आपणास प्राप्त करून घेतां येईल. प्राचीन काळीं आम्ही मोठ्या वैभवास चढलों होतों यांत शंका नाहीं. या दिवसाचा विचार करतांना मला मोठा आनंद आणि अभिमान वाटतो. सांप्रतची अवनतदशा पाहूनही माझें चित्त निराशेनें व्यग्र होत नाहीं. आमचें भविष्यत्कालचें चित्र पाहून तेंही पूर्वीप्रमाणेंच आनंददायी असेल, अशी आशा माझ्या मनांत उत्पन्न होते. बीं भूमींत रुजत घातलें ह्मणजे प्रथम बाह्यतः त्याचा नाश झाल्यासारखा दिसतो, पण त्याचा नाश झालेला नसून त्याच्या घटकांत रूपांतर मात्र होत असतें. कांहीं काळानें त्याच बीजांतून एक सुंदर वृक्ष निर्माण होतो. त्याचप्रमाणें सांप्रतच्या आमच्या अवनतावस्थेच्या काळींही आमच्या भावी उदयाचें बीज पेरलें गेलें असून त्याचें सामर्थ्य आज फक्त गुप्त आहे. यथाकालीं त्याला अंकुर फुटून त्याचा पुन्हां जोमदार वृक्ष होईल. कदाचित् हा वृक्ष पूर्वीच्या वृक्षाहूनही अधिक भव्य आणि अधिक सुंदर असेल.

ज्या धर्मांत आमचा जन्म झाला आहे, त्या धर्माच्या निरनिराळ्या शाखांचा सामान्य पाया काय आहे, याचा विचार आपण करूं. केवळ वर

वर पाहाणारास आमच्या धर्मांत अनेक वेगवेगळे पंथ दिसून येतात. कित्येक अद्वैती असतात, तर दुसरे कित्येक आपणास विशिष्टाद्वैती ह्मणवितात; व आणखी कांहीं द्वैतमार्गीही आहेत. कित्येकांचा विश्वास अवतारांच्या ठिकाणीं असतो, कित्येक मूर्तिपूजक आहेत आणि दुसरे कित्येक निराकाराचे चहाते आहेत. आपल्या चालीरितीसंबंधी पाहातां तर असे अनेक भेद साऱ्या देशभर आढळून येतात. एखाद्या जाटानें महंमदी किंवा ख्रिस्ती मुलीशीं लग्न केलें तरी तो ज्ञातिभ्रष्ट होत नाहीं. हिंदूच्या देवळांतून त्याला मज्जावही नाहीं. पंजाबांतील कित्येक खेड्यांत अशी चाल आहे कीं, जो डुकराचें मांस खात नाहीं, तो हिंदूच नव्हे असें तेथील लोक समजतात. नेपाळी ब्राह्मण चारी वर्णांशींही शरीरसंबंध करूं शकतो. उलटपक्षीं बंगाल्यांतील ब्राह्मण आपल्या वर्णांतील पोटजातींशींही शरीरसंबंध करूं शकत नाहींत. अशा प्रकारें अनेक ठिकाणीं अनेक चाली प्रचारांत आहेत. इतके निरनिराळे भेद आह्मां हिंदूंत असले, तरी हिंदु ह्मणविणारा कोणीही मनुष्य गोमांस भक्षण करीत नाहीं. या बाबतींत सर्व हिंदूंची एकवाक्यता आहे. अशाच रीतीनें आपणांतील नानाविध पंथांच्या मूळाशींही सर्वांची एकवाक्यता करणारी अशी ही सामान्य भूमि आहे.

धर्मग्रंथांसंबंधीं विचार करतां आपणास एक विशेष गोष्ट आढळून येते ज्या धर्मांची उभारणी स्वतःच्या एक अथवा अनेक धर्मग्रंथांवर झाली असेल, ते धर्म अनेक वावटळींतून सुरक्षित राहात आल्याचें आपणास आढळून येतें. अशा धर्मांवर अनेक आपत्ती आल्या असतांही त्यांचें पाऊल मागें पडलें नाहीं. प्राचीन ग्रीक लोकांचा धर्म सुंदर होता यांत शंका नाहीं; तथापि त्याला धर्मग्रंथांचा पाठिंबा नसल्यामुळें तो नामशेष झाला. उलटक्षीं जुन्या करारावर अवलंबून राहिलेला यहुदी धर्म काळाचे प्रचंड तडाखे सहन करूनही अद्यापि पूर्वींइतकाच जोमदार राहिला आहे. हीच गोष्ट हिन्दुधर्मासही लागू आहे; जगांतील अत्यंत प्राचीन ग्रंथ जे वेद त्यांजवर त्याची उभारणी झाली असल्यामुळें तो अद्यापि पूर्वींसारखाच जोमदार आहे. वेदग्रंथांत ज्ञानकाड आणि कर्मकांड असे दोन खंड आहेत. सांप्रत हिंदुस्थानांत कर्मकांडाचा बहुतांशीं लोप झाला आहे. दाक्षिण हिंदुस्थानांत यज्ञयाग करून पशुहनन करणारे ब्राह्मण अद्यापिही मधून मधून आढळतात व तसेंच श्राद्धादि

संस्कारांच्या वेळीं क्रियाकांडातील मंत्रांचा उच्चार आपण ऐकतों ही गोष्ट खरी, तथापि कर्मकांडाचा पूर्वीचा जोम साफ नष्ट झाला आहे व त्याचा प्रचार पुन्हां सुरू होण्याचीं चिन्हेंही आज दिसत नाहींत. त्याचें पुनरुज्जीवन करण्याचा यत्न एक वेळ कुमारिल भट्टानें केला होता, पण तो त्याचा उद्योग सफल झाला नाहीं.

ज्ञानकांडांत उपनिषद् ग्रंथांचा अंतर्भाव होत असून त्याला वेदान्त असें सामान्य नांव मिळालें आहे. आचार्य ज्या ज्या वेळीं श्रुतिवचनाचा आधार देतात, त्या त्या वेळीं तीं वचनें उपनिषद् ग्रंथांतूनच घेतलेलीं असतात. वेदान्त हाच हिंदूंचा खरा धर्म झाला आहे. कोणाही पंथवाल्याला आपल्या पंथाचें वजन लोकांमध्यें पाडावयाचें असलें, तर आपल्या पंथास त्याला वेदान्त ग्रंथांचा आधार द्यावा लागतो. कोणी द्वैती असला अथवा अद्वैती असला, तरी वेदान्त ग्रंथांच्या आधारावांचून त्यास आपलें मत लोकांपुढें मांडतां येत नाहीं. वैष्णवांसही स्वतःच्या उपपत्तींची सिद्धि स्थापन करण्यासाठीं गोपालतापनी उपनिषदाचा आधार द्यावा लागतो. अशाप्रकारें एखाद्याला आपल्या मतासाठीं प्राचीन उपनिषद् ग्रंथांचा आधार मिळाला नाहीं तर तो एखादें नवें उपनिषदही निर्माण करतो आणि तें प्राचीन आहे असें लोकांस भासवितो. असे प्रकार पूर्वकाळीं पुष्कळ घडून आले आहेत.

वेदग्रंथ कोणा मनुष्यांनीं निर्माण केलेले नाहींत, असा आह्मा हिंदूंचा समज आहे. वेद ह्मणजे अनंत ज्ञानाचा निधि असून त्यांपैकीं कांहीं भाग कित्येक वेळां प्रत्यक्षस्वरूपास येतो. व कित्येक वेळां मुक्तस्थितींत राहतो असें आमचें मत आहे. '**यो वेदेभ्योऽखिलं जगत् निर्ममे**' वेदांच्या ज्ञानानें ज्यानें सर्व जग निर्माण केलें, असें सायनाचार्यांनीं कोठेंसें ह्मटलें आहे. वेद कोणीं निर्माण केले याची माहिती कोणासही नाहीं, आणि ते अमक्यानें निर्माण केले अशी कल्पना करणेंही शक्य नाहीं. मंत्र किंवा अनंत काळचे कायदे हे ऋषींनीं शोधून मात्र काढले. ते मंत्रद्रष्टे होते. मंत्र त्यांनीं प्रत्यक्ष पाहिले होते. मंत्र अमुक काळीं होते असें नसून ते नित्यच आहेत.

आतां हे ऋषि ह्मणजे कोण याचा आपण विचार केला पाहिजे. वात्सायन ह्मणतात, धर्माशीं प्रत्यक्ष भेट योगमार्गांनीं ज्यानें घेतली असेल, तोच फक्त ऋषि ही संज्ञा पावतो. मग तो जन्मानें म्लेच्छ असला तरी हरकत नाहीं.

प्राचीनकाळीं अशा प्रकारचीं पुष्कळ उदाहरणें सांपडतात. व्यास हे धीवर कुळांत उत्पन्न झाले होते. नारदांची उत्पत्ति एका दासीपासून झाली होती. असे अनेक पुरुष प्राचीनकाळीं ऋषिपद पावले होते. यांतील वास्तविक मुद्दा इतकाच कीं सत्याशीं ज्याची प्रत्यक्ष भेट झाली आहे, त्याच्या बाबतींत इतर कोणताही भेद पाहण्याचें कारण नाहीं. प्राचीनकाळीं हलक्या कुळांतील लोकांनाही जर ऋषिपद प्राप्त करून घेतां आलें तर हल्लींच्या कुलीन ब्राह्मणांना तें अधिकच सौकर्यानें प्राप्त करून घेतां येणार नाहीं काय ? हें ऋषिपद प्राप्त करून घेण्याचा यत्न करा. तें प्राप्त होईपर्यंत मध्यें कोठेंही विसावा घेऊं नका. तुह्मी ऋषि झालां ह्मणजे सर्व जग तुमच्या चरणीं लोटांगण घालील. सामर्थ्याचें सारें रहस्य ऋषि होणें हेंच आहे.

आमच्या धर्माच्या बाबतींत वेदग्रंथ हेच फक्त आधारभूत ग्रंथ आहेत, आणि यांजवर सर्वांचा सारखाच हक्क आहे. शुक्लयजुर्वेद ह्मणतो, '**यथेमान वाचम् कल्याणीमावदानि जनेभ्याः। ब्रह्मराजन्याभ्यामशूद्रायचार्याय च स्वाय चारणाय ॥** वेदग्रंथांवर अमुक एका जातीचा हक नाहीं असें सांगणारें एकतरी वाक्य या श्रुतिग्रंथांतून तुह्मीं दाखवूं शकाल काय ? आतां अमुक एका विशेष वर्णालाच वेदपठणाचा हक्क आहे अथवा अमुक एका वर्णाला तो नाहीं, अथवा श्रुतींचा अमुक एक भाग सत्ययुगाकरितां असून दुसरा विशिष्ट भाग कलियुगाकरितां आहे असें पुराणांनीं ह्मटलें आहे हें खरें; पण वेदग्रंथांत असल्या मताचा कोठें उल्लेखही नसून हें मत फक्त पुराणांतरींच आढळतें हें विशेष लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे. पण श्रुति ग्रंथ हे धन्यासारखे असून पुराणें हीं दासासारखीं आहेत. दास धन्याला हुकुम करूं शकतो ? काय स्मृति. पुराणें आणि तंत्रग्रंथ यांचा विरोध श्रुतीशीं नसेल, तोंपर्यंत मात्र त्यांतील वचनें ग्राह्य आहेत; आणि ज्या ठिकाणीं विरोध येईल, त्या ठिकाणीं श्रुतिवचनच प्रमाणभूत मानलें पाहिजे; पण सांप्रतकाळीं पुराणांना वेदग्रंथांच्याही माथ्यावर आह्मीं बसविलें आहे. श्रुतींचा अभ्यास बंगाल्यांतून बहुतांशीं नष्ट झाला आहे. शाळग्रामाबरोबरच श्रुतिग्रंथांचेंही पूजन बंगाल्यांच्या घरोघर ज्या दिवशीं होऊं लागेल आणि ज्या दिवशीं सर्व आबालवृद्ध आणि स्त्रियाही त्यांचें पूजन करूं लागतील, तो दिवस मी सुदीन समजेन.

पाश्चात्य पंडितांनीं श्रुतिग्रंथांबद्दल ज्या उपपत्ती पुढें आणल्या आहेत, त्या मला मुळींच खऱ्या वाटत नाहींत. वेदग्रंथ अमुक एका काळीं निर्माण झाले असें ते आज सिद्ध करतात आणि उद्यांच हें ह्मणणें खोडून काढून वेदकाल आणखी हजारभर वर्षें पुढें ओढतात. श्रुतींशीं विरोधात्मक अशा अनेक गोष्टी आपणास पुराणांतरीं आढळून येतात. उदाहरणार्थ अमुक एक राजा दहा हजार वर्षें जगला अथवा दुसरा एखादा वीस हजार वर्षें जगला अशीं वर्णनें पुराणांत आढळून येतात. पण " **शतायुर्वै पुरुषः** " असें श्रुतिवचन आहे. आतां यांपैकीं कोणतें खरें मानावें हें तुह्मींच पहा. श्रुतिवचन आपल्या अनुभवाचें आहे हें सांगावयास नकोच. पुराणांतरीं अशा प्रकारें श्रुतीशीं विरोध आढळत असला, तरी पुराणांची किंमत मी कमी करतों असें समजूं नका. योग, भक्ति, ज्ञान आणि कर्म यांचें सुंदर विवेचन पुराणांतरीं जागोजाग आढळतें. हें सारें विवेचन आपणांस अर्थातच ग्राह्य असलें पाहिजे. आतां तंत्रें ह्मणजे काय हें पाहूं. तंत्र या शब्दाचा अर्थ शास्त्र असा आहे. पुष्कळ राजांनीं जेव्हां बौद्ध धर्मांचा स्वीकार केला आणि अहिंसातत्त्वाचा प्रसार केला, तेव्हां यज्ञयागादि क्रियाकलापाचा लोप होऊन पशुवध बंद झाला. या गोष्टी त्या काळीं राजभयानें घडून आल्या; पण कांहीं काळ लोटल्यानंतर ज्या हिंदूंनीं बौद्धधर्मांचा स्वीकार केला होता, ते लोक गुप्तपणें पुन्हां यज्ञयाग करूं लागले. या काळीं तंत्रग्रंथांचा उदय झाला. तंत्रग्रंथांतील वामाचारादि दुष्ट भाग सोडून दिले, तर लोकांस वाटतें तितके तंत्रग्रंथ वाईट नाहींत. तंत्रग्रंथांतही कित्येक ठिकाणीं वेदान्ताचे अत्युच्च विचार आढळतात. खरें ह्मटलें तर वेदग्रंथांत ब्राह्मणें ह्मणून जो भाग आहे, त्यांतच थोडा फेरफार करून त्यांचा अंतर्भाव तंत्रग्रंथांत करण्यांत आला आहे. कर्मकांडांतील जो जो पूजाप्रकार आणि जे जे संस्कारविधी आजमितीस प्रचारांत आहेत ते सर्व तंत्रग्रंथांप्रमाणेंच सुरू आहेत.

आतां आपल्या धर्मांतील मुख्य तत्त्वें काय आहेत, याचा थोडासा विचार करूं. आमच्या धर्मांत अनेक पंथ आणि अनेक भिन्नभिन्न मतें यांचा प्रचार असला, तरी कांहीं बाबींत त्या सर्वांची एकवाक्यता आहे. ईश्वर, आत्मा आणि जगत् या त्रयींच्या अस्तित्वाबद्दल आपणापैकीं बहुतेक सर्व पंथांची एकवाक्यता आहे. जग निर्माण करून त्याचें रक्षण करणारा व

अखेर त्याचा लय करणारा तो परमेश्वर. ईश्वराचा हा उद्योग अखंड चालू आहे. सांख्यमताशिवाय करून बाकीच्या सर्व पंथांस हें मत मान्य आहे. यानंतर जीवात्मा आणि पुनर्जन्म यांजबद्दलही बहुतेकांची एकवाक्यता आहे. अनेक स्वतंत्र जीवात्मे, अनेक वार निरनिराळीं शरिरें धारण करतात आणि आपापल्या कर्मानुरोधानें पुन:पुन: जन्म घेऊन सुखदु:खादि भोगतात. याला संसारवाद असें म्हणतात. त्याचप्रमाणें जगत् किंवा विश्व हें अनाद्यनंत आहे असेंही बहुतेकांचें मत आहे. आतां कित्येकांच्या मतें हीं तीन परस्परांपासून अगदीं भिन्न असून तीं एकरूप होत नाहींत. दुसऱ्या कित्येकांच्या मतें हीं तीन एकाच मूलरूपाचीं तीन भासमान रूपें आहेत. तथापि या तिन्हींच्या अस्तित्वाबद्दल मात्र मतभेद नाहीं.

आतां आमच्या हिंदुतत्त्वज्ञानासंबंधी एक गोष्ट विशेषेंकरून लक्ष्यांत ठेवण्यासारखी आहे. ती ही कीं, आत्मा आणि मन हीं परपस्परांपासून अगदीं भिन्न आहेत. ही गोष्ट आमच्या तत्त्ववेत्त्यांनीं फार प्राचीन काळापासून जाणली आहे; पण पाश्चात्य तत्त्वज्ञांची भरारी मनापलीकडे केव्हांही गेली नाहीं. हें विश्व सुखानें भरलेलें आहे आणि यांतच खूप चैन करावयाची आहे असें पाश्चात्यांचें मत आहे; पण संसार हा क्षणैक टिकाऊ असून दु:खानें ओतप्रोत भरलेला आहे, अशी पौर्वात्यांची जन्मापासूनच खात्री पटलेली असते. या संसारसुखाच्या मागें लागणें ह्मणजे क्षणैक आनंदासाठीं आपला आत्मा गहाण टाकणें होय, असें जणूं काय बाळकडूंच आह्मां पौर्वात्यांस पाजलेलें असतें. या दोन लोकांच्या वृत्तींत मुळांतच असा भेद असल्यामुळें पाश्चात्य लोक संघटित कर्में करण्याच्या कलेंत तरबेज झाले असून पौर्वात्य लोक सूक्ष्म जगांतील भांडाराचा शोध करण्यासाठीं धडाधड उड्या घेतात.

आतां हिंदुधर्माच्या आणखीही एकदोन बाबींचा विचार करूं. परमेश्वर व्यक्त रूपानें अवतरतो हें मत फार प्राचीन काळापासून आमच्या धर्मांत प्रचलित आहे. मत्स्यावताराचा उल्लेख श्रुतींत आढळून येतो. या सर्व अवतारांबद्दल सर्वांची एकवाक्यता आहे कीं नाहीं, हा मुद्दा महत्वाचा नसून परमेश्वर केव्हांतरी सावयवरूपानें दिसतो कीं नाहीं, इतकाच महत्वाचा मुद्दा आहे. सृष्टीच्याद्वारें परमेश्वराची भेट घेण्याची इच्छा हिंदु लोक करीत

नसून मानवी आत्म्याच्याच द्वारें ते परमात्म्याची भेट घेण्याची इच्छा करीत असतात.

आतां प्रतिमापूजनाबद्दल आपल्या धर्मांत काय सांगितलें आहे, याचा विचार करूं. कोणतेंही शुभ कार्य करावयाचें असेल, तर प्रथम पंचदेवतांचें पूजन केलें पाहिजे अशी आमच्या शास्त्रांची आज्ञा आहे. याशिवाय ज्या इतर देवता आढळून येतात, त्या स्वतंत्र देवता नसून याच देवतांच्या निरनिराळ्या रूपांचीं तीं निरनिराळीं नांवें मात्र आहेत; पण येथें आणखीही एक मुद्दा लक्ष्यांत ठेवण्यासारखा आहे. तो असा कीं, या पंचदेवताही वस्तुतः स्वतंत्र देवता नसून एकाच परमेश्वराचीं तीं पांच नांवें आहेत. प्रतिमापूजन हा सर्वांतील अगदीं खालच्या प्रतीचा मार्ग होय असें आमच्या सार्‍या शास्त्रांनीं सांगितलें आहे. तथापि प्रतिमापूजन करणें चुकीचें आहे असें मात्र कोणीही ह्मटलेलें नाहीं. प्रतिमापूजनांत अनेकविध मूर्खपणाचे प्रकार सांप्रत घुसले आहेत ही गोष्ट खरी असली तरी प्रतिमापूजन त्याज्य आहे असें ह्मणण्याचें मात्र कारण नाहीं. निदान प्रतिमापूजनाला मी तरी नांवें ठेवणार नाहीं. त्या प्रतिमापूजक ब्राह्मणाच्या पवित्र पादधूलीचा स्पर्श मला झाला नसता, तर माझी काय दशा झाली असती ?

जे सुधारक प्रतिमापूजनावर ताशेरा झाडतात व त्याची टवाळी करतात, त्यांना मी इतकेंच ह्मणतों कीं, "प्रियबंधूनों, कोणत्याही बाह्य आकाराच्या मदतीवांचून परमेश्वराचें पूजन करण्याची पात्रता तुमच्या आंगीं असेल, तर तुह्मीं खुशाल तसें करा; पण ज्यांच्या आंगीं तशी पात्रता नाहीं, त्यांस शिव्या देण्याचा तुह्मांस काय अधिकार आहे ? एखादी प्रचंड आणि सुंदर इमारत उपेक्षेमुळें दुर्दशेस पोंचली असली आणि तिच्या अंतर्गत भागांत गुडघा गुडघा केर सांचला असला, अथवा तिच्या कांहीं भागांची पडझड होऊं लागली असली, तर अशा प्रकारच्या आमच्या एखाद्या प्राचीन स्मारकाची व्यवस्था तुह्मीं कोणत्या प्रकारें लावाल बरें ? तिची डागडुजी करून व योग्य ती स्वच्छता करून तिचें पहिलें स्वरूप तिला प्राप्त करून द्याल, कीं ती तुह्मीं मुळापासून उध्वस्त करून तिच्या जागीं नवी इमारत बांधाल ? पण येथें आणखीही एक विचार करण्यासारखा मुद्दा आहे. जी नवी इमारत जुनीच्या जागीं तुह्मीं बांधूं पाहात आहां, तिच्या खर्‍या उपयुक्ततेची आणि टिकाऊ-

पणाची सिद्धि अद्यापिही झालेली नाहीं. जुन्या इमारतींत आह्मांस डागडुजी करावयाची आहे ही गोष्ट आह्मीं कबूल करतों, पण ती करतांना मूळ इमारत समूळ पाडून टाकावी हें ह्मणणें मात्र आह्मांस कबूल नसून मूळच्या इमारतीचीच डागडुजी करण्याची आमची इच्छा आहे. तेवढी डागडुजी झाली म्हणजे सुधारणेचें काम संपलें. जुन्या इमारतीची डागडुजी झाल्यावर सुधारणेच्या कार्यास वाव तरी कोठें राहील? जर ही डागडुजी करण्याचें सामर्थ्य तुमच्या आंगीं असेल तर ती तुह्मीं करा; पण तसें तुमच्यानें होत नसेल, तर आमच्या या पुराण्या इमारतीस बोटही न लावतां स्वस्थ बसून राहा."

आमच्या देशांत जो एक सुधारकांचा वर्ग निघाला आहे, तो स्वतःचा निराळाच एक पंथ स्थापण्याची खटपट करीत आहे. त्यानेंही कांहीं चांगलें काम केलें आहे. त्याबद्दल त्यांस परमेश्वराचा आशिर्वाद खाचित मिळेल; पण, तुह्मीं हिंदु होऊन सामान्य हिंदुलोकांपासून विभक्त होण्याची इच्छा कां करतां? हिंदु या नांवाची तुह्मांस लाज वाटते काय? माझ्या देशबंधूंनों आपलें हें जुनाट तारूं कित्येक शतकांपासून संस्कृतीचा माल भरून जगभर फिरत आहे आणि आपणांतील बिनमोल ठेव्याचा लाभ सर्व जगास करून देत आहे. संसारसागरांतील निरनिराळ्या बंदरीं आमचें हें तारूं कित्येक शतकांपासून फेऱ्या करीत असून लक्षावधि जीवांस दुःखाच्या बंदरांतून घेऊन सुखाच्या परतीरावर त्यानें नेऊन सोडलें आहे. आज कदाचित् त्याला गळतें झालें असेल, तें तुमच्या अपराधानें झालें कीं दुसऱ्या कांहीं कारणानें झालें हा मुद्दा महत्त्वाचा नाहीं. आपली वस्ति त्यांत असल्यामुळें त्याचें गळतें कसें बंद करावें, इतकाच विचार आपणापुढें आहे. आतां परस्परांत भांडणें करून हा फुटका भाग तसाच राहूं देणार कीं सर्व मिळून एकमतानें यत्न करून हीं भोंकें बुजविणार याचा विचार तुह्मींच करा. जरूर पडली तर आपल्या शरिरांतील रक्तानेंही हीं भोंकें बुजविण्याची तयारी आपण केली पाहिजे. या प्रयत्नांत आपणास कदाचित् यश न आलें तर आपण सारेच बरोबर बुडूंया; पण बुडतांबुडतांही परस्परांस बंधुत्वाच्या नात्यानें मिठी मारून आपण बुडूं. परस्परांचा द्वेष करण्याचें पातक तरी आपण यापुढें टाळूंया.

हिंदुस्थानांतील ब्राह्मणांस माझें इतकेंच सांगणें आहे कीं, प्रिय बंधूंनो, आपण जन्मतःच श्रेष्ठ आहों, हा तुमचा अभिमान फुकट आहे. शास्त्र-दृष्टीनें खरें ब्राह्मणपण तुमच्या आंगीं उरलेलें नाहीं. तुह्मीं म्लेच्छ राजांच्या अमलाखालीं इतका काळ काढला आहे कीं, त्यांत तुमचें ब्राह्मणपण आतां नष्ट झालें आहे. तुमच्या पूर्वजांच्या वचनावर तुमचा यत्किंचितही विश्वास असेल तर कुमारिल भट्टाप्रमाणें तुषांच्या अग्नींत प्रवेश करून तुह्मीं स्वतःस पावन करून घेतलें पाहिजे. बौद्धांना नामशेष करण्याकरितां कुमारिल भट्टानें बौद्धांचें शिष्यत्व पतकरिलें; आणि नंतर सर्व बौद्धांचा वध करविला; आणि शेवटीं हें पातक नाहींसें करण्याकरितां त्यानें तुषान-लांत प्रवेश केला. तुमच्या आंगीं कुमारिल भट्टाचें धैर्य नसेल तर आपला दुबळेपणा कबूल करा आणि खालीं तुडविल्या गेलेल्या सामान्य जनतेपैकीं प्रत्येकास ज्ञानमंदिराचा दरवाजा खुला करून द्या. तुमच्या या करण्यानें त्या जनतेचे न्यायाचे आणि कायदेशीर हक्क तिला पुनः प्राप्त करून दिल्याचें श्रेय तरी तुमच्या पदरीं पडेल.



# वेदान्ताचा सर्व बाजूंनीं विचार.



ज्या कालाबद्दल इतिहास आपणास कांहीं सांगूं शकत नाहीं, इतकेंच नव्हे तर ज्या कालापर्यंत दंतकथेचीही मजल पोंहोंचूं शकत नाहीं, त्या कालापासून एक विचारशक्ति सर्व जगावर प्रकाश करीत आहे. कित्येक वेळां बाह्यस्थितीच्या प्रतिकूलतेनें या शक्तीचा प्रकाश कधीं मंदावलेला दिसतो, तर दुसऱ्या कित्येक वेळां तो फार उज्ज्वल दिसतो. याप्रमाणें प्रकाशांत कधीं काळीं कमी अधिकपणा दिसत असला, तरी त्या शक्तीचा समूळ लोप मात्र केव्हांही झालेला नव्हता. या शक्तीचा प्रकाश केवळ हिंदुस्थानांतच नव्हे, तर साऱ्या जगभर प्रसार पावत आहे. तो कोणत्या रीतीनें प्रसार पावत आहे, हें कोणाच्याही लक्षांत येत नाहीं. त्याच्या प्रसाराची क्रिया अत्यंत निःशब्द आणि शांत अशा मार्गानें होत आहे. तथापि या शक्तीचें मार्ग इतक्या शांततेचे असले तरी त्यांचें सामर्थ्य अचाट आहे यांत संशय नाहीं. प्रातःकाळीं पडणाऱ्या दंवाचा आवाज कोणासही ऐकूं येत नसतो. तथापि त्याच्या सिंचनानें सुंदर परिमलाच्या पुष्पांस जीवन प्राप्त होऊन त्यांची वाढ होते. त्याचप्रमाणें ही विचारशक्ति आपलें कार्य निःशब्दपणें करीत असतां जगांतील विचारपुष्पांस जीवन देत आहेत व त्यांची वाढ करीत आहे. ही विचारशक्ति म्हणजे उपनिषद्ग्रंथांतील वेदान्तविचार होत. भरतभूमींत हें बीज प्रथम केव्हां पेरलें गेलें हें कोणासही ठाऊक नाहीं. याबद्दल अनेकांनीं अनेक कल्पना लढविल्या आहेत; तथापि कोणासही याबद्दल निश्चितपणें कांहीं सांगतां येत नाहीं. विशेषतः पाश्चात्य पंडितांनीं काढलेल्या कल्पना परस्परांशीं इतक्या विरोधी आहेत कीं, त्यांवरून उपनिषद् काल निश्चित करणें अशक्य आहे. आपणा हिंदूंविषयीं ह्मणाल तर हे ग्रंथ अमुक एका व्यक्तीपासून उत्पन्न झाले हें मतच आह्मांस मान्य नाहीं. अध्यात्मविद्येच्या बाबतींत हे ग्रंथ सर्वांत जसे प्राचीन आहेत, तसेच ते उच्चतमही आहेत असें मी स्पष्टपणें ह्मणतों. अध्यात्मविद्येंतील विचारांची वाढ यापलीकडे होणें शक्य नाहीं असें ह्मणण्यास मला यत्किंचितही दिक्कत वाटत नाहीं. या वेदान्तमहासागरांतून प्रकाशाच्या लाटा वारंवार उद्भवून पूर्वेकडे आणि पश्चिमेकडे वाहत गेल्या

आहेत. प्राचीनकाळीं या लाटा पश्चिमेकडे गेल्या तेव्हां ग्रीक मनोभूमिकेवर त्या आदळून त्या भूमीस त्यांनीं नवीन चालन दिलें. विशेषत: प्राचीन ग्रीक लोकांच्या मनावर सांख्यदर्शनाचा चांगलाच परिणाम घडला असावा असें स्पष्ट दिसतें. सांख्यदर्शन आणि इतर सर्व दर्शनें यांना उपनिषद् ग्रंथांतील वेदान्ताचाच आधार आहे. हिंदुस्थानांत आज अनेक मतें प्रचलित असलीं अथवा पूर्वीं होऊन गेलीं असलीं तथापि त्या सर्वांचा मूळपाया ह्मटला ह्मणजे उपनिषद् ग्रंथच होत. तुह्मीं द्वैती, अद्वैती अथवा विशिष्टाद्वैती असलां, अथवा तुह्मी दुसऱ्या कोणत्याही मताचे असलां, तथापि तुमच्या मताला, तुमच्या शास्त्राला आणि तुमच्या धर्ममार्गाला उपनिषद्ग्रंथांचाच आधार आहे, हें तुह्मीं लक्ष्यांत ठेविलें पाहिजे. हिंदुस्थानांतील जें दर्शन उपनिषद्ग्रंथ प्रमाण मानित नाहीं, तें आम्हां हिंदूंचें दर्शनच नव्हे असें आह्मी समजतों. याच कारणासाठीं उपनिषदांना प्रमाण न मानणाऱ्या जैन आणि बौद्धमतांचा त्याग आह्मीं केला आहे. अशा रीतीनें समजून उमजून अथवा कित्येक वेळां न समजतांही वेदान्तधर्माचा प्रसार साऱ्या देशभर झाला आहे. प्रचंड वटवृक्ष आपल्या अनंत शाखा ज्याप्रमाणें चोंहोंकडे पसरून जागोजाग नवे नवे वटवृक्ष निर्माण करतो त्याप्रमाणें या प्रचंड वृक्षाचा प्रसार इतक्या मोठया प्रमाणावर झाला आहे,ही गोष्ट आपल्या लक्ष्यांत येत असली अथवा नसली तथापि ती खरी आहे यांत मात्र शंका नाहीं. यामुळें हिंदुस्थानच्या भूमींत उभें राहून वेदान्तमताचा उपदेश करणें ह्मणजे समुद्राला मीठ वहाण्यासारखें हास्यास्पद वाटतें; तथापि आज आपणाला जर कोणत्या एखाद्या वस्तूची जरूर असेल तर वेदान्ताचा प्रसार करणें हीच आहे. आजचा काळच असा आला आहे कीं या मताचाच एकसारखा प्रसार करीत राहणें हेंच आपलें कर्तव्य आहे; कारण, आपणांतील अनेक पंथ उपनिषद्ग्रंथांस शिरसावंद्य मानीत असले तरी त्या परस्परांत बराच विरोध स्पष्ट दिसत आहे. उपनिषद् ग्रंथांत एकतानतेचा जो गुप्त ध्वनी आहे त्याचा शोध पूर्वींच्या बऱ्याच आचार्यांसही लागला नाहींसें दिसतें. यामुळें मोठमोठ्या आचार्यांतही प्राचीन काळीं तीव्र मतभेद होत असत. पण उपनिषद् ग्रंथांतील या एकतानतेच्या ध्वनीबद्दल सर्वांस माहिती करून देण्याचा समय आतां आला आहे. उपनिषद् ग्रंथांतील सूत्रांवर आतां नवें भाष्य झालें पाहिजे. या कार्याची आवश्यकता हिंदुस्थानाला जितकी

आचार्यांनीं बौद्धांपासूनच मायावाद घेऊन त्याचा अंतर्भाव आपल्या वेदान्तांत केला, असें या मतवाद्यांस वाटलें. हें कसेंही घडलें असलें तरी अर्वाचीन काळीं सर्व अद्वैती आचार्यांसच अनुसरणारे आहेत हें मात्र खरें. उत्तर आणि दक्षिण हिंदुस्थानांत श्रीशंकराचार्य आणि त्यांचे शिष्य यांनीं अद्वैतमताचा पुष्कळ प्रसार केला. श्रीशंकराचार्यांच्या मताचा प्रसार बंगाल, काश्मीर आणि पंजाब या भागांत फारसा झाला नाहीं; पण, दक्षिणहिंदुस्थानांत सर्व स्मार्त आचार्यमतानुयायीच आहेत. श्रीक्षेत्र काशी येथें अद्वैत मताचें मुख्य प्रस्थ असल्यामुळें या मताचा प्रसार त्या भागांत आणि उत्तरेकडील कित्येक भागांतही पुष्कळ झाला आहे. आपण नवीनच मताचा प्रसार करीत आहों असें श्रीशंकराचार्य किंवा श्रीरामानुजाचार्य यांपैकीं कोणीही ह्मटलें नाहीं. आपण बोधायनाच्या टीकेस अनुसरत आहों असें श्रीरामानुजांनीं स्पष्ट ह्मटलें आहे. “ भगवान् बोधायनांनीं ब्रह्मसूत्रांवर जी विस्तृत वृत्ति ( टीका ) लिहिली होती, ती कांहीं आचार्यांनीं संक्षिप्त केली. याकरितां त्यांच्या मतानुसारें ब्रह्मसूत्रावर ही टीका लिहिली आहे. ” असे उद्गार श्रीरामानुजाचार्यांनीं श्रीभाष्याच्या आरंभीं काढले आहेत. यावरून त्यांनीं बोधायनांचीच संक्षिप्त आवृत्ति तयार केली असावी असें वाटतें. आणि आज आपणांस तेवढीच उपलब्ध आहे. बोधायनाचें भाष्य पाहण्याची संधि मला स्वतःला केव्हांच मिळाली नाहीं. व्याससूत्रांवर बोधायनावांचून दुसऱ्या कोणाचीही टीका स्वामी दयानंद सरस्वतींनीं मान्य केली नाहीं; आणि कित्येक वेळां जरी ते श्रीरामानुजाचार्यांवर हल्ला करीत असत, तरी बोधायनभाष्य काय होतें हें त्यांनीं स्वतःसुद्धां कोणाला केव्हांही सांगितलें नाहीं. या भाष्यासाठीं सारा देश मीं धुंडाळला, पण माझ्या पाहण्यांत तें कुठेंही आलें नाहीं; पण या बाबतींत श्रीरामानुजाचार्यांचें वचन स्पष्ट आहे. बोधायनांचे केवळ विचारच आपण घेतले नसून, कित्येक ठिकाणीं वाक्येंच्या वाक्यें बोधायनग्रंथांतून घेतलीं आहेत, असें श्रीरामानुज स्पष्ट ह्मणत आहेत. श्रीशंकराचार्यांनींही असाच प्रकार केला असावा असें वाटतें. श्रीमत् शंकराचार्यांनीं आपल्या भाष्यांत कित्येक जुन्या भाष्यांचा उल्लेख केलेला आढळतो. आचार्यांचे गुरु आणि त्या गुरूचे गुरू हे आचार्यांप्रमाणेंच वेदान्ती होते, हें आपणास माहीतच आहे.

यावरून आचार्यांनीं नव्याच मताची स्थापना केली नसून रामानुजाप्रमाणेंच प्राचीन मताचा पुनरुद्धार केला असावा असें ह्मणण्यास हरकत नाहीं. पण श्रीरामानुजांनीं ज्याप्रमाणें बोधायन ग्रंथाचा पुनरुद्धार केला, त्याप्रमाणें श्री शंकराचार्यांनीं कोणत्या भाष्याचा उद्धार केला, हें ठरविणें मात्र आपणास सध्यां शक्य नाहीं. ज्या ज्या दर्शनांचीं नांवें आपल्या कानावर येतात, त्या सर्वांस उपनिषद् ग्रंथांचा मूळ आधार आहे. जेथें जेथें त्यांनीं श्रुतिवचन सांगितलें आहे, तेथें तेथें तें उपनिषदांतून घेतलें आहे. याप्रमाणें उपनिषद् ग्रंथांतील वचनें आधारास घेण्याची सर्व दर्शनकारांची चाल आहे. उपनिषद् ग्रंथांच्या आधारामुळें दुसरींही अनेक मतें येथें अस्तित्वांत आलीं; पण व्यासांच्या मताचा येथें जसा प्रसार झाला, तसा दुसऱ्या कोणत्याही मताचा झाला नाहीं. श्रीव्यासांचें मतही अगदींच नवीन नसून त्याला श्रीकपिलांच्या सांख्यदर्शनाचा आधारही होता. हिंदुस्थानांत काय, अथवा सर्व जगांत काय, जितकीं दर्शनें आज अस्तित्वांत आहेत, त्या सर्वांस श्री कपिलांच्या सांख्यदर्शनाचाच आधार आहे. श्रीकपिलांच्या सांख्यदर्शनाचा परिणाम सर्व जगभर दिसून येतो. ज्या ज्या ठिकाणीं तत्त्वविचारांची कांहीं संघटित व्यवस्था आढळून येते, तेथें तेथें सांख्यदर्शनाचा प्रभाव थोडा तरी आढळून येतोच. श्रीकपिलांस जन्मून आज हजारों वर्षें होऊन गेलीं; तथापि त्यांच्या अत्युज्ज्वल बुद्धिप्रकाशाचे किरण अद्यापिही जगभर आढळून येतात. सांख्यदर्शनांतील मतांचें ग्रहण हिंदुस्थानांतील सर्वच ग्रंथांनीं केलें आहे. त्यांत कोठें फरक असला तर तो अगदींच थोडा आहे. आमच्या देशांत नैय्यायिकांच्या मताचा प्रसार फारसा झाला नाहीं. नैय्यायिकांचा अवघड भाषाप्रबंध आणि बारिक सारिक गोष्टींबद्दलची काथ्याकूट यामुळें सामान्य जनतेंत हें मत प्रसार पावलें नाहीं. त्यांचा मुख्य भर तर्कशास्त्रावरच असून तत्त्वदर्शनाचें काम त्यांनीं वेदान्त्यांवर सोंपविलें होतें. तथापि सांप्रत नैय्यायिकांच्या तर्कशास्त्रांतील विशिष्ट शब्द मात्र सर्व पंथांनीं रूढ करून घेतलेले आहेत. जगदीश, गदाधर आणि शिरोमणी यांचीं नांवें नडियाप्रमाणें मलबारांतही प्रसिद्ध आहेत; पण व्याससूत्रांचा जो परिणाम सर्वांच्या चित्तावर झाला आहे, तो मात्र कमी झालेला नाहीं. तर्क आणि श्रुति यांच्या भांडणांत पूर्वकालापासून श्रुतींसच आद्यस्थान मिळत गेलें.

श्रीमत् व्यासांनींही तर्काची पर्वा केली नाहीं असें श्रीशंकराचार्यांनीं स्पष्ट ह्मटलें आहे. वेदन्तांतील सर्व विस्कळीत पुष्पें एकत्र ग्रथित करून श्रीव्यासांनीं आपली सूत्रमाला तयार केली. उपनिषद् ग्रंथांस जोंपर्यंत हीं व्याससूत्रें अनुसरत आहेत, तोंपर्यंतच तीं प्रमाण मानावयाचीं. उपनिषदांशीं विरोध आल्यास सूत्रें प्रमाण मानलीं जात नाहींत.

हिंदुस्थानांतील सर्व पंथ व्याससूत्रांस प्रमाण मानतात हें मी अगोदर सांगितलेंच आहे. कोणतेंही नवें मत निघालें तरी स्वतःच्या पुष्टीसाठीं व्याससूत्रांवरील भाष्यापासूनच त्याचा आरंभ होतो. स्वतःच्या मताप्रमाणें व्याससूत्रावर टीका लिहिणें हें या मताचें पहिलें कार्य असतें. निरनिराळ्या भाष्यकारांनीं लिहिलेल्या व्याससूत्रांवरील टीकांत पुष्कळ वेळां तीव्र मतभेद आढळून येतो; पण पुष्कळवेळां ते मूलसंहितेची जी विलक्षण ओढाताण करतात ती अगदीं किळसवाणी वाटते. व्याससूत्रें प्रमाणभूत मानलीं गेलीं असल्यामुळें कोणासही नवें धर्ममत स्थापावयाचें झाल्यास व्याससूत्रांवर नवी टीका लिहिल्यावांचून त्यास आपल्या मताचा प्रसार करणें शक्य नाहीं.

व्याससूत्रांनंतरचा प्रमाण ग्रंथ ह्मटला ह्मणजे सुप्रसिद्ध श्रीमद्भगवद्गीता हा होय. श्रीशंकराचार्यांनीं गीतेवर जें सुंदर भाष्य लिहिलें, त्यामुळें त्यांची कीर्ति सर्वतोमुखीं झाली. स्वतःच्या आयुर्मर्यादेंत या महापुरुषानें जे बिनमोल ग्रंथ लिहिले आहेत, त्यांत या भाष्याची गणना प्रमुखत्वानें होते. गीतेवरही निरनिराळ्या मतवाद्यांनीं आपापल्या मतांचीं निरनिराळीं भाष्यें लिहिलीं आहेत.

उपनिषद् ग्रंथ पुष्कळ आहेत. उपनिषदें एकंदर १०८ आहेत असें कोणी ह्मणतात; तथापि दुसरे कित्येक ही संख्या आणखीही वाढवितात. यांपैकीं कित्येक बऱ्याच अलीकडच्या काळचीं आहेत. यांतच अल्लोपनिषद् या नांवाचें एक उपनिषद् असून त्यांत अल्लाची स्तुति केली आहे; व महंमदास रजसुल्ला ह्मटलें आहे. हें उपनिषद् अकबराच्या काळीं लिहिलें गेलें असल्याचें कोणीं मला सांगितलें. हिंदु आणि मुसलमान यांची एकी करण्याकरितां संहितेंतील अल्ला किंवा इल्ला असा एक शब्द घेऊन त्यावर हें

उपनिषद् कोणी रचिलें अशी लोकवार्ता आहे. अल्लोपनिषदांत महंमदास रजसुल्ला ह्मटलें आहे. मग या शब्दाचा अर्थ काय असेल तो असो. अशाच रीतीनें कांहीं विशिष्ट पंथांचीं पोषक अशीं हीं उपनिषदें आढळतात. हीं अगदीं अर्वाचीन काळीं लिहिलीं गेलीं असावीं, हें कोणाच्याही ध्यानांत येण्याजोगें आहे. वेदांतील संहितांची भाषा इतकी जुनी आहे कीं, तिला व्याकरणाचें बंधनही नाहीं. अशा स्थितींत असे ग्रंथ लिहिणें हें काम फारसें अवघडही नाहीं. कित्येक वर्षांपूर्वी वेदांच्या व्याकरणाचा अभ्यास मी सुरू केला होता. पाणिनीच्या व महाभाष्याचा अभ्यास मी केला, तेव्हां वेदाच्या व्याकरणाबद्दल मला असें आढळून आलें कीं, कोणत्याही नियमाला अपवाद सांगावयाचा असला ह्मणजे मात्र वेदभाषेचा उपयोग करण्यांत येतो. एखादा नियम सांगितला गेला ह्मणजे वेदांसंबंधानें बोलतांना 'हा नियम लागू पडत नाहीं' असें वाक्य असावयाचें. यामुळें भाषेवर कांहीं धरबंध नसल्यामुळें जुन्या भाषेंत कोणासही कसलाही ग्रंथ लिहिणें किती सोपें होतें हें तुह्मींच पहा. अशा परिस्थितींत वाटतील तितकीं उपनिषदें भराभर बाहेर काढण्यास कांहींच अडचण पडण्याचें कारण नाहीं. संस्कृत भाषेचें थोडेंसें ज्ञान असलें व शब्द जुनाट दिसावा ह्मणून तो थोडासा वेडावांकडा करण्याची अक्कल असली, कीं अशा लेखकाचें काम झालें. व्याकरणाची भीति बाळगण्याचें कारण त्याला मुळींच नाहीं. मग त्यांत एखादा रजसुल्ला झाला अथवा तुह्मांला आवडेल तो दुसरा एखादा 'सुल्ला' झाला. अशा रीतीनें पुष्कळ उपनिषदें तयार झालीं आहेत. सांप्रतही हा प्रकार चालू असल्याचें माझ्या ऐकिवांत आहे. हिंदुस्थानांतील कांहीं भागांत तर निरनिराळ्या पंथांत उपनिषदें बनविण्याचा धंदा चालू आहे अशी माझी खात्री आहे. तथापि उपनिषद्ग्रंथांत अगदीं अस्सल जुनाट असेही ग्रंथ आहेत; आणि तेवढेच ग्रंथ निवडून काढून त्यांजवर श्रीशंकराचार्य, श्रीरामानुज इत्यादि महापुरुषांनीं महाभाष्यें लिहिलीं आहेत.

उपनिषद् ग्रंथांसंबंधी आणखीही एकदोन गोष्टी मला तुमच्या नजरेस आणावयाच्या आहेत. उपनिषद् ग्रंथ ह्मणजे खरोखर ज्ञानोदधीच होत. त्यांजसंबंधानें सांगोपांग माहिती सांगावयाची ह्मटलें तर माझ्यासारख्या अज्ञ मनुष्याला तसें करण्यास कित्येक वर्षे लागतील. याकरितां फक्त मुद्याच्याच एकदोन गोष्टी मी तुह्मांस सांगणार आहें. पहिली गोष्ट ही कीं,

उपनिषद् ग्रंथ हे अत्यंत कवितायुक्त ग्रंथ आहेत. त्यांत काव्य ओतप्रोत भरून राहिलें आहे. आपण संहिता ग्रंथ वाचले तर कित्येक ठिकाणीं त्यांत अत्यंत सुंदर आणि काव्यमय कल्पना आढळून येतात. उदाहरणार्थ **‘ तम आसीत्तमसा गुडमग्रे ’** इत्यादि वर्णनानें आरंभिलेल्या श्लोकांत प्रारंभींच्या तमाचें वर्णन आहे. यांत उदात्तता केवढी आहे हें फक्त मनानेंच जाणावयाचें आहे. उदात्तरसाचें वर्णन करण्याचा यत्न आपल्या देशांत आणि पाश्चात्य देशांतही पुष्कळ वेळां झाला आहे. पाश्चात्य देशांत या वर्णनाचें स्वरूप जड वस्तूंतच गुरफटलें असल्याचें आढळून येतें. मिल्टन्, डांटी अथवा दुसरा कोणताही युरोपियन महाकवी अनंताचें चित्र रंगवूं लागला ह्मणजे तो पुष्कळ उंच भरारी मारतो. तो अनंतत्वाची कल्पना जडाच्या द्वारें तुमच्या चित्तावर ठसविण्याचा यत्न करितांना आढळतो. अशा प्रकारचें वर्णन संहितांतही आढळतें. संहितांतील या वर्णनाचें जें स्वरूप वाचकापुढें उभें राहतें, त्याला दुसऱ्या कोठेंही तोड आढळावयाची नाहीं. तमाच्या वर्णनाचीं तीन कवींनीं केलेलीं निरनिराळीं वर्णनें आपण उदाहरणार्थ घेऊं. कालिदास ह्मणतो, “ अंधःकार इतका दाट होता कीं, त्याला सुईनें भोंक पाडतां आलें असतें.” मिल्टन ह्मणतो, ‘ उजेड नव्हे तर अंधःकार दिसूं लागला होता. ’ उपनिषदांत हेंच वर्णन कसें आहे पहाः–
“ अंधारावर अंधाराचें पांघरूण पडलें होतें. अंधेरांत अंधेर लपला होता. ”
आपणासारख्या उष्ण कटिबंधांत राहणाऱ्या लोकांस हा देखावा नेहमीं ध्यानांत येण्यासारखा आहे. वर्षाकालास एखादे वेळीं एकदम सुरवात होते. त्यावेळीं क्षणार्धांत सर्व क्षितिज अंधारमय दिसूं लागतें. एका काळ्या ढगावर दुसऱ्या काळ्या ढगाचें आच्छादन पडूं लागतें. अशा रीतीनें आच्छादनावर आच्छादनें चढूं लागतात. अशाच रीतीनें हें तमाचें वर्णन संहितेंत केलें आहे. बाह्य सृष्टींतून सृष्टीच्या गूढ भागाचा शोध लावण्याचा हा यत्न आहे. जड जगाच्याद्वारें जीवितांतील कोडीं उकलण्याचा यत्न बाह्य देशांप्रमाणेंच येथेंही सुरू होता. प्राचीन ग्रीक तत्त्ववेत्ते अथवा अर्वाचीन युरोपीय आचार्य बाह्य जगाच्याद्वारें अंतरात्म्याच्या गूढ सामर्थ्याचा शोध लावण्याचा यत्न ज्याप्रमाणें करीत आहेत त्याचप्रमाणें आपल्या पूर्वजांनींही फार प्राचीन काळीं याच मार्गानें यत्न केला होता. युरोपियांचा यत्न ज्याप्रमाणें सफल झाला नाहीं, त्याचप्रमाणें

आपल्या पूर्वजांचा यत्नही प्रारंभीं निष्फल झाला; पण युरोपीय तत्त्ववेत्ते जागच्याजागींच राहिले. बाह्य जगाच्याद्वारें हा शोध लागत नाहीं असें पाहून ते तेथेंच थांबले. आमच्या प्राचीन पूर्वजांसही असाच अनुभव आला; पण, हा शोध इंद्रियद्वारा लागणें शक्य नाहीं असें स्पष्टपणें जाहिर करण्याचें मनोधैर्य त्यांस होतें. केवळ जडसृष्टीच्या द्वारें केलेल्या या शोधाचा शेवट कसा होतो याचें उत्तर उपनिषदांइतकें चांगलें दुसऱ्या कोठेंही दिलेलें नाहीं. '**यतो वाचो निवर्तंते अप्राप्य मनसा सह। न तत्र चक्षुर्गच्छति न वाग्गच्छति।**" अशाच प्रकारचीं जड सृष्टीचा कमकुवतपणा दाखविणारीं अशीं दुसरींही अनेक वाक्यें उपनिषद् ग्रथांत जागोजाग आढळतात; पण आमचे प्राचीन पूर्वज येथेंच मुक्काम करून राहिले नाहींत. त्यांनीं एकदम अंतःसृष्टीच्या अभ्यासास सुरवात केली. मनुष्यस्वभावाच्या अंतर्वर्ती दिशेनें ते पुढें पाऊल टाकूं लागले. बुद्धि अंतर्मुख करून तिच्याद्वारें स्वतःच्या आत्म्यापासूनच काय उत्तर येतें, याचा शोध ते करूं लागले. बाह्यसृष्टीचा कमकुवतपणा दिसून येतांच तो नाद त्यांनीं साफ सोडून दिला. त्या बाजूनें उत्तर येण्याची आशाच नाहीं, असें त्यांस स्पष्ट दिसून आलें. जडसृष्टि निव्वळ मृतपिंडवत् असल्यामुळें तिजकडून सत्य वस्तूचें उत्तर येणें अशक्य आहे, एवढें कळल्याबरोबर ते उज्वल मानवी आत्म्याकडे वळले आणि त्या ठिकाणीं अपेक्षित उत्तर त्यांस मिळालें.

"**तमेवैकं जानथ आत्मानं अन्यावाचो विमुञ्चते।**" फक्त आत्म्याला जाणा आणि बाकीची मिथ्या भाषा सोडून द्या असें त्यांनीं स्पष्ट सांगितलें. स्वतःच्याच ठिकाणीं त्यांना परमात्म्याचा ह्मणजे या साऱ्या विश्वाच्या पतीचा शोध लागला. याचद्वारें आत्मा आणि परमात्मा यांजमधील संबंध, आत्म्याचें परमात्म्याबद्दल कर्तव्य आणि जीवात्म्याचें जीवात्म्याशीं कर्तव्य या प्रश्नाचाही निकाल याच उत्तराबरोबर लागला. याच ठिकाणीं जगांतील अत्यंत उदात्त काव्याचा प्रत्यय आपणांस येतो. या ठिकाणीं आत्म्याचें वर्णन जडभाषेंत केलेलें नाहीं. किंबहुना कोणतीही विधायक भाषा या ठिकाणीं त्यांनीं वापरली नाहीं. अनंताची कल्पना करून देण्याकरितां इंद्रियद्वारा समजणाऱ्या विषयांची योजना करण्याचें त्यांनीं सोडून दिलें. केवळ मृतवत्, चैतन्यविहीन आणि जड इंद्रियद्वारा गोचर होणाऱ्या अनंत सृष्टीची कल्पनाच त्यांनीं

सोडून दिली; पण या जागीं जी दुसरी भाषा आली तीही तितकीच सुंदर, काव्यमय आणि उदात्त आहे.

**न तत्र सूर्यो भाति न चंद्रतारकम्, नेमां विद्युतो भांति कुतोयमग्निः ।**
**तमेव भांतमनुभाति सर्वं तस्य भासा सर्वमिदं विभाति ॥**

याहून अधिक उदात्त असें दुसरें एखादें काव्य कोठें तरी आढळेल काय ? " त्या ठिकाणीं सूर्य प्रकाशत नाहीं अथवा तारे किंवा चंद्र अथवा विद्युत हीं सुद्धां प्रकाशत नाहींत; मग, अग्नीबद्दल काय बोलावें ? " अशा प्रकारचें काव्यमय वर्णन आपणास दुसऱ्या कोठेंही आढळावयाचें नाहीं. कठोपनिषदांत काव्यमय वर्णनाची अगदीं कमाल झाली आहे. त्याचा आरंभही आपणास चकित करून सोडणारा आहे.

उपनिषद् ग्रंथांसंबंधीं जो दुसरा महत्वाचा मुद्दा मला सांगावयाचा आहे तो हा कीं, हे ग्रंथ कोणत्याही व्यक्तीवर अवलंबून नाहींत. यांत अनेक नांवें आणि अनेक वक्ते आढळून येतात. तथापि उपनिषद् ग्रंथ कोणत्याही विशिष्ट व्यक्तीमुळेंच अधिकारयुक्त मानला गेला आहे असें नाहीं. त्यांतील तत्त्वरचना कोणत्याही एका व्यक्तीच्या जीवन-चरित्राशीं संलग्न झालेली नाहीं. त्यांत येणारीं नांवें अथवा त्यांतील व्यक्ती या केवळ छायेसारख्या आहेत. त्यांतील तत्त्वें हीं शुद्ध, उदात्त आणि स्वतःच्याच प्रकाशानें प्रकाशणारीं अशीं आहेत. त्यांचा प्रकाश कोणाही व्यक्तीच्या चारित्र्याच्या उदात्तपणावर अवलंबून नाहीं. या दृष्टीनें तीं अगदीं स्वतंत्र आहेत. दहा वीस याज्ञवल्क्य आले अथवा गेले तरी त्यांच्या जाण्यायेण्यानें उपनिषद् ग्रंथांतील तत्त्वांत कमीअधिकपणा येणार नाहीं. कोणत्याही परिस्थितींत असले तरी ते तसेच उज्वल रहावयाचे. तथापि असें असतांही उपनिषद् ग्रंथ व्यक्तिपूजेच्या विरुद्ध आहेत असें मात्र नाहीं. जगांत आजपर्यंत उत्पन्न झालेल्या व पुढेंही उत्पन्न होणाऱ्या सर्व महापुरुषांस आलिंगन देण्याइतके त्यांचे बाहू विशाल आणि अंतःकरण उदार आहे. कोणत्याही अवतारांची अथवा महापुरुषांची पूजा करण्यास उपनिषदांच्या मतें प्रत्यवाय नाहीं. तसेंच कोणाला केवळ बुद्धिमार्गानें या तत्त्वांचा विचार करावयाचा असेल तर कोणत्याही व्यक्तीशीं संबंध येऊं न देतां अर्वाचीन भौतिक शास्त्राप्रमाणें त्याला त्या मार्गानें नेण्याचीही त्यांची तयारी आहे. आमच्या धर्मग्रंथांचें स्वरूप अशाप्रकारचें आहे.

ख्रिस्त्यांना ज्याप्रमाणें बायबल, मुसलमानांना कुराण अथवा पारशांना झेंदा-वेस्ता हे ग्रंथ पूज्य आहेत, त्याचप्रमाणें उपनिषद् ग्रंथही आम्हां हिंदूंस पूज्य आहेत. निरनिराळे धर्मग्रंथ इतर धर्मानुयायांस जसे मार्गदर्शक आहेत, तसेच हे ग्रंथ आम्हांसही आहेत. पुराणें, तंत्रग्रंथ आणि इतर पुस्तकें अथवा व्याससूत्रें हीं कमी अधिक प्रमाणानें उपनिषद् ग्रंथांच्या मानानें दुसऱ्या प्रतीचीं आहेत. श्रुती ह्याच आमचीं मुख्य धर्मपुस्तकें होत. स्मृति आणि पुराणें यांचा उपनिषद् ग्रंथांशीं विरोध नसेल तोंपर्यंतच आम्हांस तीं मान्य आहेत. ज्या ठिकाणीं त्यांचा स्मृतींशीं विरोध येईल त्या ठिकाणीं कसलीही दयामाया न करतां त्यांचा त्याग करावयाचा ही गोष्ट आपण विशेषेंकरून नित्य लक्ष्यांत बाळगिली पाहिजे. पण दुर्दैवेंकरून या प्रमुख गोष्टीचा विसर सांप्रत आपणांस पडला आहे. हल्लींच्या काळीं एखाद्या खेड्यांतील लोकरूढि, उपनिषद् ग्रंथांहून अधिक प्रमाणभूत होऊन बसली आहे. "जुनी पद्धति" या शब्दांतच आज केवढीतरी जादू भरून राहिली आहे. कर्मकांडांतील एखादा भिकारसा विधि पाळणाऱ्या एखाद्या खेडवळासही आपण जुन्या पद्धतीनें चालणारे आहोंत असा मोठा अभिमान असतो. आपल्या मार्गानें न चालणाऱ्या दुसऱ्या हिंदूला तो हिंदूसुद्धां समजत नाहीं. दुर्दैवानें आमच्या मातृभूमींत आज अशी स्थिति उत्पन्न झाली आहे कीं, एखाद्या क्षुद्र तंत्रक्रियेला प्रमुख मान मिळाला असून तोच धर्म मानण्यांत येत आहे. असली एखादी क्रिया न पाळणारा मनुष्य अस्सल हिंदूच नाहीं असें लोक समजतात. याकरितां उपनिषद् ग्रंथ हेच आपले खरे धर्मग्रंथ असून तेच खरे प्रमाणभूत ग्रंथ आहेत हें विशेषेंकरून आपण लक्ष्यांत बाळगिलें पाहिजे. गृह्य आणि श्रौत-सूत्रें हीं उपनिषद् ग्रन्थांच्या खालच्या पायरीचीं आहेत, हें केव्हांही विसरतां उपयोगी नाहीं. उपनिषद् ग्रंथ ऋषिप्रणित आहेत आणि आपणास आपलें हिंदुत्व कायम राखावयाचें असेल तर त्यांचीच आज्ञा आपण प्रमाण मानली पाहिजे. तुम्हीं कसल्याही विक्षिप्त देवदेवतांची पूजा केली, तरी त्यासही हरकत नाहीं. पण तुम्ही श्रुतिग्रंथ प्रमाण मानले नाहींत तर मात्र तुम्ही नास्तिक या पदवीस खरोखरच पात्र व्हाल.

ख्रिस्ती किंवा बौद्ध धर्मग्रंथ आणि हिंदू धर्मग्रंथ यांत हाच एक मोठा फेर आहे. ख्रिस्ती किंवा बौद्ध ग्रंथ हे जवळजवळ पुराणासारखे आहेत.

त्यांत जलप्रलयाचें वर्णन आणि राजांचे इतिहास व सत्पुरुषांचीं जीवनचरित्रें इत्यादिकांचा समावेश झाला आहे. अशाप्रकारच्या गोष्टी नमूद करून ठेवणें हें काम मुख्यत: पुराणांचें आहे; आणि जोंपर्यंत यांतील वर्णन श्रुतीला सोडून नाहीं तोंपर्यंत तें ठीकही आहे. याच दृष्टीनें पाहतां बायबल् वगैरे ग्रंथांतील वर्णनें जोंपर्यंत श्रुतितत्त्वांशीं मिळून असतील तोंपर्यंत तीं ग्राह्य समजण्यास हरकत नाहीं; पण श्रुतितत्त्वांशीं त्यांचा विरोध आला ह्मणजे तीं त्याज्यच समजलीं पाहिजेत. हीच गोष्ट कुराणासही लागू आहे. या सर्व ग्रंथांत पुष्कळ नीतितत्त्वें ग्रथित केलीं आहेत आणि श्रुतितत्त्वांशीं त्यांचा विरोध येत नसेल तोंपर्यंत पुराणांइतकें महत्व त्यांना दिलें पाहिजे. तसेंच या ग्रंथांचें महत्त्व पुराणांहून अधिक नाहीं हेंही लक्ष्यांत ठेविलें पाहिजे. वेदग्रंथ कोणाही विशिष्ट व्यक्तीनें लिहिलेले नाहींत. किंबहुना ते अमुक एका विशिष्ट कालीं अस्तित्वांत आले असेंही नाहीं. एका खिस्ती उपदेशकानें मला असें ह्मटलें कीं, खिस्ती धर्मग्रंथांना ऐतिहासिक पुरावा असल्यामुळें ते खरे आहेत. यावर मी त्याला उत्तर दिलें, ' आमचे धर्मग्रंथ ऐतिहासिक कालातीत नसल्यामुळेंच खरे ते आहेत.' खिस्ती ग्रंथ ऐतिहासिक आहेत याचा अर्थ हाच कीं, ते कोणातरी मनुष्यानें एका विशिष्ट कालीं लिहिले आहेत. ते मनुष्यकृत ग्रंथ आहेत, आणि हिंदू ग्रंथ मनुष्यकृत नाहींत ही गोष्ट त्यांच्या बाजूचीच आहे. वेदग्रंथांचा इतर धर्मांच्या ग्रंथांशीं काय संबंध आहे हें यावरून लक्ष्यांत येईल.

आतां उपनिषद् ग्रंथांत कोणतीं तत्त्वें ग्रथित झालीं आहेत याचा विचार करूं. उपनिषद् ग्रंथ अनेक आहेत. यांतील कित्येक पूर्णपणें द्वैतवादी आहेत. आतां द्वैतवादी ह्मणजे काय, हें पाहूं. हिंदुस्थानांतील अनेक पंथांत कांहीं गोष्टींबद्दल एकवाक्यता आहे. पुनर्जन्माबद्दल सर्वांची एकवाक्यता आहे. त्याचप्रमाणें सृष्टीची स्थिति आणि लय याबद्दलही एकवाक्यता आहे. मनुष्याच्या रचनेबद्दलही सर्वांची एकवाक्यता आहे. प्रथम जडदेह, त्याच्या आंत सूक्ष्मदेह, त्याच्या आंत मन आणि सर्वांच्या आंत जीवात्म्याचा वास आहे याबद्दलही सर्वांची एकवाक्यता आहे. मानवी रचनेबद्दल पाश्चात्य आणि हिंदू तत्त्वशास्त्र यांत फरक आहे. पाश्चात्य सूक्ष्म इंद्रियशास्त्राप्रमाणें मन हाच आत्मा असें आहे. आमच्या मतें ही गोष्ट

खरी नाहीं. आमच्या मतें अंतःकरण अथवा मन हें जीवात्म्याच्या हातांतील एक करण किंवा साधन असून त्याच्या द्वारें तो शारीरिक क्रिया करीत असतो. या तत्त्वाबद्दल आमच्यांतील अनेक पंथांची एकवाक्यता आहे. तसेंच जीवात्मा अनादि आहे व मोक्ष होईपर्यंत तो पुनःपुनः जन्म घेत राहतो याबद्दलही सर्वांची एकवाक्यता आहे. त्याचप्रमाणें हिंदू आणि पाश्चात्य यांच्या मतांत जो एक महत्वाचा फेर आहे, त्यांतही सर्वांची एकवाक्यता आहे. जीवात्मा वस्तुतः परिपूर्ण आहे, याबद्दल आह्मां सर्वांची एकवाक्यता असून पाश्चात्य दर्शनकारांस हें ह्मणणें सम्मत झालेलें नाहीं. सर्वप्रकारचें सामर्थ्य, पावित्र्य आणि महत्व हीं स्वभावतःच जीवात्म्यांत आहेत. अणिमा, लघिमा इत्यादि सिद्धि ह्या वस्तुतः बाहेरून कोठून प्राप्त करून घ्यावयाच्या नसून त्या फक्त प्रकट करावयाच्या असतात असें कोणीहि योगी तुह्मांस सांगेल. आपल्या पायाखालीं नित्य तुडविल्या जाणाऱ्या अत्यंत क्षुद्र कीटकांतही अणिमा, लघिमादि सर्व प्रकारच्या शक्ति सूक्ष्मरूपानें वसत आहेत असें पतंजलींचें ह्मणणें आहे. त्यांच्या ठिकाणीं जो फरक आपणास आढळून येतो तो फक्त देहनिर्मित आहे. त्याच किड्याला अधिक चांगलें शरीर मिळालें तर या सर्व शक्ति प्रकट होतील. आज त्या स्पष्ट दिसत नसल्या तरी त्याचें कारण, त्या प्रकट व्हावयास योग्य मार्ग नाहीं हेंच होय. '**निमित्तमप्रयोजकं प्रकृतीनाम् वरण भेदस्तु ततः । क्षेत्रिकवत्**' 'चांगलीं किंवा वाईट कृत्यें हीं प्रकृतीचा स्वभाव बदलण्यास कारण होत नसून तिच्या उत्क्रांतींतील अडथळे दूर करण्यास मात्र कारण होतात. शेताला पाणी लावणारा शेतकरी पाण्यांतील अडथळे मात्र ज्याप्रमाणें दूर करतो त्याच प्रमाणें सत्कृत्यें, प्रकृतीच्या उत्क्रमण मार्गांतील अडथळे मात्र दूर करतात. हें श्रीकपिलांचें सूत्र आहे. एखाद्या तळ्यांतून पाणी आणून शेतकरी आपल्या शेतास तें कसें पुरवितो याचें उदाहरण श्रीकपिलांनीं याठिकाणीं दिलें आहे. तळें सबंध भरलेलें असतांही त्यांतील पाण्याच्या मार्गांत अडथळे असल्यामुळें तें शेतापर्यंत पोहोंचूं शकत नाहीं. हे अडथळे दूर झाले ह्मणजे केवळ स्वतःच्याच सामर्थ्यानें पाणी शेताकडे आपोआपच वाहूं लागतें. त्याचप्रमाणें पावित्र्य, सर्वप्रकारचें सामर्थ्य आणि पूर्णता यांचा वास जीवा-

त्म्याच्या ठिकाणीं स्वभावतःच असतांही विशिष्ट देहबंधामुळें तो अपवित्र आणि अपूर्णसा भासतो. जीवात्म्यावर देहाचें आवरण पडलेलें आहे. हें आवरण एकवेळ निघून गेलें ह्मणजे तो आपल्या पूर्ण पावित्र्यानें आणि तेजानें प्रकाशूं लागेल. पाश्चात्य आणि पौर्वात्य विचारसरणींत जो हा मोठा फरक आहे, तो आपण नित्य लक्ष्यांत ठेविला पाहिजे. या मुळांतील फरकामुळेंच पाश्चात्यांची एकंदर विचारसरणी दूषित झालेली आहे. मनुष्यें हीं जन्मतःच पापी आहेत या भयंकर मताचा उगम याच विचारसरणींतून झाला आहे. आणि असल्या दुष्ट विचारसरणीवर ज्यांचा विश्वास बसत नाहीं ते लोक जन्मतःच दुष्ट आहेत असेंही ते म्हणतात. खरोखर आपण सारे जर जन्मतःच पापी असूं तर, आपण कधींतरी पुण्यवान् होऊं कीं काय, याचा विचार हे पाश्चात्य धर्मोपदेशक कधींही करीत नाहींत. प्रकृतीचा स्वभाव बदलणें कधीं तरी शक्य आहे काय ? ज्यांत बदल होऊं शकतो तो मूलस्वभाव अथवा प्रकृतिधर्म या नांवास पात्रच होऊं शकत नाहीं. प्रकृतिधर्म कधींही बदलणार नाहीं. या दोन्ही विचारसरणींतील हा फरक अत्यंत महत्वाचा असल्यामुळें नित्य लक्ष्यांत ठेविला पाहिजे. या बाबतींतही द्वैती, अद्वैती आणि इतर सर्व प्रकारचे मतवादी यांची एकवाक्यता आहे. यानंतर परमेश्वराच्या अस्तित्वाबद्दल आमच्यांतील सर्व मतवाद्यांची एकवाक्यता आहे हा मुद्दा होय. परमेश्वराबद्दल त्यांच्या कल्पना वेगवेगळ्या असल्या तरी त्याच्या अस्तित्वाबद्दल मतभेद नाहीं. द्वैतवादी, परमेश्वर व्यक्त आहे असें मानितात. व्यक्त परमेश्वर ह्मणजे काय ? याबद्दल थोडासा खुलासा करणें इष्ट आहे. व्यक्त ह्मणजे सशरीर परमेश्वर नव्हे. तो आकाशांत कोठें राहून तेथून पृथ्वीचें शासन करतो असेंही नव्हे. तर व्यक्त ह्मणजे सगुण इतकाच अर्थ घ्यावयाचा. व्यक्त परमेश्वराची अनेकांनीं अनेक प्रकारें वर्णन केलें आहे. तो विश्वाचा उत्पन्नकर्ता, रक्षणकर्ता आणि संहारकर्ता असून विश्वाचें नियमनही तो करतो; याबद्दल सर्वांची एकवाक्यता आहे. अद्वैतमतवाद्यांचें मत याहून थोडें निराळें आहे. त्यांच्या मतें परमेश्वर व्यक्त आणि अव्यक्त अशा दोन्ही स्वरूपांचा आहे. हें मत द्वैतवाद्यांच्या मताहून अधिक उच्च आहे. अद्वैतवाद्यांच्या मतें परमेश्वर निर्गुण असल्यामुळें कोणत्याही विशेषणांनीं त्याच्या स्वरूपाचा बोध करून घेणें शक्य नाहीं. याकरितां त्यांनीं " सच्चि-

दानन्द " इतकेंच नांव दिलें आहे. हें नांव शंकराचार्यांनीं दिलें. पण उपनिषद् ग्रंथांची मजल याच्याही पुढें गेली आहे. उपनिषद् ग्रंथांनीं त्याचें वर्णन ' नेति, नेति, ' या निषेधात्मक वाक्यांनीं केलें आहे. या बाबतींतही हिंदुस्थानांतील सर्व मतांची एकवाक्यता आहे. द्वैतमतवाद्यांचे मुकुटमणि श्रीरामानुज हे होत. हिंदुस्थानांतील या महापुरुषाबद्दल बंगालच्या लोकांना फारशी माहिती नाहीं ही ठया खरोखर मोखेदाची गोष्ट आहे. बंगाल्याखेरीज इतर ठिकाणीं जन्म पावलेल्या मोठया धर्मप्रवर्तकांबद्दल बंगाल्यांतील लोकांत गाढ अज्ञान भरलें आहे. विशेषेंकरून लक्ष्यांत ठेवण्यासारखी गोष्ट ही कीं, मुसलमानी रियासतींत जितके धर्ममतप्रवर्तक होऊन गेले त्यांपैकीं एक श्रीचैतन्य वगळून बाकीचे सारे दक्षिण हिंदुस्थानांत जन्मले होते. यामुळें हिंदुस्थानांत धर्माच्या बाबतींत दक्षिणेचाच बाकीच्या साऱ्या भागावर प्रभाव दिसून येतो. खुद्द चैतन्यांविषयीं ह्मटलें तर तेही माध्वपंथाचेच होते. रामानुजांच्या मताप्रमाणें परमात्मा, आत्मा आणि प्रकृति अशा तीन अनंत वस्तू आहेत. आत्मे अनंत काळ आणि परस्परांपासून सदोदित भिन्न राहावयाचे असें त्यांचें मत आहे. प्रत्येक आत्मा इतर आत्म्याहून सदोदित निराळा राहणारा असून प्रकृति ही अनंत काल अशीच चालावयाची आहे. परमात्म्याचें आणि आत्म्याचें अस्तित्व जितकें सत्य आहे तितकेंच प्रकृतीचें अस्तित्वही सत्य आहे असें श्रीरामानुज ह्मणतात. त्यांच्या मतें आत्म्यांतही परमात्म्याचा अंश आहे. आत्म्याच्या ठिकाणीं परमात्मा अंतर्यामी आहे. या दृष्टीनें रामानुजांच्या मतें आत्मा आणि परमात्मा एकरूपच आहेत असें ह्मणावयास हरकत नाहीं. प्रलयाच्या वेळीं सर्व प्रकृति संकुचित होते त्यावेळीं हे भिन्न आत्मेही संकुचित होऊन त्याच स्थितींत कांहीं काळ राहतात. नव्या कल्पास आरंभ झाला ह्मणजे ते या स्थितींतून बाहेर येतात व आपल्या कर्माप्रमाणें सुखदु:खादि फलांचा उपभोग घेतात. आत्मा हा स्वभावतःच परिपूर्ण व पवित्र आहे; पण दुष्कृत्यांनीं त्याचा संकोच होतो. ज्या ज्या कृत्यांनीं आत्म्याचा संकोच होईल तें पाप व ज्या कृत्यांनीं त्याचा विकास होईल तें पुण्य, अशा पापपुण्याच्या व्याख्या श्रीरामानुजांनीं केल्या आहेत. अशा रीतीनें संकोच आणि विकास या स्थितींतून आळीपाळीनें आत्मा परिभ्रमण करीत असतां परमात्म्याच्या कृपेनें त्याला मुक्तिलाभ होतो. जे आत्मे शुभकृत्यांनीं आपली

उन्नति करून घेण्याच्या मार्गास लागले असतील त्यांजवर परमेश्वराची कृपा होते.

'**आहारशुद्धौ सत्वशुद्धिः सत्वशुद्धौ ध्रुवास्मृतिः।**' असें एक श्रुतिवचन आहे. आहारशुद्धीनें सत्वाची शुद्धि होते व सत्वाच्या शुद्धीनें स्मृति शुद्ध होते. स्मृति ह्मणजे आपण वस्तुतः पूर्ण आहों या वस्तुस्थितीची आठवण. या ठिकाणीं बराचसा वादविवाद झालेला आहे. सत्व ह्मणजे काय ? सांख्यमताप्रमाणें आमचा देह त्रिगुणात्मक वस्तूंचा बनलेला आहे. हें सांख्यांचें मत सर्व दर्शनकारांनीं मान्य केलेलें आहे. सत्व, रज आणि तम हे फक्त गुण आहेत असा सर्वत्र समज आहे; पण हे गुण नसून ज्या वस्तूंचें हें विश्व झालें आहे त्या वस्तूंचीं हीं नांवें आहेत. याकरितां आहारशुद्धि झाली ह्मणजे त्या शुद्ध अन्नापासून सत्व नामक वस्तु शुद्ध होते. सत्वाचें प्राबल्य स्वतःच्या ठिकाणीं उत्पन्न करणें हा सर्व वेदान्ताचा मूळ हेतू आहे. आत्मा स्वभावतःच परिपूर्ण आणि अत्यंत शुद्ध असून रज आणि तम या वस्तूंनीं आच्छादिलेला आहे हें वेदान्ताचें मत मी आपणास अगोदर सांगितलेंच आहे. सत्वाचे परमाणू अत्यंत तेजस्वी असतात; आणि शुभ्र काचेंतून उजेडाचे किरण जसे सहज रीतीनें पलीकडे निघून जातात त्याचप्रमाणें सत्वांतून आत्म्याचे किरण सहज रीतीनें बाहेर पडतात. याकरितां रज आणि तम यांचे परमाणू नाहींसे होऊन फक्त सत्वपरमाणू शिल्लक उरले ह्मणजे आत्म्याचें स्वरूप व्यक्त होऊन त्याचें सामर्थ्य आणि त्याची शुद्धता यांचा प्रत्यय येईल.

याकरितां हें सत्व आपणापाशीं असण्याची जरूर आहे. आहारशुद्धीनें सत्वशुद्धि होते असें श्रुतीनें ह्मटलें आहे. आहार या शब्दाचा अर्थ श्रीरामानुजांनीं अन्न असा केला आहे. आणि याच शब्दावर त्यांनीं आपल्या साऱ्या विचारसरणीची इमारत उभारली आहे. याच शब्दावर अनेक रणें माजलीं असून अनेकांनीं याचे अनेक अर्थ केले आहेत. याकरितां याचा अर्थ बरोबर समजून घेणें आपणास अवश्य आहे. आहारशुद्धि हा आपल्या साऱ्या जीवितांतील अत्यंत महत्वाचा भाग आहे, असें श्रीरामानुजांचें मत आहे. श्रीरामानुजांच्या मतें तीन गोष्टींमुळें अन्नांत दोष उत्पन्न होतो. पहिला जातिदोष; कांदा, लसूण, इत्यादि पदार्थांत जो स्वभावतःच दुर्गंध अ-

सतो तो त्याचा जातिदोष होय. दुसरा आश्रयदोष; ह्मणजे ज्याकडून आपणास अन्न प्राप्त होतें त्याच्या संपर्कामुळें उत्पन्न झालेला दोष. दुष्टाकडून येणाऱ्या अन्नांत आश्रयदोष असतो. यासंबंधीं अत्यंत कडक निर्बंध पाळणारे असे पुष्कळ महापुरुष हिंदुस्थानांत माझ्या पाहण्यांत आले आहेत. अंतर्ज्ञानानें हा आश्रयदोष जाणण्याचें सामर्थ्य या सत्पुरुषांच्या आंगीं होतें. अन्न कोठून आलें व त्याला कोणाचा स्पर्श झाला हें पाहिल्यावांचून हे सत्पुरुष कधींही अन्न ग्रहण करीत नसत. हा अनुभव मला शेंकडों वेळां आला आहे. तिसरा निमित्तदोष; ह्मणजे अन्नाला अशुद्ध वस्तूंच्या संसर्गामुळें उत्पन्न होणारा दोष. या आहारशुद्धीसंबंधीं थोडा अधिक विचार करणें योग्य आहे. कसल्याही स्थितींत असलेलें व केरकचरा मिसळलेलें अन्न सेवन करण्याचा प्रघात हिंदुस्थानांत बराच पडत चालला आहे. याकरितां हे तीन दोष ज्या अन्नांत नसतील असें अन्न सेवन केलें तर सत्वशुद्धी अवश्य प्राप्त होईल. तथापि एवढ्यानेंच सारा कार्यभाग होतो असें मात्र समजूं नये. केवळ शुद्ध अन्नसेवन केल्यानें जर प्रत्येक मनुष्य धार्मिक बनूं लागेल तर धर्म ह्मणजे परसांतली भाजी होऊन बसेल. अशाप्रकारची आहारशुद्धि राखणें हें कांहीं फारसें कठीण काम नाहीं. आतां आहारशुद्धीचा अर्थ श्रीशंकराचार्यांनीं कसा केला आहे याचा विचार करूं. आहार ह्मणजे मनांत सांठविलेले विचार, असा आचार्यांचा अर्थ आहे. याकरितां मनःशुद्धि झाली ह्मणजे सत्वशुद्धि होईल व नुसत्या शुद्ध अन्नानें ती होणार नाहीं, असें श्रीशंकराचार्य ह्मणतात. केवळ अन्नशुद्धीनें सत्वशुद्धी होत असेल तर माकडाला शुद्ध अन्न दिल्यानें तें योगी बनलें पाहिजे. गाई, बैल, आणि हरणें हीं मोठीं योगी बनलीं पाहिजेत. केवळ गंगास्नानानें मोक्ष प्राप्त होत असता तर माशांना सर्वांच्या आधीं मोक्ष मिळाला पाहिजे. याकरितां आहारशुद्धि ह्मणजे मनःशुद्धि असा श्रीशंकराचार्यांचा अर्थ आहे.

आतां या दोन मतांत आपण कोणतें ग्राह्य मानावें ? आपणास दोन्ही मतें मान्य असलीं पाहिजेत. आपणास दोहोंचाही उपयोग आहे. या दोन अर्थांत श्रीशंकराचार्यांचा अर्थ मुख्य आहे ही गोष्ट खरी; तथापि, अन्नशुद्धीनें मनःशुद्धीस मदत होते ही गोष्टसुद्धां खोटी नाहीं. अन्न आणि मन यांचा बराचसा निकट संबंध आहे. याकरितां हे दोन्ही अर्थ आपण

ध्यानांत ठेविले पाहिजेत. पण हिंदुलोक आजमितीस श्रीशंकराचार्यांचा अर्थ विसरले असून श्रीरामानुजांचा अर्थ मात्र त्यांनीं पक्का ध्यानांत ठेविला आहे. आमचा धर्म चुलकोंबडा झाला आहे असें मी ह्मटलें ह्मणजे पुष्कळ लोक संतापानें वेडे होतात; पण, मजबरोबर कोणीं मद्रासेस आला तर या बाबतींत त्याची मी खात्री करून देईन. बंगाली लोक याहून अधिक चांगले आहेत. एखाद्या मनुष्याची दृष्टि आपल्या अन्नावर गेली तर तेवढ्याचसाठीं मद्रासेंतील लोक तें अन्न फेंकून देतात. पण इतकी अन्नशुद्धि राखूनही मद्रासी लोक इतरांपेक्षां अधिक चांगले असल्याचें माझ्या पाहण्यांत नाहीं. केवळ अन्नशुद्धीनें पूर्णत्वाची प्राप्ती होत असती तर मद्रासी लोकांत पूर्णत्व पावलेले हजारों आढळले असते; पण तसें झाल्याचें आढळून येत नाहीं.

याकरितां हे दोन्ही अर्थ आपणास मान्य करावयाचे असले तरी श्रीरामानुजांच्या अर्थास भलतेंच महत्व देतां कामा नये. पूर्णत्व प्राप्त करून घेण्याकरितां दोन्ही अर्थ आपणा मान्य केले पाहिजेत. सध्यां वर्णाश्रमधर्मासंबंधीं आणि अन्नशुद्धीसंबंधीं बरीच हाकाटी ऐकूं येते; आणि या बाबतींत बंगाली लोकांनीं तर फारच ओरड चालविली आहे; पण वर्णाश्रमधर्माबद्दल तुह्मांस खरोखरच काय माहिती आहे असा प्रश्न मी तुह्मांस विचारतों. आज हिंदुस्थानांत पूर्वींचे चार वर्ण शिल्लक तरी राहिले आहेत काय? या प्रश्नाचें उत्तर प्रथम द्या. मला तरी या वर्णांचें अस्तित्व सांप्रत दिसत नाहीं. मग वर्णाश्रमधर्म ह्मणजे तरी काय? माझ्या दृष्टीनें तर सांप्रत ब्राह्मण आणि शूद्र असे दोनच वर्ण दिसत आहेत. क्षत्रिय आणि वैश्य हे वर्ण शिल्लक असले तरी आज त्यांचें अस्तित्व प्रत्यक्ष दिसत नाहीं. जर क्षत्रिय आणि वैश्य हे वर्ण शिल्लक असतील तर तुह्मीं ब्राह्मणांनीं यज्ञोपवित देऊन त्यांजकडून वेदाभ्यास कां करवूं नये? वेदाभ्यास करणें हें या तिन्ही वर्णांचें काम आहे. जर क्षत्रिय आणि वैश्य यांचें अस्तित्व आमच्या देशांत नसेल आणि जर येथें ब्राह्मण आणि शूद्र हे दोनच वर्ण शिल्लक उरले असतील तर ब्राह्मणांनीं आपलें सर्व सामानसुमान बरोबर घेऊन देशत्याग केला पाहिजे असें शास्त्रवचन आहे. म्लेच्छांच्या राज्यांत वास करणाऱ्या आणि म्लेच्छांचें अन्न खाणाऱ्या लोकांबद्दल शास्त्रें काय ह्मणतात हें तुह्मीं कधीं पाहिलें आहे काय? या कृत्याबद्दल शास्त्रांत

काय प्रायश्चित्त सांगितलें आहे हें तुह्मांस ठाऊक आहे काय ? याला प्रायश्चित्त अग्निकाष्टभक्षण हेंच शास्त्रानें सांगितलें आहे. तुह्मी दांभिकपणानें मोठे धर्मगुरु ह्मणून मिरवूं पहातां काय ? एकेवेळीं एक ब्राह्मण शिकंदर बादशहाकडे गेला होता. तेथें म्लेच्छांचें अन्न खावें लागेल ह्मणून त्यानें अग्निकाष्टें भक्षण केलीं. तुमच्या शास्त्रावर तुमचा विश्वास असेल तर या ब्राह्मणाचें अनुकरण तुह्मांस प्रथम केलें पाहिजे. तुह्मीं खरोखर इतक्या निश्चयानें वागलां तर सारा देश तुमच्या चरणधूलीचें वंदन करील. खरा प्रकार असा आहे कीं, तुमच्या शास्त्रांवर तुमचाच विश्वास नाहीं; पण लोकांनीं मात्र त्यांजवर विश्वास ठेविला पाहिजे असें तुमचें ह्मणणें आहे. कलियुगांत शास्त्रवचनाप्रमाणें तंतोतंत वागणें शक्य नाहीं असें तुमचें ह्मणणें असेल तर हा स्वतःचा भेकडपणा प्रांजलपणें तुह्मीं कबूल करा. त्याचप्रमाणें दुसऱ्यांच्या दोषांकडेही कानाडोळा करून इतर जातींस वर आणण्याची खटपट करा. त्यांना वेदाभ्यास करूं द्या ह्मणजे तेही इतरांप्रमाणेंच खरे आर्य होतील; आणि अशा कृतीनें तुह्मीं स्वतःही आर्य व्हाल.

बंगाल्यांत जे कांहीं घाणेरडे वामाचार रूढ झाले आहेत ते बंगाली लोकांनीं त्वरित सोडून दिले पाहिजेत. हिंदुस्थानच्या इतर भागांची ओळख बंगाली लोक विसरून गेले आहेत. बंगाली समाजांत हे वामाचार इतके खोल शिरले आहेत कीं, ते पाहून बंगाली समाजाची मला खरोखर फार कींव येते. सुधारणेची बढाई मारणाऱ्या बंगाली लोकांना तर असले प्रकार केवळ लांछनास्पद होत. असल्या वामाचारप्रिय पंथांनीं बंगाली समाजाची चाळणी करून सोडली आहे. '**आचारः प्रथमोधर्मः**' असा डिंडिम दिवसा मोठ्यानें वाजवून हेच लोक रात्रीं पापगर्तेत लोळत असतात; आणि असल्या घाणेरड्या वर्तनाला घाणेरड्या चोपड्यांतील वचनांचा आधारही देतात. बंगाल्यांचीं शास्त्रें ह्मणजे वामाचार तंत्रें होत. हीं चोपडीं खटाऱ्यांनीं प्रसिद्ध होत असतात; आणि तीं मुलांच्या हातीं पडून त्यांचें मन विषदिग्ध करीत असतात. कलकत्त्यांतील बापांनों, आपल्या कोमल अर्भकाच्या हातीं असलीं विषारी चोपडीं देतांना तुह्मांस कांहीं शरम वाटत नाहीं काय ? यांपैकीं कांहीं चोपडीं तर भाषांतरासुद्धां छापलेलीं असतात. असलीं घाणेरडीं चोपडीं शास्त्रें ह्मणून मुलांच्या हातीं देतांना तुह्मांस खरोखर फार लाज वाटली

पाहिजे. आतां लज्जेचा कांहीं यत्किंचित् अंश तरी तुमच्या मनांत शिल्लक उरला असेल तर हीं चोपडीं फाडून टाकून त्याऐवजीं गीता, उपनिषद् ग्रंथ आणि इतर शास्त्रीय पुस्तकें आपल्या मुलांच्या हातीं द्या.

प्रत्येक जीवात्मा स्वतंत्र असून अखेरपर्यंत तो तसाच विभक्त राहतो व परमेश्वर पूर्वी उपलब्ध असलेल्या वस्तूंतून जग निर्माण करितो अशीं द्वैतवाद्यांचीं मतें आहेत. अद्वैतवाद्यांच्या मतें परमेश्वर हा विश्वाचें निमित्त आणि उपादान कारण आहे. द्वैतवाद्यांच्या मतें तो केवळ निमित्तकारण मात्र आहे. अद्वैतवाद्यांच्या मतें परमेश्वर ज्याप्रमाणें स्वतः विश्वरचना करतो त्याचप्रमाणें ती विश्वरचना तो स्वतां:तून करतो. विश्वरचना करतांना त्याला कोणत्याही बाह्यवस्तूचा आश्रय करावा लागत नाहीं, असें अद्वैतवाद्यांचें मत आहे. दैतवाद्यांत कांहीं पंथ थोड्या भिन्न मताचे आहेत. त्यांच्या मतें परमेश्वर हा विश्वाचें उपादानकारण असला, ह्मणजे तो विश्व स्वतां:तूनच निर्माण करीत असला तरी विश्वापासून स्वभावतः तो भिन्न असतो हा भेद कायमचा आहे. त्याचप्रमाणें इतर कांहीं पंथांच्या मतें परमेश्वरानें हें विश्व निर्माण केलें असलें तरी जीवात्म्याला कालेंकरून निर्वाणपदाची प्राप्ती करून घेतां येते. आणि अशा रीतीनें जीवात्मा अनंताशीं एकरूप होतो; पण हे पंथ सांप्रत लुप्त झाले आहेत. सांप्रतचा अद्वैतवाद्यांचा पंथ हा श्रीशंकराचार्यांचा अनुयायी आहे. श्रीशंकराचार्यांच्या मतें परमेश्वर विश्वाचें निमित्त आणि उपादान कारण असला तरी ही गोष्ट वस्तुत: घडत नसून केवळ मायेमुळें घडल्यासारखी वाटते. या ठिकाणीं आमच्या तत्त्वदर्शनांतील एक महत्वाचा मुद्दा विचार करण्यासारखा आहे; पण आज वेळाच्या अभावामुळें मला त्याचा विचार करतां येत नाहीं. तुह्मांपैकीं ज्यांनीं पाश्चात्य तत्त्वज्ञानाचा अभ्यास केला असेल त्यांना कँटच्या पुस्तकांत जवळजवळ अशाच प्रकारची विचारसरणी आढळून आली असेल. प्रोफेसर मॅक्समुल्लर यांचे कँटवरील निबंध तुह्मांपैकीं ज्यांनीं वाचले असतील त्यांना एक सूचना मला करावयाची आहे. यासंबंधीं प्रोफेसर मॅक्समुल्लर यांनीं एक चूक केली आहे. काल, देश आणि निमित्त व माया या कल्पनांत जें साम्य आहे तें श्रीशंकराचार्यांनींच प्रथम शोधून काढलें आहे. श्रीशंकराचार्यांच्या भाष्यांतून या बाबतींत एकदोन उतारे काढून ते माझे मित्र प्रोफेसर मजकूर यांस

मी पाठविले होते. देश, काल आणि निमित्त या कल्पनेचा जन्म पाश्चात्य देशांत झाला नसून तत्पूर्वी ती कल्पना आमच्या देशांत जन्मास आली होती, इतकेंच ध्यानांत ठेवण्याची सूचना मी करतों. अद्वैतवाद्यांचा हा मायावाद फार चमत्कारिक आहे. जें कांहीं अस्तित्व ह्मणून आहे, तें वस्तुतः एकरूप ब्रह्म असतांही मायेमुळें तें अनेकधा भासतें, असा अद्वैतवाद्यांचा सिद्धांत आहे. ब्रह्मरूप–एकरूप–होणें हें आमचें अखेरचें साध्य आहे. या बाबतींतही पौर्वात्य आणि पाश्चात्य विचारसरणींत फरक आहे. हिंदुस्थानांत हें मत प्रचलित झाल्यास हजारों वर्षांचा काळ लोटून गेला आहे. याविरुद्ध दुसरें एखादें मत असल्यास तें खरें करून दाखवा असें आव्हान या भरतभूमीनें साऱ्या जगास हजारों वर्षांपूर्वी केलें. भरतभूमीचें हें आव्हान स्वीकारून जगानें निरनिराळ्या परीनें त्याला उत्तर देण्याचा यत्न केला; पण अखेरीस त्याचा परिणाम इतकाच झाला कीं, हें उत्तर देणारीं राष्ट्रें काळाच्या पोटांत गडप झालीं असून आम्ही मात्र अझूनही शिल्लक राहिलों आहोंत. हें सर्व जग मायाकृत ह्मणजे भ्रमनिर्मित आहे असें आम्हीं पुनःपुनः कंठरवानें सांगत आलों आहों. तुम्हीं भूमीवरचीं शितें वेंचून खात असलां अथवा सोन्याच्या ताटांत जेवत असलां, तुम्हीं प्रचंड राजवाड्यांत राहत असलां अथवा भिकार झोंपडींत वास करीत असलां, तथापि तुह्मां सर्वांचा शेवट एकच आहे. मृत्यूच्या दृष्टीनें तुम्हीं सर्व सारखेच आहां. हें सर्व सारखेंच मायानिर्मित आहे. आमचें हें मत खोडून काढण्याकरितां नवीं नवीं राष्ट्रें पुनःपुनः पुढें येऊन एकसारखीं धडपड करीत असतात. ऐहिक तृष्णा हेंच आपलें साध्य ठरवून तीं मोठया नांवारूपास चढतात, अखंड सत्ता हातीं वागवितात, त्या सत्तेचा पूर्ण उपयोग करितात, नाना प्रकारच्या ऐश्वर्यांचा उपभोग घेतात, आणि अखेरीस काळाच्या उदरीं गडप होतात. ही सर्व माया आहे, हें तत्त्व जाणल्यामुळेंच आम्हीं मात्र चिरंतन कालाचे वारसदार होऊन बसलों आहों. हें तत्त्व ज्यांच्या गळीं उतरलें तीं राष्ट्रें चिरस्थायी राहणारीं असून, भोगी राष्ट्रें मात्र केव्हां ना केव्हां नामशेष होणार यांत शंका नाहीं.

आतां या ठिकाणींही एक मोठा मतभेद आहे तो लक्ष्यांत ठेवण्यासारखा आहे. हेगेल आणि शॉपेनहॉर या जर्मन तत्त्ववेत्त्यांनीं जीं मतें प्रचलित

केलीं आहेत, त्याच प्रकारचीं मतें हिंदुस्थानांतही प्राचीन काळीं प्रचलित झालीं असल्याचें दिसून येतें; पण सुदैवेंकरून या मतांचें उच्चाटन मुळांतच झाल्यामुळें त्याचे दुष्परिणाम हिंदुस्थानांत दिसून आले नाहींत. हेगेल याचा मुख्य सिद्धांत असा आहे कीं, जें कांहीं केवल अथवा अप्रत्यक्षरूप आहे तें शून्यरूप असून प्रत्यक्षरूप त्याहून अधिक मोठें आणि अर्थात् अधिक महत्वाचें आहे. यामुळें प्रत्यक्ष दिसणारें जग अप्रत्यक्ष जगापेक्षां अधिक महत्वाचें आहे; आणि यामुळेंच मुक्तीपेक्षां संसार अधिक महत्वाचा आहे. या त्याच्या सिद्धांतांत जों जों खोल जावें तों तों आणखीही कांहीं चमत्कार दिसून येतात. या सिद्धांताप्रमाणें पाहतां जों जों संसारांत अधिक गुरफटून जावें तों तों तुमचें जीवित उच्चतर होत जातें, असा याचा अभिप्राय दिसतो. उलटपक्षीं आमच्या तत्त्ववेत्त्यांनीं सर्व प्रत्यक्ष जग मिथ्या ठरविलें आहे. आमच्या दर्शनांप्रमाणें पाहतां ज्याला सांप्रत उत्क्रांति असें ह्मणतात तीही मिथ्या ठरते. तुह्मीं वास्तविक या विश्वाचें कारण असतां संसाराच्या मागें लागल्यामुळें चिखलाच्या लहान लहान डबक्यांत आपलें प्रतिबिंब पाहण्याचा यत्न करीत आहां असें आमचा वेदान्त आह्मांस सांगतो. अशा प्रकारचा यत्न बहुतकाळ केल्यानंतर हा यत्न फुकट आहे, असा अनुभव आपणास येतो. हा अनुभव दृढ झाला ह्मणजे आल्या वाटेनें परत जाऊन पुन्हां मूळ पद गांठण्याचा यत्न आपण करूं लागतों. हा दुसऱ्या प्रकारचा यत्न ह्मणजे वैराग्य अथवा त्याग. वैराग्य आंगीं बाणलें ह्मणजे खऱ्या धर्ममार्गास आरंभ होतो. त्यागावांचून धर्म अथवा नीति यांचा आरंभही आपण करूं शकत नाहीं. **‘ न प्रजया धनेन त्यागेनैकेन अमृतत्व मानशुः ’** असा आमच्या तत्त्वज्ञांचा पहिला आणि अखेरचा सिद्धांत आहे. पुष्कळ राजेलोकही आमच्याकडे अखेर सर्वसंगपरित्यागी बनले आहेत. पुराणांतरींचें जनक राजाचें उदाहरण सर्वांस माहीत आहेच. या राजाहून अधिक मोठा त्यागी पुरुष सांपडणें दुष्कर आहे. सांप्रतच्या काळीं आह्मांसही जनक ह्मणवून घेण्याची प्रबळ इच्छा असते. एका दृष्टीनें आह्मीही जनकच आहोंत. पण कोणाचे ? फाटक्या तुटक्या वस्त्रांनीं आच्छादिलेल्या आणि रोगादिकांनीं पीडलेल्या खंडीभर पोरांचे मात्र जनक आह्मी आहों. केवळ याच अर्थानें जनक हे विशेषण आज आह्मांस लागू पडतें.

प्राचीन जनकाचे उच्चतम विचार आणि त्याची प्रतिभाशक्ति यांचा मागमूसही आह्मापाशीं नाहीं. आमचे अर्वाचीन जनक या प्रकारचे आहेत; आतां हा जनकपणा नाहींसा होईल तर बरें. आह्मी त्यागी झाल्यावांचून धर्ममार्ग आह्मांस कधींही सांपडणार नाहीं. त्यागी झाल्यावांचून जगांतील सर्व ग्रंथ आह्मीं पालथे घातले आणि सगळीं पुस्तकसंग्रहालयें कुवळून पिऊन आह्मी मोठे पंडित बनलों तरी जोंपर्यंत आह्मीं शुद्ध कर्मकांडी आहों तोंपर्यंत धर्मदृष्टीनें आमची खरी किंमत शून्याहून अधिक नाहीं व तोंपर्यंत धर्माच्या मार्गास आह्मीं आरंभही केलेला नाहीं. केवळ त्यागानेंच अमृतत्व प्राप्त होतें हा अखेरचा सिद्धांत आपण नित्य लक्षांत ठेविला पाहिजे. आपणास जें सामर्थ्य आंगीं आणावयाचें आहे, त्याच्या मानानें हें सारें विश्वही केवळ क:पदार्थ आहे. तें सामर्थ्य '**ब्रह्मांडम् गोष्पदायते**' ह्मणजे त्यापुढें सारें ब्रह्मांड गाईच्या खुरानें पडलेल्या खाड्याइतकें दिसतें. त्याग हीच आमच्या मातृभूमीची विजयपताका आहे. ही पताका तिनें साऱ्या जगभर फिरविली आहे. मृत्युमुखीं जाऊं पाहणाऱ्या मानववंशास आणि सर्व प्रकारच्या जुलमी आणि दुष्ट लोकांस तिनें या आपल्या पताकेच्या द्वारें आगामी भयाची सूचना दिली आहे. अहो हिंदुलोकांनों, ही तुमची विजयपताका आपल्या हातून तुह्मी जाऊं देऊं नका. ती दिवसेंदिवस अधिकाधिक ऊंच फडफडूं द्या. दौर्बल्यामुळें आज त्यागाचा मार्ग तुह्मांस अनुसरवत नसला, तर त्या आपल्या अखेरच्या ध्येयास निदान कमीपणा तरी आणूं नका. कारण, त्यागाचें ध्येय हें उच्चतम ध्येय आहे. लक्षावधि लोकांना या मार्गांत अपयश आलें तरी काय हरकत आहे? दहापांच अथवा प्रसंगीं एक दोनही वीर यश संपादून आले तरीही तें पुरेसें होईल. या एकदोन वीरांच्याच आशीर्वादानें लक्षावधि मृतांच्या आत्म्यांस आनंद होईल. हे लक्षावधि मृतजीवात्मे धन्य आहेत; कारण त्यांनीं उच्चतम ध्येयाचा मार्ग सुकर केला. मुंबई इलाख्यांतील वल्लभाचार्यांच्या पंथावांचून हें ध्येय सर्व वैदिक पंथांना मान्य आहे. ज्या ठिकाणीं हें ध्येय मान्य नाहीं तेथें अखेर स्थिति काय होते हें आपणा सर्वांस माहीत आहेच. हें ध्येय टाकून देण्यापेक्षां अगदीं जुनाट पंथही बरा. राखेनें आंग मढविणारे आणि आपले हात वाळविणारे पंथही मला मान्य होतील. हे पंथ विक्षिप्त आहेत ही गोष्ट खरी, तथापि त्यागाचें ध्येय जों-

पर्यंत ते आपणासमोर स्पष्टपणें ठेवीत आहेत तोंपर्यंत तेही आपणास मान्य असले पाहिजेत. हिंदुस्थानांत सांप्रत जडवाद शिरूं पाहात आहे. या जड-वादानें हिंदुस्थानाचें हृदय पोखरलें जात आहे. यामुळें सर्व हिंदुलोक महा दांभिक बनत आहेत. यामुळें ते इंद्रियजन्य सुखाच्या मागें लागून आपलें पौरुष नष्ट करीत आहेत. ही सर्व अनर्थपरंपरा टाळण्यास त्याग हाच एक उपाय आहे. याकरितां कांहीं पंथ आसुरी उपायांनीं त्यागाची आठवण लो-कांत जागृत ठेवीत असले तरी ते आम्हांस मान्य आहेत. आम्हांस सध्यां थोड्याशा विरक्ततेची जरूर आहे. पूर्वकाळीं हिंदुस्थानावर त्यागाचा अंमल बसला होता, आणि आतां त्याच त्यागाची आम्हांस जरूर आहे. ज्या भूमींत भगवान् बुद्ध, श्रीरामानुज आणि श्रीरामकृष्ण परमहंसादि त्यागी पुरुष जन्मास आले, ज्या भूमींत कर्मकांडाचा निषेध प्रथमपासूनच करण्यांत आला आणि ज्या भूमींत त्यागी पुरुष आजमितीसही जिवंत होत्साते वाव-रत आहेत ती भूमि आपलें त्यागाचें व्रत कधींतरी सोडील काय ? असें कधींही होणार नाहीं. पाश्चात्यांच्या इंद्रियजन्य भोगांच्या सुखकर कल्प-नांनीं ज्यांचे मेंदू फिरून गेले आहेत असे कांहीं थोडे लोक येथें असतील. या पाश्चात्य विषाचें प्राशन ज्यांनीं आकंठ केलें आहे, असेही शेंकडों अथवा हजारों लोक येथें असतील; तथापि असें असतांही केवळ धर्म हीच सत्य वस्तु आहे असें जाणणारेही हजारों लोक येथें आहेत. धर्ममार्गाकडे जाण्याची इच्छा करणारे हे लोक कशाचीही पर्वा न करितां आपल्या मार्गा-पासून बालाग्रही ढळणार नाहींत.

आतां आमच्या सर्व पंथांस सामान्य असें आणखीही एक ध्येय आहे. हा वि-षयही मोठा विस्तृत आहे. धर्म ही चर्चेची वस्तु नसून तिचा प्रत्यक्ष अनुभव घ्यावयाचा आहे, या सिद्धांताचा उदय फक्त हिंदुस्थानांतच झालेला आहे. '**नायमात्मा प्रवचनेन लभ्यो न मेधया न बहुना श्रुतेन।**' नुसत्या प्रवचनांनीं, नुसत्या बुद्धिगम्य मार्गांनीं अथवा नुसत्या श्रुतींच्या पुष्कळ अभ्यासानें आत्म-लाभ होत नाहीं. श्रुतींच्या अभ्यासानें अथवा धर्मग्रंथांवर नुसता विश्वास ठेवल्यानें आत्मलाभ होत नाहीं, हा सिद्धांत फक्त आमच्याच धर्मग्रंथांनीं सांगि-तला आहे. बहुभाषपणानें अथवा वादविवादानें आत्मलाभ होणें शक्य नाहीं. हा आत्मलाभ गुरूपासून शिष्यास होतो. अशा रीतीनें शिष्याला अंतर्दृ-

ष्टीची प्राप्ति झाली ह्मणजे विश्वाचें सर्व कोडें त्यास सुगम होऊन आत्मलाभ आपोआप सिद्ध होतो.

आतां आणखी एकाच गोष्टीबद्दल मला आपणास सांगावयाचें आहे. बंगाल्यांत एक चमत्कारिक चाल प्रचारांत आहे. ही चाल कुलगुरुत्वाची होय. एखादा मनुष्य एखाद्याचा गुरु असला तर त्याचा मुलगा त्या दुसऱ्याच्या मुलाचा गुरु ह्मणविला जातो. वास्तविक गुरु ह्मणजे तरी काय? गुरु ह्मणजे श्रुतींचें रहस्य जाणणारा असा अर्थ श्रुतींनींच सांगितला आहे. केवळ अनेक ग्रंथ पढलेला अथवा मोठा वैय्याकरण अथवा एखादा महापंडित गुरु होऊं शकत नाहीं. श्रुतींचें रहस्य जो जाणतो, तोच गुरु होऊं शकतो. ' **यथा खरश्चंदनभारवाही भारस्य वेत्ता न तु चंदनस्य।** ' एखाद्या गाढवावर चंदनाचें ओझें असलें तर त्याचें वजन तो जाणील; पण त्याचा गुण जाणणार नाहीं. अशीच पंडितांचीही स्थिति आहे. आपणास असल्या पंडित गुरूंची मुळींच जरूर नाहीं. ज्यांनीं स्वतः आत्मानुभव घेतला नाहीं ते आह्मांस काय देणार? पूर्वी कलकत्त्यास असतां मी गुरूच्या शोधार्थ जिकडे तिकडे भटकत असें. एके वेळीं एक मोठा प्रसिद्ध वक्ता मला भेटला. त्याचें सर्व व्याख्यान ऐकून घेऊन मी त्याला ह्मटलें, ' महाराज, आपण परमेश्वरास पाहिलें आहे काय? ' माझा प्रश्न ऐकून ते पंडित महाराज अगदीं गांगरून गेले. ' परमेश्वराला मी पाहिलें आहे ' असें ह्मणणारा एकच गुरु मला भेटला. तो गुरु भगवान् रामकृष्ण परमहंस हे होत. रामकृष्ण मला ह्मणाले, " मी परमेश्वरास पाहिलें आहे; एवढेंच नव्हे तर ज्या मार्गानें तुलाही त्याचें दर्शन होईल, असा मार्ग मी तुला दाखवीन. " धर्मग्रंथांतील शब्दांचें भूस काढणारे पंडित हे कधींही गुरु होऊं शकणार नाहीं. " **वाग्वैखरी शब्दझरी शास्त्रव्याख्यानकौशलम्। वैदुष्यम् विदुषाम् तद्वद्भुक्तये न तु मुक्तये॥** " पुष्कळ चर्पटपंजरी करून श्रुतिवचनांवर अनेक अर्थ बसविणें हें पंडितांस मात्र आनंद देणारें असून त्याचा मुक्तीला कांहींच उपयोग नाहीं. गुरु श्रोत्रीय, अव्रजिन आणि अकामहत असा असावा. श्रोत्रीय ह्मणजे श्रुतींचें रहस्य जाणणारा, अव्रजिन ह्मणजे निष्पाप, आणि अकामहत ह्मणजे कोणत्याही वासनेनें बद्ध न झालेला. ज्याला द्रव्यार्जनाची इच्छा नाहीं तोच

खरा गुरु होऊं शकेल. वसंताचा आगम झाला म्हणजे सर्व वृक्षांना तो अनपेक्षपणें ज्याप्रमाणें नवपल्लवदान करतो, त्याच प्रमाणें खरा संत शिष्याला ज्ञानदान करतो. वृक्षांना पल्लवदान करावें हा वसंताचा उपजत स्वभावच आहे. त्यांत कसल्याही बदल्याची अपेक्षा तो करीत नाहीं. त्याचप्रमाणें संतही निरपेक्ष बुद्धीनें ज्ञानदान करीत असतात. "**तीर्णाः स्वयं भीमभवार्णवं जनाः अहेतुनान्यामपि तारयन्तः।**" असा खऱ्या गुरूंचा स्वभाव असतो. हा भयंकर संसारसागर उल्लंघून ते पार गेलेले असतात, आणि इतर जनांस अहेतुकपणें मार्गदर्शक होतात. गुरु अशाच प्रकारचा असला पाहिजे. यावांचून दुसऱ्या कोणत्याही प्रकारचा पुरुष गुरु होऊं शकणार नाहीं हें आपण नित्य लक्ष्यांत ठेविलें पाहिजे."**अविद्यायामन्तरे वर्तमानाः स्वयं धीराः पंडितंमन्यमानाः। जंघन्यमानाः परियंति मूढा अन्धेनैव नीयमाना यथान्धाः॥**" जे स्वतः अविद्येच्या अंधारांत गुरफटले असतांही स्वतःस पंडित मानून इतरांस मार्गदर्शक होऊं पाहतात, ते वांकड्यातिकड्या रस्त्यानें जागच्या जागींच भटकत असतात, आणि ज्याप्रमाणें एका आंधळ्यानें दुसऱ्या आंधळ्यास मार्गदर्शक व्हावें, त्याप्रमाणेंच या पंडितंमन्यांची स्थिति होत असते, असें श्रुतिवचन आहे. या श्रुतिवचनाशीं आपली सांप्रतची स्थिति ताडून पहा. तुह्मी स्वतःस वेदांति ह्मणवितां, तुह्मी जुन्याचे अभिमानी ह्मणवितां, माझीही इच्छा तुमचा हा अभिमान वाढविण्याचीच आहे. या बाबतींत तुमचा अभिमान जों जों वाढत जाईल तों तों तुह्मी खरोखर अधिक शहाणे व्हाल; पण अलीकडच्या चालीरितींसंबंधीं तुमचा अभिमान वाढला तर मात्र तुह्मी दिवसेंदिवस अधिक मूर्ख व्हाल. याकरितां आपल्या प्राचीन काळच्या मतांकडे पुन्हां चला; कारण, या प्राचीन काळांतून उमटलेला प्रत्येक ध्वनि खऱ्या अंतःकरणानें बाहेर पडलेला आहे. त्यांत दांभिकतेची अथवा दुर्बलतेची छटाही नाहीं. यांतील प्रत्येक ध्वनि ह्मणजे अगदीं खरें नाणें आहे. या कालानंतर सर्व बाबतींत अवनतीच्या कालास सुरुवात झाली. यानंतर धर्मांच्या आणि भौतिक शास्त्रांच्या बाबींत सारें राष्ट्र खालावत जाऊं लागलें. या स्थितीच्या कारणांची मीमांसा आज आपणास कर्तव्य नाहीं; पण या कालांत जितके ग्रंथ निर्माण झाले, त्या साऱ्यांस या अवनतीचा दुर्गंध येत आहे. याकरतां आपण आतां पुन्हां आपल्या प्राचीन कालाकडे जाऊं या.

ह्मणजे त्या ठिकाणीं बल आणि जिवटपणा यांची प्राप्ति आपणास होईल. या प्राचीन झऱ्याचें पाणी आपण आकंठ पिऊं या. ह्मणजे आपण पुन्हां बलवान् होऊं. आपणास जिवटपणा पुन्हां प्राप्त करून घ्यावयाचा असेल तर या भरतभूमींत हाच एक मार्ग आपणास उपलब्ध आहे.

विश्वांत सर्वत्र दिसून येणारी भिन्नता ही नुसती माया आहे असा अद्वैत सिद्धांत आहे. हा सिद्धांत समजण्यास फार कठीण आहे. तो समजणारे लोक साऱ्या जगांत फार थोडे आढळून येतात. तुझें व्यक्तिविशिष्टत्व खोटें आहे असें एखाद्या मनुष्याला सांगितलें तर तो ताबडतोब अगदीं गांगरून जातो; जणूं काय आपलें विशिष्टत्व हरवलें असेंच त्याला वाटतें; पण वास्तविक विचार करतां या व्यक्तिविशिष्टत्वाला खरोखर केव्हांही विशिष्टत्व नसून प्रत्येक क्षणीं प्रत्येक मनुष्य बदलत आहे असा अद्वैतवाद्यांचा सिद्धांत आहे. एके काळीं तुह्मीं लहान मूल होतां त्या वेळीं तुह्मीं कांहीं विशेष दिशेनें विचार करीत होतां. आतां तुह्मीं मोठे झालां आहां आणि तुमच्या विचारांची दिशा बदलली आहे. अशाच रीतीनें तुह्मीं वृद्ध झालां ह्मणजे ही दिशा आणखीही बदलेल. अशा रीतीनें ही अदलाबदल प्रत्येक व्यक्तींत सुरू आहे, अशी वस्तुस्थिति असतां तुमचें व्यक्तिविशिष्टत्व कोठें राहिलें? तुमचा देह, तुमचें मन आणि तुमचे विचार या साऱ्यांत प्रत्येक क्षणीं बदल सुरू आहे. आणि या साऱ्यांच्या पलीकडे तुमचा आत्मा आहे. हा आत्मा ब्रह्मरूप आहे असें अद्वैतवाद्यांचें ह्मणणें आहे. एकाच वेळीं दोन अनंत वस्तु असणें शक्य नाहीं. अनंतत्व एकच आहे. आपण सर्व बुद्धिमान् प्राणी आहों आणि यामुळें बुद्धिगम्य मार्गानें जाण्याची इच्छा आपण करीत असतों; पण बुद्धि याचा अर्थ तरी काय? वस्तूंचें विवरण व वर्गीकरण करतां करतां अखेरीस एक वेळ अशी येते कीं, आपली बुद्धि त्यापलीकडे जाऊं शकत नाहीं. अनंतत्व अनंतत्वाशीं समरस झालें ह्मणजेच तें अखेरच्या मुक्कामास पोहोंचतें. आणि पलीकडे जाण्यास त्याला ठिकाण उरणार नाहीं. सांत वस्तूंचा विचार आपण कितीही केला, तरी अखेरीस अनंतत्वाला पोहोंचेपर्यंत आपणाला मध्यंतरीं कोठेंही विसांवा घेतां येत नाहीं असें आपणास आढळून येतें; आणि हें एकच अनंतत्व सर्वत्र वास्तव्य करीत आहे असें अद्वैतवाद्यांचें ह्मणणें आहे. याखेरीज बाकी जें कांहीं उरलें तें सर्व मायारूप असून त्याला

खरें अस्तित्व नाहीं. अस्तित्व ह्मणून जें प्रत्येक वस्तूच्या ठिकाणीं भासमान् होतें तें ब्रह्म आहे. आपणही ब्रह्मच आहों. आपले निरनिराळे आकार हे केवळ मायारूप आहेत. नाम आणि रूप हीं आपणांतून वजा केलीं तर आपण सारे एकरूपच उरूं. या ठिकाणीं 'मी, तूं' इत्यादी शब्दयोजनेबद्दल विशेष खबरदारी घेतली पाहिजे. "मी ब्रह्मरूप असेन तर मला अमुक अमुक गोष्ट कां करतां येत नाहीं ?" असा प्रश्न पुष्कळ लोक नेहमीं विचारीत असतात. तुमच्या ठिकाणीं मीपणा उद्भवला कीं त्याच क्षणीं तुह्मीं बद्ध होतां आणि त्याचक्षणीं तुमचें अनंतत्व अथवा ब्रह्मरूपही नष्ट होतें. ब्रह्मरूप हें गरजेच्या पलीकडचें रूप आहे. त्याला कोणत्याही बाह्य वस्तूची गरज लागत नाहीं. त्याला ज्ञान बाहेरून आणावें लागत नाहीं. त्याचा आनंद त्याजपाशींच असतो. त्याला कशाचीही उणीव भासत नाहीं. आणि तें पूर्णपणें निर्भय आणि पूर्णपणें स्वतंत्र असतें. अशा प्रकारच्या स्वरूपांतच आपण सारे एकरूप होतों.

द्वैती आणि अद्वैती यांच्या मतांत हाच मोठा भेद आहे. शंकराचार्यांसारखे महाभाष्यकर्तेसुद्धां कित्येक वेळां मूळ संहितेचा फार चमत्कारिक अर्थ करीत असतात. त्याचप्रमाणें रामानुजांसारखे भाष्यकारही कित्येक वेळां अस्पष्ट पद्धतीचा अंगिकार करतांना आढळून येतात. या साऱ्या पंथांत कोणता तरी एकच पंथ खरा असला पाहिजे, ही चुकीची कल्पना आमच्यापैकीं मोठमोठया पंडितांसही मिठी मारून बसली आहे. '**एकं सद्विप्रा बहुधा वदंति ।**' अशा प्रकारचें उत्कृष्ट श्रुतिवचन असतांही या खोट्या कल्पनेचा त्याग आमच्या पंडितांसही करवत नाहीं. '**एकं सद्विप्रा बहुधा वदंति ।**' हा मूळ सिद्धांत असून त्याचाच विस्तार अनेक रूपांनीं आमच्या देशांत झाला आहे. या मूळ सिद्धांताचा विसर आपणांपैकीं बहुतेक साऱ्यांस पडला आहे. केवळ अनुभवी पुरुष मात्र हा मूळ सिद्धांत विसरलेले नाहींत. मोठमोठ्या पंडितांसही त्याचा विसर पडला आहे. द्वैत, अद्वैत अथवा विशिष्टाद्वैत यांपैकीं कोणतें तरी एकच मत खरें असलें पाहिजे असें मानणारे पंडित शेंकडा अठ्याण्णव सांपडतील असें मला वाटतें. काशीच्या घांटावर थोडा वेळ बसून तेथील वादविवाद तुह्मीं ऐकले तर माझें हें म्हणणें खरें आहे असें तुम्हांस वाटेल. या निरनिराळ्या पंथांच्या अनुयायांत एडक्यासारख्या टकरा चालत असतात असें तुम्हांस दिसून येईल.

अशाप्रकारची परिस्थिति असतां श्रीरामकृष्ण परमहंसांचा जन्म झाला. त्यांचा सारा चरित्रक्रम जणूं काय '**एकं सद्विप्रा बहुधा वदंति।**' या सिद्धांताचेंच उद्‌घाटन करीत होता. द्वैत आणि अद्वैत या दोन्ही मतांची आपणास सारखीच आवश्यकता आहे, हें त्यांनीं आपल्या जिवंत उदाहरणानें सिद्ध केलें. लहान मुलाला खगोलाचें ज्ञान करून द्यावयाचें असतां प्रथम पृथ्वि हा मध्यबिंदु कल्पून तेथून सुरवात करणें इष्ट असतें. येथून पुढें जातां जातां सूर्य हा मध्यबिंदु कल्पून तो खगोलाचें ज्ञान करून घेऊं शकतो. खगोलविद्येच्या अधिकाधिक सूक्ष्म सिद्धांतांत त्याचा प्रवेश होऊं लागला ह्मणजे सूर्य मध्यबिंदु आहे हें समजण्याची आवश्यकता उत्पन्न होऊं लागते; आणि तशा स्थितींत त्या विद्येंतील हा धडा त्याला अधिक चांगला समजतो. अशाच रीतीनें द्वैत हें आपणाबरोबरच जन्मास आलें असल्यामुळें आरंभीं त्याचाच उमज आपणास चांगला पडतो. जोंपर्यंत आपण आपल्या इंद्रियांनीं बद्ध आहों तोंपर्यंत परमेश्वराच्या व्यक्त अथवा साकार स्वरूपाबद्दलच आपणास उमज पडणें शक्य आहे. आपण इंद्रियबद्ध आहों तोंपर्यंत जगाचें आहे असें अस्तित्वच कायम राहाणार. भगवान् रामानुज ह्मणतात, "जोंपर्यंत आपण शरीर आहों, आपण मन आहों आणि आपण जीव आहों असें तुह्मांस वाटत असतें, तोंपर्यंत परमेश्वर आणि प्रकृति असा भेद कायम राहीलच." यानंतर आपण देह आहों अथवा मन आहों या कल्पना हळूहळू नष्ट होऊं लागल्या आणि आपणाभोंवतीं असणाऱ्या निरनिराळ्या वस्तूंचें पाश तुटूं लागले ह्मणजे आपणास जो अनुभव येतो तो भगवान् श्रीकृष्णांनीं असा व्यक्त केला आहे—

**इहैव तैर्जितः सर्गो येषां साम्ये स्थितं मनः ।**
**निर्दोषं हि समं ब्रह्म तस्माद्ब्रह्मणि ते स्थिताः ॥**
**समं पश्यन् हि सर्वत्र समवस्थितमीश्वरम् ।**
**न हिनस्त्यात्मनात्मानं ततो याति परां गतिम् ॥**



# खासगी पत्रें.

---

## पत्र ३९ वें.

योकोहामा, ता. १० जुलै १८९३.

प्रिय—ए. बी. जी.—

वरचेवर पत्र पाठवून मजबद्दलची हकिगत न कळविल्याबद्दल क्षमा असावी. प्रवासास लागणाऱ्या अनेक प्रकारच्या वस्तु जवळ बाळगणें आणि त्यांची काळजी घेणें या गोष्टींचा अभ्यास मला नसल्यामुळें माझा किती तरी वेळ या कामींच जातो. माझी कर्तृत्वशक्ति बहुधा या कामींच सध्यां खर्च होत आहे. खरोखर या गोष्टी मला अत्यंत त्रासदायक वाटतात.

मुंबई सोडल्यानंतर आम्ही प्रथम कोलंबो येथें पोहोंचलों. तो सारा दिवस आम्ही त्याच बंदरांत होतों; आणि या संधीचा उपयोग करून मी हें शहर पाहून घेतलें. आम्ही गाडींतून शहराच्या रस्त्यावरून हिंडलों आणि त्या शहरांत जें कांहीं मी पाहिलें, त्यापैकीं एक प्रचंड बुद्धाची मूर्ति मात्र माझ्या ध्यानांत आहे. बुद्ध निर्वाणांत प्रवेश करीत आहे असा भाव या मूर्तींत दाखविला आहे.

कोलंबोहून आह्मीं पिनांग येथें गेलों. मलाया द्वीपकल्पाच्या एका समुद्रकांठच्या भूमिभागावर हें शहर वसलें आहे. मलाई लोक हे सर्व मुसलमानी धर्म पाळतात. प्राचीन काळीं समुद्रावर हे लोक चांचेगिरी करीत असत, आणि त्या वेळीं साऱ्या व्यापारी गलबतांस त्यांचा धाक वाटत असे; पण अर्वाचीन काळच्या तरत्या किल्ल्यांच्या तोफांनीं त्यांचा हा वाटमारीचा धंदा साफ बुडविल्यामुळें हे लोक आतां अधिक थंड्या धंद्यांकडे वळले आहेत. पिनांगहून सिंगापूरला जात असतां आह्मांला वाटेंत सुमात्रा बेटांतील उंच उंच पर्वत मधून मधून दिसत होते. प्राचीनकाळीं या पर्वतांतील ज्या भागांत चांचेलोक राहात असत, ते भाग बोटीच्या कप्तानानें मला दाखविले. सिंगापूर हें स्टेट्स् सेट्ल्मेंटचें राजधानीचें शहर आहे. या शहरीं एक वनस्पतिशास्त्राची बाग असून तींत अनेक प्रकारच्या झाडांच्या जातींचा संग्रह आहे. या ठिकाणीं पंख्यांच्या ताडाचीं झाडें व भाकरीचीं झाडें पुष्कळ

उगवतात. येथील लोक वर्णानें सांवळे आहेत; तथापि मद्राशांइतके ते काळे नाहींत. सिंगापूर येथें एक उत्तम वस्तुसंग्रहालयही आहे.

यानंतर आह्मीं हाँग्काँग् येथें गेलों. येथें पोहोंचल्याबरोबर चिनांत आपण प्रवेश केला आहे, अशी खूण ताबडतोब पटते. येथें चिनी लोकांचें वर्चस्व सर्वत्र आढळून येतें. सर्व प्रकारचा व्यापार चिनी लोकांच्या हातांत असून येथील मजूरवर्गही चिनीच आहे. खरोखर पाहातां हाँगकाँग हें चिनीच आहे असें ह्मणावयास हरकत नाहीं. बोटीनें नांगर टाकिल्याबरोबर तुह्मांस किनाऱ्यावर घेऊन जाण्यासाठीं शेंकडों पडावांचा तांडा बोटीभोंवतीं जमतो. या पडावांना दोन दोन सुकाणें असल्यामुळें ते मोठे विचित्र दिसतात. पडावाचा मालक सहकुटुंब त्या पडावांतच राहात असतो. सुकाणूं धरण्याचें काम बहुधा त्याच्या घरधंनिणीकडे असून एक सुकाणूं ती आपल्या हातानें व दुसरें पायानें फिरवीत असते. काम करीत असतां तिच्या पाठीवर बहुधा एखादें मूल बांधलेलें असावयाचें. आई एका बोटीवरून दुसऱ्या बोटीवर जात असतां आणि मोठमोठीं ओझीं इकडून तिकडे लोटीत असतां पाठीवरील मूल खुशाल खिदळत असतें, हें पाहून मोठी मजा वाटते. बंदरांत वल्हविण्याच्या होड्या आणि वाफेच्या बोटी यांचा जिकडे तिकडे सुकाळ दिसत होता. एवढ्या गडबडींत त्या मुलाचा चेंदामेंदा होण्याची कितीतरी धास्ती असते; पण ही सारी गडबड त्याच्या गांवींही असल्याचें दिसत नाहीं. भोंवतालच्या गडबडीकडे लक्ष्य देण्यापेक्षां हातांतील तांदुळांच्या भाकरीचा तुकडा चघळणेंच त्याला अधिक प्रिय वाटतें! चिनी मूल अगदीं लहानपणापासूनच आपल्या पोटाच्या उद्योगाला लागतें. या वयांत आमच्या हिंदू मुलांना धड चालतांसुद्धां येत नाहीं. प्रत्येकानें शक्य तितकें लवकर आपल्या पोटाला मिळविलें पाहिजे, ही जाणीव चिनी मुलांत फार लवकर उत्पन्न होते. आईबापांचें दारिद्र्य ही जाणीव त्याच्या ठिकाणीं उत्पन्न करतें. चिनी आणि हिंदूलोक संस्कृतीच्या मार्गांत इतके मागसले याचें एक कारण त्यांचें अत्यंत दारिद्र्य हेंच होय. हातातोंडाशीं गांठ ठेवतां ठेवतांच सामान्य हिंदूंच्या आणि चिन्यांच्या नाकीं नव येतात. मग इतर गोष्टींचा विचार त्यांच्या चित्तांत यावा तरी कसा?

हाँग्काँग् हें मोठें सुंदर शहर आहे. तें एका टेंकडीच्या उतारावर वसलें असून टेंकडीच्या माथ्यावरील हवा शहरांतील हवेपेक्षां अधिक थंड

आहे. थेट माथ्यापर्यंत जाणारी ट्रामगाडी येथें आहे. ही गाडी वाफेच्या शक्तीनें दोऱ्या ओढून चालविली जाते.

आह्मी तीन दिवस हाँग्काँग् येथें मुक्काम केला; आणि नंतर कँटन् गांव पहावयास गेलों. कँटन् गांव नदीच्या मुखापासून उगमाकडे ऐशीं मैलांवर आहे. नदीच्या पात्रांत इतक्या बोटी दिसत होत्या कीं, त्यांजमुळें बहुतेक सारें पात्र झांकून गेल्यासारखें दिसत होतें. यांपैकीं सर्व बोटी वहातुकीकडेच गुंतलेल्या असतात असें नाहीं. पुष्कळशा बोटींत कायमची वस्ति आहे. यांपैकीं कित्येक बोटी आकारानें मोठया आणि दिसण्यांतही फार सुबक दिसत होत्या. कित्येक बोटी दोन तीन मजली हवेल्यांएवढ्या मोठया असून त्यांच्या दोन्ही बाजूंनीं सज्जे बांधले होते आणि कित्येक ठिकाणीं जाण्यायेण्याचे मोठे रस्तेही दिसत होते. या ठिकाणीं एक तरतें शहरच वसलें आहे असें ह्मणावयास हरकत नाहीं.

चिनी सरकारनें परकीय लोकांसाठीं राखून ठेविलेल्या भागांत आह्मी उतरलों. आमच्या आजूबाजूस शहराचा प्रचंड विस्तार पसरला होता. माणसांच्या कलकलाटानें सारें शहर जणूंकाय दुमदुमून गेलें होतें. कँटन् इतकें गलिच्छ शहर दुसरें कोणतेंही माझ्या पाहण्यांत आलें नाहीं. कधींही स्नान करावयाचें नाहीं अशी शपथच चिनी मनुष्यांनीं घेतल्यासारखें दिसतें. प्रत्येक घराच्या तळमजल्यांत बहुधा दुकानें असून वरच्या मजल्यावर लोक राहतात. रस्ते इतके अरुंद आहेत कीं, त्यांवरून चालत असतां दोन्ही बाजूंच्या दुकानांतील जिनसा तुमच्या आंगास लागत असतात. दर दहा पावलांगणिक मांस विकण्याचीं दुकानें आहेत; आणि यांपैकीं कित्येकांत कुत्र्याचें आणि मांजरांचें मांसही विक्रीसाठीं ठेविलेलें असतें. अर्थातच त्याचा उपयोग फक्त अत्यंत दरिद्री लोक मात्र करतात.

चिनी स्त्रीचें तोंड कधींही उघडें नसतें. उत्तर हिंदुस्थानांतील हिंदूंसारखीच इकडेही गोषाची पद्धत आहे. फक्त मजूर स्त्रिया मात्र तोंडें उघडीं ठेवून फिरतात. येथील स्त्रियांचे पाय फार बारीक असतात; आणि एखाद्या मजूर स्त्रीचे पायसुद्धां तान्ह्या मुलाच्या पायाएवढे बारीक असतात. या स्त्रिया चालतात असें ह्मणण्यापेक्षां कशातरी खुरडत जातात असेंच ह्मणणें अधिक सयुक्तिक होईल.

येथें कित्येक चिनी देवळें मी पाहिलीं. कँटन् येथें सर्वांत प्रचंड असें जें मंदिर आहे तें पहिल्या बुद्धधर्मी बादशहाच्या आणि पहिल्या पांचशें बौद्ध शिष्यांच्या स्मरणार्थ बांधलेलें आहे. प्रमुख जागीं भगवान् बुद्धाची मूर्ति असून त्याच्या पायांशीं बादशहाची मूर्ति आहे; आणि बुद्धाच्या दोन्ही बाजूंकडे शिष्यांच्या मूर्ति आहेत. या सर्व मूर्ति कोरींव लांकडाच्या असून हें कोरींव काम फारच सुबक आहे.

कँटन् येथून हाँग्काँग् येथें परत येऊन नंतर आम्हीं जपानकडे निघालों. प्रथम आम्हीं नागासाकी नांवाच्या बंदरीं उतरलों. कांहीं तास आम्हीं शहरांत फिरण्यांत घालविले. कँटन् आणि नागासाकी या दोन शहरांत केवढें तरी अंतर आम्हांस दिसून आलें ! जपानी लोक साऱ्या जगांत अत्यंत स्वच्छ आहेत. स्वच्छता आणि योग्य मांडणी यांची साक्ष सारा गांव पटवीत होता. शहरांतील रस्ते रुंद आणि सरळ असे दिसत होते. दोन्ही बाजूंस एकसारखी फरसबंदी दिसत होती. पिंजऱ्यासारखीं छोटीं छोटीं घरें किती तरी मौजेचीं दिसत होतीं. जपानांतील प्रत्येक गांवच्या आजूबाजूस बहुधा हिरवेगार डोंगर आढळून यावयाचे. जपानी लोकांचा तो चमत्कारिक पोषाख, त्यांची ठेंगणी मूर्ति, त्यांची चालण्याबोलण्याची पद्धत आणि त्यांचे हावभाव हीं सारींच मोठीं विस्मयकारक वाटतात. जपानची सारी भूमीच आल्हाद आणि विस्मय उत्पन्न करणारी आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. प्रत्येक घराच्या मागीलदारीं बहुधा बाग असावयाची. या बागेची मांडणीसुद्धां विशिष्ट अशा जपानी पद्धतीनेंच केलेली असावयाची. बागेंत जागजागीं झुडपें, कृत्रिम झरे आणि त्यांवर छोटे दगडी पुल बहुधा आढळून येतात.

नागासाकीहून आह्मी कोबे येथें गेलों. या ठिकाणीं समुद्रप्रवास पुरा करून खुष्कीच्या मार्गानें मी योकोहामा येथें आलों.

देशाच्या अंतर्भागीं असलेलीं ओसाका, कियोतो आणि तोकियो अशीं तीन शहरें मी पाहिलीं. कियोतो हें जुनें राजधानीचें शहर होतें. तोकियो ही सांप्रतची राजधानी असून ओसाका येथें मोठमोठे कारखाने चालतात. तोकियो शहर हें विस्तारानें व लोकसंख्येनेंही कलकत्त्याच्या जवळ जवळ

दुप्पट मोठें आहे. परवान्यावांचून परकीय लोकांस जपानच्या अंतर्भागांत प्रवास करूं देत नाहींत.

अर्वाचीन काळच्या नव्या गरजा कोणत्या प्रकारच्या आहेत याची जाणीव जपानी लोकांस आतां पूर्णपणें झाली आहे. नव्या प्रकारच्या तोफखान्यानें सज्ज झालेलें सैन्य जपाननें बाळगलें आहे. या नव्या प्रकारच्या तोफा एका जपानी अंमलदारानेंच तयार केल्या आहेत असें मला समजलें. जपानांतील तोफखाना जगांतील दुसऱ्या कोणत्याही देशांतील तोफखान्यापेक्षां कमी प्रतीचा नाहीं. जपानदेश आतां आपलें आरमारही वाढवीत आहे. जपानी इंजिनियरांनीं तयार केलेला एक मैल लांबीचा एक बोगदा मी नुकताच पाहिला.

आगकाड्यांच्या पेट्या करण्याचे कारखाने खरोखरच मोठे नमुनेदार आहेत. स्वतःस लागणाऱ्या सर्व वस्तू स्वतःच तयार करण्याचा निश्चय जपानी लोकांनीं केला आहे. चीन आणि जपान यांजमध्यें जपानी आगबोटी जात येत असून आतां लौकरच मुंबई आणि योकोहामा यांच्या दरम्यान जपानी आगबोटी सुरू होणार आहेत.

येथें मी बरींच देवळें पाहिलीं. प्रत्येक देवळांत जुन्या बंगाली लिपींत कांहीं संस्कृत मंत्र लिहिल्याचें आढळून येतें. भिक्षुक वर्गांपैकीं फारच थोड्या लोकांस संस्कृत येतें. तथापि येथला भिक्षुक वर्ग एकंदरीनें बुद्धिमान् आहे असें ह्मणावयास हरकत नाहीं. नव्या संस्कृतीची गोडी येथील भिक्षुकवर्गासही लागलेली दिसते. जपानदेशाबद्दल मला काय वाटतें तें सारें एका लहानशा पत्रांत लिहिणें शक्य नाहीं. प्रत्येक वर्षी आपल्यापैकीं बऱ्याचशा तरुणांनीं जपानची सफर करावी इतकेंच मी सध्यां ह्मणतों. हिंदुस्थानदेश ही कल्याणभूमि आहे असा अद्यापिही जपानी लोकांचा समज आहे; आणि खरोखर तुह्मी कसे आहां? तुह्मी आपला सारा जन्म नुसत्या बडबडींत घालवितां. पोकळ बडबड करणाऱ्या लोकांनों, तुमची खरी किंमत काय आहे? येथें येऊन एक वेळ या जपानी लोकांकडे पाहा, ह्मणजे लज्जेनें तुह्मी आपलीं तोंडें खास लपवाल. पण मूर्खांनो, तुह्मी इकडे येणार तरी कसे? दाराच्या बाहेर पाऊल ठेवलें कीं आधीं तुमची जात बुडणार! आज शेंकडों वर्षें निर्भेळ मूर्खपणा तुह्मी आपल्या डोक्यांत सांठविला आहे. हें अन्न पवित्र

कीं,ती वस्तू अपवित्र; असल्या प्रकारच्या जाड्या विषयांचा काथ्याकूट करण्यांत आज शेंकडों वर्षें तुह्मी खर्च केलीं. शेंकडों वर्षें चाललेल्या सामाजिक जुलुमामुळें तुमचें माणुसपणही नष्ट झालें आहे; आणि आतां तरी तुह्मीं काय करीत आहां ? लठ्ठलठ्ठ पुस्तकें हातांत घेऊन मोठ्या डौलानें समुद्रकिनारीं फिरावें, युरोपीय लोकांच्या उष्ट्या कल्पनांची बडबड करावी, कोठें तरी तीस रुपयांची खर्डेघांशी मिळविण्यासाठीं धडपड करावी अथवा फारच झालें तर वकील व्हावें ह्मणजे तुमच्या आयुष्याची इतिकर्तव्यता झाली असें तुह्मांस वाटतें. हिंदुस्थानांतील तरुणांच्या अत्यंत मोठ्या महत्वाकांक्षेचीही मजल यापुढें जाऊं शकत नाहीं. प्रत्येक तरुण विद्यार्थी पाहिला तर त्याच्यामागें बुभुक्षित पोरांचें एक मोठें लेंढार लागलेलें दिसावयाचें. तुमचीं तीं लठ्ठ पुस्तकें, ते पदव्यांचे झगे आणि विश्वविद्यालयांतील सर्टिफिकिटें या सार्‍यांस एकदमच समाधि देण्याइतकें पाणी समुद्रांत राहिलें नाहीं काय ?

हिंदुलोकांनो, आतां उठा, आणि पुरुषांसारखे कांहींतरी वागा. उन्नतीच्या आड येणार्‍या भिक्षुकवर्गाची प्रथम हकालपट्टी करा; कारण, ह्या वर्ग सुधारण्याची आशा नको. त्यांचीं सुरकुतलेलीं अंतःकरणें पुन्हा विस्तार पावण्याची आशा आतां मुळींच राहिलेली नाहीं. शेंकडों वर्षांच्या धर्मवेडानें आणि सामाजिक जुलमानें हा भिक्षुकवर्ग आतां पुरा मठ्ठ बनून गेला आहे. याकरितां या वर्गाचें पुरें उच्चाटन करणें हेंच प्रथम जरूरीचें झालें आहे. हिंदु तरुणांनो, आतां आपल्या बिळांतून बाहेर येऊन या विस्तीर्ण जगाकडे पाहा. जगांतील राष्ट्रें संस्कृतीच्या मार्गांत एकसारखीं पुढें कशीं जात आहेत हें डोळे उघडून पाहा. मनुष्यजातीवर तुमचें प्रेम आहे काय ? तुह्मीं स्वदेशभक्त तरी आहां काय ? तसें असेल तर आतां बाहेर येऊन अधिकाधिक उच्च होण्याच्या मार्गास तुह्मीं लागलें पाहिजे; आतां एकसारखें पुढें पाऊल टाकलें पाहिजे. मागें वळून पाहण्या इतकीसुद्धां फुरसत राहिली नाहीं. तुमच्या आप्तेष्टानीं आणि जिवलगांनीं टाहो फोडला तरीसुद्धां आतां मागें वळूं नका. यापुढें तुमची नजर एकसारखी भविष्यत्कालाकडेच असली पाहिजे !

हिंदुस्थानाला सध्यां एक हजार स्वार्थत्यागी तरुणांची जरूर आहे; पण हीं सारीं खरीं माणसेंच पाहिजेत, पशु नकोत, हें अवश्य लक्ष्यांत बाळगिलें

पाहिजे. परमेश्वराच्या इच्छेनें हिंदुस्थानांत इंग्रजांचें राज्य झालें आणि त्यामुळें दगडाप्रमाणें थिजून गेलेल्या तुमच्या समाजरचनेस नवें चालन मिळालें. इंग्रजांचें राज्य होण्यास प्रथम मद्रासनें मदत केली. आतां नवा मनू निर्माण करण्यासाठीं जीवाकडेही न पाहणारे असे कितीसे स्वार्थत्यागी मनुष्य मद्रासेंत मिळतील ? गरिबांसाठीं ज्यांच्या अंत:करणास पीळ पडत आहे, त्यांच्या तोंडीं भाकरीचा तुकडा पडावा ह्मणून जे खटपट करतील, सामान्य जनतेस जे ज्ञानदान करतील आणि पूर्वकालीं सामाजिक जुलमामुळें पशूंच्या पदवीस पोहोंचलेल्या आपल्या बांधवांस पुन्हा मनुष्यांत आणण्यासाठीं जे जिवाकडेही पाहणार नाहींत असे कितीसे तरुण आतां मद्रासेंत मिळतील बरें ?

आपला,

**विवेकानंद.**

ता. क.—शांतपणानें आणि कसलाही गाजावाजा न करतां यापुढें तुम्हीं उद्योगास लागलें पाहिजे. वर्तमानपत्रांतील कोरडी कळकळ आतां बस्स झाली. कोणतेंही कार्य करीत असतां कीर्तीची अपेक्षा चित्तांत ठेवावयाची नाहीं हें नीट ध्यानांत धरा.

---

## पत्र ४० वें.

ब्रीझी मेडोज,

मेट्काफ् ( अमेरिका )

ता. २० आगस्ट १८९३.

प्रिय—

तुमचें पत्र काल मिळालें. जपानहून मी पाठविलेलें पत्र आतांपर्यंत तुम्हांस मिळालें असेलच. जपानाहून मी व्ह्यांकुव्हर येथें आलों. हा मार्ग उत्तर पासिफिक महासागरांतून आहे. थंडी अतिशय पडली होती आणि माझ्याजवळ उबदार कपडे नसल्यामुळें माझे बरेच हाल झाले. तथापि कसाबसा मी व्ह्यांकुव्हर येथें पोहोंचलों; आणि तेथून कानडाच्या मार्गानें

शिकागो शहरीं आलों. या शहरीं माझा मुक्काम बारा दिवस होता. बहुधा प्रत्येक दिवशीं प्रदर्शन पाहाण्यास मी जात असें. हें प्रदर्शन फारच प्रचंड आहे. या प्रदर्शनांतून एकवार इकडून तिकडे जावयाचें म्हटलें ह्मणजे निदान दहा दिवस पाहिजेत. बी–नें ज्या बाईची व माझी ओळख करून दिली होती, त्या बाई व त्यांचे यजमान हीं या शहरांतील बड्या लोकांच्या वर्गांत मोडतात. या दोघांनींही मोठ्या प्रेमानें माझें आदरातिथ्य केलें. शिकागो येथून मी बोस्टन्‌ला गेलों. या प्रवासांत एल्–मजबरोबर होता. त्यानेंही मजवर फार प्रेम दाखविलें.

येथील चालू खर्चाचें मान खरोखरच फार भयंकर आहे. सरासरीनें माझा रोजचा खर्च पंधरा रुपये आहे. येथें एका चिरुटाला आठ आणे पडतात. अमेरिकन् लोक फार श्रीमंत असल्यामुळें ते पाण्यासारखा पैसा खर्च करतात. जिनसांची किंमत उतरूं नये ह्मणून त्यांनीं कायदे केले आहेत. येथल्या इतकी महागाई जगांत दुसऱ्या कोठेंही नाहीं. येथील सामान्य मजूरही रोज नऊ दहा रुपये मिळवितो आणि तितके सारे खर्च-ही करतो. अमेरिकेंत आल्यावर आपण 'यंव करूं आणि त्यंव करूं' अशा ज्या शिळोप्याच्या गप्पा आपण ठोकीत होतों, त्या साऱ्या जागच्या जागींच विरल्या आणि आतां अशक्य गोष्टी मला कराव्या लागणार असें दिसूं लागलें आहे. येथून पळून स्वदेशास परत यावें असें शंभर वेळां माझ्या मनांत आलें असेल; पण मी मनाचा धडाच केला आहे कीं, परमेश्वराचें कार्य येथें मला करावयाचें आहे. हें कसें पार पडणार हें मला तरी समजत नाहीं. आतां त्याचें तोच पाहून घेईल. देह जावो कीं राहो अखेरपर्यंत आपली जागा सोडावयाची नाहीं एवढेंच माझें कर्तव्य आहे.

बोस्टन् जवळील एका लहानशा खेड्यांत राहाणाऱ्या एका वृद्ध आजीबाई-कडे मी आपली सोय सध्यां लावली आहे. आगगाडीच्या डब्यांत तिची व माझी अकस्मात् गांठ पडली. तिनें मला आपल्या घरीं राहावयास बोलावलें आणि मींही तिच्या आमंत्रणाचा स्वीकार केला. तिच्या येथें राहण्यांत माझाही फायदाच आहे. कांहीं दिवस तरी रोजचा पंधरा रुपयांचा खर्च वांचला. हा माझा फायदा झाला; तसाच तिचाही त्यांत एक फायदा आहे. तो हाच कीं, हिंदुस्थानांतील एक अजब वस्तु ह्मणून माझें प्रदर्शन तिला आपल्या

इष्टमित्रांस करतां येतें. असो. हें सारें भोगलेंच पाहिजे. उपासमार आणि थंडी यांचा त्रास होतोच आणि माझ्या विचित्र पोषाखाला बुजून रस्त्यांतलीं पोरें हुर्यो करीत पाठीमागें लागतात हें वेगळेंच. असल्या प्रकारच्या विचित्र परिस्थितीशीं मला सध्यां झगडावें लागत आहे; पण माझ्या मित्रा, मोठे श्रम केल्यावांचून आणि आपत्ती भोगल्यावांचून कोणतें महत्कार्य तडीस गेलें आहे ?

अमेरिका हा ख्रिस्त्यांचा देश आहे, हें आधीं पक्कें लक्ष्यांत ठेवलें पाहिजे. दुसऱ्या कोणत्याही धर्मांचा प्रवेश आजतागायत येथें झालेला नाहीं. नानाप्रकारच्या पंथवाल्यांच्या शत्रुत्वाला मी मुळींच भीक घालीत नाहीं. येथें मी येशुख्रिस्ताच्या लेंकरांत येऊन राहिलों आहें. आणि तो येशू ख्रिस्तच येथें मला हात देईल. हिंदुधर्माची उदार विचारसरणी येथील लोकांस बरीच पसंत पडते. तसेंच येशू ख्रिस्तावरील माझें प्रेमही त्यांच्या चित्तास पटतें. ग्यालिलीच्या अवतारी पुरुषाविरुद्ध मला कांहींच उपदेश करावयाचा नाहीं असें मी स्पष्ट बोलून दाखवितों. फक्त येशू ख्रिस्ताप्रमाणेंच हिंदुस्थानांतील अवतारी पुरुषांसंबंधीं उदार बुद्धि बाळगा, असा उपदेश मी करतों आणि तो त्यांस चांगला पटतो.

थंडीचे दिवस जवळ येऊं लागले आहेत; आणि त्यासाठीं आतां उबदार कपड्यांची तरतूद मला प्रथम करावी लागेल. खुद्द येथील रहिवाशांपेक्षां माझ्या सारख्या परकीयास तर उबदार कपडे अधिकच पाहिजेत. माझ्या मित्रा, धीर सोडूं नको. हिंदुस्थानांत महत्कार्य करण्यासाठीं परमेश्वरानें आपणास जन्मास घातलें आहे. हें कार्य आपण खचित पार पाडणार याबद्दल शंका नाहीं. मनांत दृढ विश्वास धर. आपण दरिद्री असलों आणि लोकांनीं आपली कितीही अवहेलना केली, तरी आपल्या अंतःकरणांत खरी कळकळ आहे. मग जगाची पर्वा आपणास कशाला हवी ? आपणासारख्या अकिंचन पण खऱ्या कळकळीच्या लोकांच्या हातूनच एखादें महत्कार्य होईल.

शिकागो येथें परवां एक मोठी मजा झाली. आपल्याकडील एक राजेसाहेब सध्यां येथें आहेत. शिकागो येथील कांहीं मंडळीनें या राजेसाहेबांचे मोठे देव्हारे माजविले होते. प्रदर्शनांत त्यांची माझी गांठ पडली, पण ते पडले बडे राजेसाहेब. माझ्यासारख्या भिकारड्या फकिराशीं ते कसे बोलतील ?

प्रदर्शनांत एक विक्षिप्त दक्षिणी ब्राह्मण मला आढळला. तो नखानें कोरलेलीं चित्रें विकीत असे. हा ब्राह्मण धोतर नेसून साऱ्या प्रदर्शनभर फिरत असे. या गृहस्थानें वर्तमानपत्रांच्या बातमीदारांजवळ या राजेसाहेबांची खूबशी नालस्ती केली. हा राजा एक हलक्या जातीचा मनुष्य असून असल्या प्रकारचे हिंदुस्थानांतील राजे गुलामांहून अधिक योग्यतेचे नसतात व नाना प्रकारच्या ढंगांत ते आपलें आयुष्य फुकट घालवीत असतात असेंही तो ह्मणाला. या सत्यभक्त रिपोर्टरांनीं ही सर्व बातमी जशीच्या तशीच प्रसिद्ध केली. त्यांत त्यांनीं माझी भरपूर स्तुति केली होती; आणि राजेसाहेबांबद्दल ही सारी माहिती मींच दिली असेंही त्यांनीं लिहिलें होतें. त्या बिचाऱ्या राजाबद्दल माझ्या स्वप्नांतही आल्या नसतील अशा गोष्टी त्यांनीं माझ्या तोंडीं घातल्या होत्या. याचा परिणाम असा झाला कीं, शिकागोंतील सभ्य कुटुंबें राजेसाहेबांपासून एकदम दूर दूर राहूं लागलीं. माझ्याच एका देशबांधवाला माझ्या हातून मारविण्याची ही खाशी युक्ति या वर्तमानपत्रकारांनीं काढली ! तथापि केवळ पैसा आणि मोठ्या पदव्या यांजपेक्षां बुद्धीला येथें अधिक मोठें महत्व दिलें जातें, हें या हकिगतीनें सिद्ध झालें एवढें मात्र खरें.

कालरोजीं स्त्रियांच्या तुरुंगावरील मुख्य बाई मजकडे आल्या होत्या. या जाग्याला अमेरिकन लोक तुरुंग असें नांव न देतां 'वर्तणुक सुधारण्याची जागा' असें नांव देतात. हा तुरुंग ह्मणजे खरोखरच एक प्रेक्षणीय वस्तु आहे. येथें आलेल्या स्त्रियांस किती दयाळूपणानें वागविलें जातें व त्यांस सुधारून समाजाचे चांगले घटक कसें बनविलें जातें हें खरोखर वर्णन करून सांगतां येण्याजोगें नाहीं. या गोष्टी प्रत्यक्षच पाहिल्या पाहिजेत. हिंदुस्थानांतील हलक्या जातींचा विचार ज्या वेळीं माझ्या मनांत येतो, त्या वेळीं माझ्या अंतःकरणाला किती पीळ पडतो ह्मणून सांगूं ? आपल्या विपन्नावस्थेंतून वर येण्याला त्या बिचाऱ्यांस मार्गही सांपडत नाहीं. गरीब आणि पापांत पुरलेल्या अशा हिंदी लोकांस कोणीही स्नेही मिळावयाचा नाहीं; आणि त्यांनीं कितीही यत्न केला तरी त्यांस वर येतां येत नाहीं. दिवसेंदिवस ते अधिकाधिक अधोगतीस जात असतात. निर्घृण समाजानें दिलेले तडाखे त्या बिचाऱ्यांस असह्य होत असतात; आणि चमत्कार हा कीं, हे तडाखे कोठून येतात हेंही त्या बिचाऱ्यांस समजत नसतें. आपण मनुष्येंच आहों ही गोष्टसुद्धां

ते विसरून गेलेले असतात. या स्थितीचा परिणाम ह्मटला ह्मणजे गुलामगिरी हाच होय. कांहीं वर्षांपूर्वी थोड्याशा विचारी लोकांच्या लक्ष्यांत ही स्थिति आली; पण या स्थितीबद्दलचें सारें खापर दुर्दैवानें त्यांनीं हिंदुधर्माच्या माथीं फोडलें; आणि साऱ्या जगांत अत्यंत श्रेष्ठ असलेल्या हिंदुधर्माचा निःपात केल्यावांचून ही स्थिति सुधारावयाची नाहीं असें त्यांस वाटलें. मित्रा, यांत धर्माचा यत्किंचितही अपराध नाहीं हें माझें ह्मणणें तूं नीट ध्यानांत ठेव. 'सर्वत्र समता' हें तत्त्व हिंदुधर्मानेंच आह्मांस शिकविलें आहे; पण या तत्त्वाचा प्रत्यक्ष व्यवहार कसा करावा हें न समजल्यामुळें, सहानुकंपेच्या अभावामुळें आणि अंतःकरणशून्यतेमुळें सांप्रतची विपन्नावस्था आपणांस प्राप्त झाली आहे. आपलें अंतःकरण कसें जागृत करावें आणि दरिद्री, दुःखी व पापी बांधवांबद्दल आपल्या अंतःकरणांत सहानुकंपा कशी बाळगावी, हें भगवंतानें बुद्धावतारीं तुह्मांस शिकविलें; पण त्या वेळींही तुह्मी त्याच्या उपदेशाकडे दुर्लक्ष्य केलें. असुरांस खोट्या उपपत्तींची भुरळ घालून फसविण्याकरितां परमेश्वरानें बुद्धाचा अवतार घेतला, असल्या प्रकारच्या गोष्टी भिक्षुकवर्गानें पसरविण्यास सुरवात केली. खरोखरच एका अर्थी आपणच असुर आहोंत. भगवान् बुद्धावर ज्यांनीं विश्वास ठेवला ते असुर नसून इतर मात्र खरोखरच असुर होत. यहुदी लोकांनीं भगवान् येशूख्रिस्ताचें गुरुपण नाकबूल केलें आणि त्या दिवसापासून ते लोक घरदारविरहित होऊन भिकाऱ्याप्रमाणें साऱ्या जगभर भटकत आहेत. यहुदी लोकांना कोणीही पायांखालीं तुडवावें अशी सध्यां त्यांची स्थिति झाली आहे. त्याचप्रमाणें तुह्मीही सांप्रत केवळ गुलामांच्या स्थितीस पोहोंचलां आहां. कोणीही येऊन तुमच्यावर प्रभुत्व गाजवावें अशी तुमची स्थिति सांप्रत झाली आहे. अरे जुलमी लोकांनो, जुलुम आणि गुलामगिरी हीं सख्खीं भावंडें आहेत, ही गोष्ट तुमच्या लक्ष्यांत येत नाहीं.

पांडिचेरी येथें असतांना समुद्रप्रवासाविषयीं एका पंडिताबरोबर झालेला वादविवाद तुह्मांस आठवत असेलच. त्या पंडिताचे पशुतुल्य हावभाव आणि त्याचें '**कदापि ना**' मी कधींही विसरणार नाहीं. हिंदुस्थान हा साऱ्या जगाचा एक भाग आहे, ही गोष्ट हे अरण्यपंडित विसरत असतात. हिंदुस्थानच्या पुण्यभूमीवर राहणाऱ्या तीस कोटी किड्यांस असला

जुलुमाचा धिंगाणा घालतांना पाहून सारें जग तुह्मांस तुच्छतेनें हांसत आहे ही गोष्ट तुमच्या लक्ष्यांत येत नाहीं. आतां ही स्थिति बदलण्याचा यत्न सुरू केला पाहिजे. हें कार्य करावयाचें ह्मणजे धर्माचा नाश करून तें होणार नाहीं; पण हिंदुधर्मांतील उच्च तत्त्वें प्रत्यक्ष आचरणांत आणूनच ही गोष्ट सिद्ध होईल. त्याचप्रमाणें हिंदुधर्माच्या वाढींतून निघालेल्या बौद्धधर्मानें सांगितलेल्या सहानुकंपेची जोडही या प्रयत्नांस दिली पाहिजे.

पावित्र्याच्या उत्साहानें भरून गेलेलीं, परमेश्वरावरील दृढविश्वासानें ज्यांचें अंतःकरण व्यापिलें आहे आणि दीन दुबळ्या लोकांच्या अत्युत्कट सहानुकंपेमुळें ज्यांच्या ठिकाणीं सिंहासारखें धैर्य आलें आहे, अशा लक्षावधि स्त्रीपुरुषांनीं या कार्यास स्वतःस वाहून घेतलें पाहिजे. दीन लोकांच्या मुक्तीचा, मदतीचा आणि समानतेचा उपदेश करीत त्यांनीं साऱ्या देशभर फिरलें पाहिजे.

नरदेहाच्या मोठ्या योग्यतेबद्दल हिंदुधर्मानें जे उद्गार काढले आहेत त दुसऱ्या कोणत्याही धर्मांत आढळून यावयाचे नाहींत. त्याचप्रमाणें गरीब आणि खालच्या प्रतीच्या लोकांवर हिंदुधर्मानें जसा करडा अंमल गाजविला तसा तो दुसऱ्या कोणत्याही धर्मानें गाजविला नाहीं ही गोष्टही खरी आहे. यांत वास्तविक धर्माचा अपराध कांहीं नाहीं. पण हिंदुधर्माच्या नांवाखालीं जे अनेक भोंदू वावरत असतात, त्यांनींच पारमार्थिक आणि व्यावहारिक सांप्रदायाच्या नांवाखालीं हे अनेक गांजणुकीचे प्रकार निर्माण केले.

असें आहे तरी निराश होण्याचें कारण नाहीं. ‘ **कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाच न** ’ हें गीतावचन नित्य लक्ष्यांत बाळगा. माझ्या मुला, आतां तुला कामासाठीं कंबर बांधली पाहिजे. याच कार्यासाठीं परमेश्वरानें मला जन्मास घातलें आहे. साऱ्या जन्मभर मीं अनेक आपत्ती भोगल्या आणि अनेक प्रकारचे कष्ट सोसले. भुकेनें व्याकुळ होऊन माझ्या आप्तेष्टांनीं माझ्या देखत प्राण सोडले. अनेकांनीं अनेक प्रकारें माझी थट्टा केली, मजबद्दल गैरविश्वास केला; ज्यांचें बरें करावें म्हणून मी झटलों त्यांनींच माझी थट्टा आरंभिली आणि माझा तिरस्कार केला. माझ्या मित्रा, आपत्ति ही एक मोठी शाळा आहे. सहानुकंपा, धैर्य आणि मनाचा बळकटपणा हे गुण शिकण्यास आपत्तीसारखा दुसरा गुरु नाहीं. ह्याच गुरूच्या तालमींत जगांतील

महात्मे आणि भविष्यवादी निर्माण झाले. प्रत्यक्ष आपल्या डोळ्यांसमोर साऱ्या विश्वाचा धुरळा झाला, तरीसुद्धां ज्यांचीं अंतःकरणें यत्किंचितही डगमगत नाहींत असे पुरुष याच शाळेंत तयार झालेले असतात. माझा ज्यांनीं उपहास केला त्यांची मला खरोखर फार दया येते. तो त्यांचा अपराध नाहीं. जगानें त्यांना मोठें ह्मटलें ह्मणून ते वास्तविक मोठे नव्हत; त्यांची खरी योग्यता रांगत्याहिंडत्या मुलांहून अधिक नाहीं. कांहीं थोड्याशा हातांपलीकडचें क्षितिज त्यांच्या नजरेस दिसत नाहीं. खावें, प्यावें आणि देशाची खानेसुमारी वाढवावी, यापलीकडे कोणतेंही कार्य त्यांच्या हातून होत नसतें. या आनंदी प्राण्यांची नजर असल्या महनीय कर्तव्यांपलीकडे पोहोंचूं शकतच नाहीं. कोणत्याही गोष्टीनें त्यांची झोंप-मोड होत नाहीं. कंगाल आणि निकृष्ट दशेस पोहोंचलेल्या जनतेच्या दुःखाच्या आरोळ्यांनीं त्यांचें हृदय यत्किंचितही हालत नाहीं. शेंकडों वर्षांच्या जुलुमानें हीनदशेस पोहोंचलेल्या जनतेच्या टाहोनें हिंदुस्थानचें सारें वातावरण दुमदुमून गेलें आहे. प्रत्यक्ष परमेश्वराचीं रूपें आज पशूच्या योग्यतेस कशीं पोहोंचलीं आहेत आणि त्यांची कायिक, मानसिक आणि नैतिक अवस्था काय झाली आहे याचा विचार या आनंदी प्राण्यांच्या स्वप्नींही येत नाहीं. तथापि ही स्थिति ज्यांच्या लक्ष्यांत आली आहे, असेही कांहीं महात्मे आहेत. ही स्थिति पाहून त्यांच्या अंतःकरणास पीळ पडत आहे. ही स्थिति पालटण्यास त्यांनीं उपाय शोधून काढला आहे आणि जीव गमावण्याची वेळ आली तरी या उपायाचा अवलंब करावयाचा असा निश्चय त्यांनीं केला आहे. येशूनें सांगितलेलें ‘ स्वर्गाचें राज्य ’ खरोखर अशाच लोकांकरितां राखून ठेवलें आहे. ’ अशा प्रकारच्या उच्चतम कार्यानें ज्यांचीं अंतःकरणें व्याप्त झालीं आहेत, अशा लोकांनीं वेळीं अवेळीं आपणावर तोंडसुख घेणाऱ्या क्षुद्र किड्यांकडे लक्ष्य न दिलें तर त्यांत नवल तें काय? उत्तुंग शिखरावर आरूढ झालेल्या अशा महात्म्यांस खालीं वहाणाऱ्या गटाराकडे लक्ष्य देण्यास वेळच नाहीं.

श्रीमान् ह्मणविणाऱ्या लोकांवर मुळींच विश्वास ठेवूं नको. असे लोक वास्तविक जिवंत नसून मेलेलेच आहेत. तुझ्यासारख्या गरीब आणि खालच्या दर्जाच्या पण विश्वासु मनुष्याच्या हातून जें कार्य होईल तें श्रीमंत

मृत्पिंडांकडून कधींही होणार नाहीं. परमेश्वराच्या ठिकाणीं पूर्ण विश्वास असूं दे. आपल्या कार्यांत आंतबाहेर असा कोणताही प्रकार असावयाचा नाहीं, अशा प्रकारची वागणूक निरुपयोगी आहे. गरिबांबद्दल खरी सहानुकंपा तुझ्या हृदयांत असली तर तुझ्या कार्यांत परमेश्वर तुला खचित मदत करील. याच कल्पना डोक्यांत आणि हेंच ओझें अंतःकरणांत वागवीत आज बारा वर्षें मी फिरत आहें. श्रीमंत ह्मणविणाऱ्या मोठया लोकांच्या दारोदार या कार्यासाठीं तोंड वेंगाडीत मी फिरलों. याच कार्यांत कांहीं मदत मिळाली तर पहावी ह्मणून या परक्या भूमींत मी आलों. अखेरीस तरी परमेश्वर मला सहाय्य करील, ही माझी पक्की खातरी आहे. माझ्या तरुण मित्रांनों, थंडीनें आणि क्षुधेनें या देहाचा येथें अंत झाला, तरी तुह्मांसाठीं माझा एक वारसा मी मागें ठेवीन. गरीब, अज्ञान आणि गांजलेल्या लोकांसाठीं सहानुकंपेनें सदोदित धडपड करीत रहावयाचें हाच तो वारसा. माझ्या तरुण मित्रांनो, याच क्षणीं उठून त्या पार्थसारथ्याच्या मंदिरास जा, आणि ज्यानें गोकुळांतील गरीब गोपाळांचें रक्षण केलें, ज्यानें गूहकास निर्भरालिंगन दिलें, बुद्धावतारीं ज्यानें वेश्येचें तारण केलें, त्या पार्थसारथ्यापुढें आत्मत्यागाची शपथ वाहा. याच कार्यासाठीं सारा जन्म आपण वाहिला आहे, असें त्याला सांगा. गरीब, दुबळ्या आणि गांजलेल्या लोकांसाठीं जो युगानुयुगें अवतार घेतो, त्याच्यापुढें हीच शपथ घ्या. प्रत्येक दिवशीं अधिकाधिक अधोगतीस जाणाऱ्या तीस कोटी लोकांच्या उद्धारासाठीं आपण आपलें सारें आयुष्य खर्च करूं अशी शपथ घ्या.

हें कार्य एका दिवसांत होण्यासारखें नाहीं आणि हा मार्ग विषारी कांट्याकुट्यांनीं खचून भरला आहे हेंही मला माहीत आहे; पण तो पार्थसारथी आपलेंही सारथ्य करील, हें आपण लक्ष्यांत ठेवलें पाहिजे. याकरितां त्याजवर पूर्ण भरंवसा ठेवून युगानुयुगें सांचलेल्या या दुःखाच्या प्रर्वतप्राय राशीस त्याच्या नांवानें आग लावून द्या ह्मणजे ती जळून खाक होईल. प्रिय बंधु हो, आपलें कार्य केवढें मोठें आहे हें एक वेळ डोळे उघडून पहा. आपण दीन आहों ही गोष्ट खरी; पण आपण तेजाचे पुत्र, आपण परमेश्वराचीं मुलें आहों. त्याच्याच आशीर्वादानें आपणास खास यशःप्राप्ति होईल. या कार्यांत शेंकडों लोक पडले तरी दुसरे शंभर त्यांची

जागा भरून काढतील. हें कार्य तडीस जाण्याच्या अगोदर मृत्यु कदाचित् मला गांठील; पण मी गेलों तरी माझी जागा दुसरा कोणी तरी खास भरून काढील; आपल्या देशास कोणता रोग जडला आहे याची जाणीव तुह्मांस झाली असून, त्याच्या प्रतिकाराचा उपायही तुह्मांस सांपडला आहे. आतां दृढ विश्वास धरून कार्यांस लागावयाचें एवढेंच काय तें शिल्लक राहिलें आहे. पुन्हा एकवार सांगतों कीं, नामधारी मोठया आणि श्रीमंत लोकांकडे मदत मागूं नका. विद्वत्ताप्रचुर लेख लिहिणारे आणि वर्तमानपत्रांतून कोरडे अश्रू ढाळणारे, अंतःकरणशून्य लोकही तुमच्या उपयोगीं पडावयाचे नाहींत. असल्या लोकांच्या वल्गनांकडे मुळींच लक्ष्य देऊं नका. जळजळीत विश्वास आणि कडकडीत सहानुकंपा हीच तुमच्या उपयोगीं पडतील. या कामीं जीविताची किंमत बाळगूं नका; आणि मृत्यूही तुच्छ समजा. परमेश्वर हाच आपला नेता आहे, तोच आपला सेनापति आहे, आपण त्याचे शिपायी आहों. आपल्यांतून किती मरत आहेत आणि किती जखमी होत आहेत हेंसुद्धां पाहूं नका. एकसारखे पुढें-पुढें-चला. प्रियबंधूंनो, अशाच रीतीनें आपण एकसारखे मार्गक्रमण करूं या. या कार्यांत एक मृत्युवश झाला तर दुसऱ्यानें त्याचें ओझें उचललें पाहिजे.

या गांवाहून उदईक मी बोस्टनला जाईन. तेथें एका स्त्रीसमाजापुढें उद्यां माझें व्याख्यान होणार आहे. हा स्त्रीसमाज पंडिता रमाबाईला बरीच मदत करीत असतो. बोस्टनला गेल्याबरोबर मला कांहीं कापडचोपड प्रथम खरेदी केलें पाहिजे. येथें मला बरेच दिवस राहावयाचें असेल तर सध्यांचा पोषाख उपयोगी नाहीं. केवळ मला पाहण्यासाठीं रस्त्यांत लोकांच्या झुंडीच्या झुंडी जमतात. याकरितां एक लांब काळा झगा घालावा व काषाय वस्त्रें फक्त व्याख्यानाच्याच वेळीं धारण करावीं असें मी ठरविलें आहे. येथील माझ्या स्नेह्याचेंही असेंच ह्मणणें आहे. आपल्या कार्यांचा कांहीं तरी जम बसविण्यासाठीं येथें आणखी कांहीं काळ काढणें मला अवश्य आहे.

कानडा देशावांचून अमेरिकेंतील कोणत्याही भागांतल्या रेलवेंत निरनिराळे वर्ग नाहींत. या रेल्वेंत फक्त पहिला वर्गच असल्यामुळें मला त्यांतूनच प्रवास करावा लागतो; तथापि 'पुल्मन्' डब्यांचा उपयोग करण्याची छाती मला होत नाहीं. हे 'पुल्मन्' डबे सर्व प्रकारच्या सुखसो-

यींनीं सज्ज केलेले असतात. एखाद्या हॉटेलांत राहिल्याप्रमाणें खाण्यापिण्याची, निजण्याची आणि स्नानाचीही सोय त्यांत असत; पण असल्या डब्यांना आकारही भारी पडतो.

येथील समाजांत प्रवेश करून आपलें ह्मणणें त्याच्या कानीं जाईसें करणें हेंच मोठें कठिण काम आहे. सध्यां बहुतेक शहरें ओस पडलीं आहेत. बहुतेक मोठे लोक थंड हवेच्या जागीं गेले आहेत. हिंवाळ्यांत ही सारी वसति परत येईल. याकरिता तोंपर्यंत मला वाट पाहिली पाहिजे. इतका वेळ कळ सोसून आतां आयत्या वेळीं मी मागें फिरणार नाहीं. कोणतेंही महत्कार्य अल्पावधींत होत नसतें, हें आपण लक्ष्यांत ठेवलें पाहिजे. सहा महिन्यांच्या खर्चापुरती माझी तुम्हीं तरतूद कराल तर पुढें सर्व जम नीट बसेल, अशी मला आशा आहे. युक्तिप्रयुक्तीनें काय लाग साधतो हें मी सध्यां पाहात आहें. या दिवसांतही येथें इतकी थंडी आहे कीं, सकाळीं आणि रात्रीं प्रत्येक दिवशीं शेगड्या पेटवाव्या लागतात. कानडांत तर याहूनही अधिक थंडी आहे. इतक्या ठेंगण्या टेकड्यांवर बर्फ पडल्याचें मी कधींही पाहिलें नव्हतें.

येथील समाजांत हळूहळू माझा प्रवेश होईल; पण त्याकरितां येथला भयंकर खर्च सोसावा लागेल. हिंदुस्थानांत रुपयाची किंमत वाढविल्यामुळें येथील सराफकट्टयांत सध्यां बरीच धामधूम झाली आहे. शेंकडों गिरण्या बंद पडल्या आहेत.

अखेरपर्यंत मी उद्योग करीत राहीन. थंडीनें, क्षुधेनें अथवा रोगानें येथें माझा अंत झाला तर माझ्या मित्रा, माझें कार्य तू पुढें चालव. येथें मला यश न आलें तर इंग्लडास जाऊन तेथें मी खटपट करीन. तेथेंही यशप्राप्ति न झाली तर हिंदुस्थानास परत येऊन परमेश्वराच्या पुढील हुकुमाची वाट पाहात मी राहीन.

आपला,

**विवेकानंद.**

## पत्र ४१ वें.

शिकागो,

ता. २ नवंबर १८९३.

प्रिय—

माझ्या क्षणैक मनोदौर्बल्यामुळें तुह्मांस इतका त्रास झाला, याबद्दल मला फार वाईट वाटतें. त्या वेळीं माझ्यापाशीं पैशाचा थोडासा तुटवडा होता; पण त्यानंतर लौकरच परमेश्वरानें मला साहाय्य करणारे मित्र पाठविले. बोस्टन शहरानजीकच्या एका खेड्यांत हार्वर्ड युनिव्हर्सिटींतील ग्रीकचे प्रोफेसर डॉक्टर राइट यांशीं माझी ओळख झाली. माझ्यासंबंधीं त्यांनीं बरीच सहानुकंपा दाखविली आणि महाधर्मपरिषदेंत मी अवश्य जावें असेंही ते ह्मणाले. कारण, त्यामुळें अमेरिकन राष्ट्राला माझी ओळख होण्यास बरें पडेल असें ते ह्मणाले. माझी येथें कोणाशींही ओळख नसल्यामुळें या कामीं सर्व व्यवस्था करण्याचा पत्कर सदहू प्रोफेसर साहेबांनीं घेतला आहे. यानंतर लौकरच मी शिकागोला परत आलों. या ठिकाणीं महाधर्मपरिषदेच्या पौर्वात्य आणि पाश्चात्य धर्मांच्या प्रतिनिधींची उतरण्याची सोय एका गृहस्थाकडे करण्यांत आली आहे. याच गृहस्थाच्या घरीं माझीही सोय डॉ. राइट यांनीं केली आहे. महाधर्मपरिषद् भरली त्या दिवशीं सकाळीं आह्मीं सर्व प्रतिनिधी आर्ट पॅलेस नांवाच्या एका इमारतींत एकत्र जमलों. या ठिकाणीं लहान मोठीं अनेक तात्पुरतीं सभागृहें उभारण्यांत आलीं होतीं. येथें सर्व राष्ट्रांचे लोक दिसत होते. हिंदुस्थानांतून ब्राह्मसमाजातर्फे मुजूमदार आणि मुंबईचे नगरकर आले होते. जैनधर्मातर्फे मिस्तर गांधी आणि थिऑसफी तर्फे मिसेस आनी बेझंट व चक्रवर्ती अशी मंडळी हजर होती. या पैकीं मुजुमदारांची व माझी पूर्वींचीच ओळख होती; आणि चक्रवर्ती मला नांवानें ओळखीत होते. आर्ट पॅलेस मधून मिरवणुकीच्या थाटानें आह्मी बाहेर पडलों व महाधर्मपरिषदेच्या सभागृहांत जाऊन तेथें तयार केलेल्या उच्चासनावर आह्मी आरूढ झालों. समोर पांचसात हजार माणसें बसलेलें प्रचंड सभागृह व वरील बाजूस सज्जांत आणखाही किती तरी लोक बसलेले असा देखावा तुह्मीं आपल्या मनःश्चक्षूंपुढें आणा. अमेरिकेंतील संस्कृ-

तीचीं आदर्शरूप अशीं शेंकडों स्त्रीपुरुषें प्रेक्षकगणांत बसलीं होतीं. आणि उच्चासनावर पृथ्वीवरील साऱ्या देशांतील पंडित अधिष्ठित झाले होते. ज्यानें साऱ्या जन्मांतही एखाद्या सभेपुढें एक शब्दही उच्चारला नाहीं असा माझ्यासारखा मनुष्य अशा प्रकारच्या सभेंत बोलणार! भाषणांच्या घोषांत आणि वाद्यांच्या कर्णमधुर सुरांत सभेच्या कामास आरंभ झाला. नंतर एकेका धर्मप्रतिनिधीची ओळख करून देण्यांत येऊन त्या त्या प्रतिनिधीनें थोडेंसें भाषण केलें. माझें हृदय धाड् धाड् उडत होतें, आणि जीभ वाळून जाऊन टाळ्यास चिकटून बसली होती. मी खरोखर अगदीं घाबरून गेलों; आणि सकाळच्या क्रमांत भाषण करण्याचें धैर्य मला झालें नाहीं. मुजूमदारांचें भाषण फार सुंदर झालें आणि चक्रवर्ती यांचें तर त्याहूनही चांगलें झालें. श्रोत्यांनीं उत्साहपूर्वक या दोघांचें स्वागतही केलें. या दोघांनीं आगाऊच आपलीं भाषणें तयार करून पूर्ण तयारी केली होती. मी मात्र मूर्ख असा कीं, मीं अगाऊ तयारी मुळींच केली नव्हती. पण काय करणार? देवी सरस्वतीला वंदन करून आणि आलेल्या भोगास सादर होऊन मी उठून पुढें झालों. डॉक्टर बॅरोज् यांनीं श्रोत्यांस माझी ओळख करून दिली, आणि मी भाषणास सुरुवात केली. "अमेरिकेंतील माझ्या भगिनिबंधूंनो—" दोन मिनिटेंपर्यंत टाळ्यांच्या कडकडाटानें सारें सभागृह दणाणून गेलें. लहानसेंच भाषण करून मी खालीं बसलों त्या वेळीं अंतर्गत भावनांच्या कल्लोळामुळें मला अगदीं थकवा आल्यासारखें झालें होतें. दुसऱ्या दिवशीं अमेरिकन पत्रें मी पाहिलीं, तेव्हां त्या दिवशींच्या साऱ्या भाषणांत माझें भाषण सर्वोत्कृष्ट झालें असें त्यांनीं लिहिलें असल्याचें मला आढळून आलें. त्याच दिवशीं माझें नांव सर्व अमेरिकाभर दुमदुमून गेलें. 'मूकं करोति वाचालं' हें वचन किती खरें आहे याचा पूर्ण प्रत्यय मला त्या दिवशीं आला. मुक्याला बृहस्पति बनविणाऱ्या त्या भगवंताचा जयजयकार असो. त्या दिवसापासून अमेरिकेंत माझी कीर्ति वाढूं लागली. माझी गणना प्रख्यात पुरुषांत होऊं लागली. ज्या दिवशीं हिंदुधर्मावरील माझा निबंध मीं वाचला, त्या दिवशीं श्रोत्यांची इतकी गर्दी झाली होती कीं, तशी गर्दी पूर्वी केव्हांच कोणी पाहली नसेल. या दिवसाचें वर्णन एका वर्तमानपत्रांत आलें आहे, त्यांतील एकच वाक्य

मी येथें देतों. " स्त्रिया, स्त्रिया, स्त्रिया. जिकडे तिकडे स्त्रियांची गर्दी उसळून गेली होती. कोनाकोपऱ्यांतूनही स्त्रिया खेंचून भरल्या होत्या. स्वामी विवेकानंद यांची निबंधवाचनाची वेळ येईपर्यंत दुसरे अनेक निबंध तेथें वाचले गेले आणि या स्त्रियाही पुढील आशेवर नजर देऊन गर्दीचा होणारा त्रास शांतपणें सोशीत होत्या. इत्यादि." वर्तमानपत्रांतील उतारे मला इतके देतां येतील कीं, ते वाचून तुह्मीं आश्चर्यानें खरोखर थक्कच व्हाल; पण अशा प्रकारच्या कीर्तीचा मी भुकेला नसून उलट द्वेष्टा आहें, हें तुम्हांस ठाऊक आहेच. मी जेव्हां जेव्हां वक्त्यांच्या भाषण करण्याच्या जागीं जात असें तेव्हां तेव्हां टाळ्यांच्या प्रचंड कडकडाटानें माझें स्वागत होत असे इतकेंच सांगितलें म्हणजे पुरे. बहुतेक साऱ्या वर्तमानपत्रांनीं मजवर स्तुतीचा वर्षाव केला आहे. " सुंदर आणि जादूनें भारलेल्या चेहेऱ्याच्या या मनुष्याचें वक्तृत्व आश्चर्यजनक असून महाधर्मपरिषदेंत यानें प्रमुख स्थान मिळविलें आहे इत्यादि." असें येथील अत्यंत जुन्या कर्मठ पत्रांसही कबूल करावें लागलें आहे.

अमेरिकन लोकांच्या दयाशीलतेचें वर्णन मी कोणत्या शब्दांनीं करूं ? आतां येथें मला कसलीही उणीव राहिलेली नाहीं- मला लागणाऱ्या सर्व जिनसांची तरतूद आतां उत्तम झाली आहे. युरोपला जाण्यासाठीं लागणारा सर्व पैसा मला येथेंच मिळेल. आचार्य या नांवाचा एक मुलगा बरेच दिवस येथें आला आहे. गेलीं तीन वर्षें साऱ्या शहरभर भटकण्यावांचून तो दुसरा कोणताही उद्योग करीत नाहीं. तो भटक्या मारो कीं कांहीं करो, पण तो मला फार आवडतो; एवढी गोष्ट मात्र खरी. तुह्मांला त्याच्याबद्दल कांहीं माहिती असेल तर ती सारी मला कळवा. तुमच्याबद्दल त्याला बरीच माहिती आहे. युरोपांत पारिसचें प्रदर्शन भरलें त्या सालीं तो येथें आला.

माझ्या सर्व गरजा आतां येथें भागल्या आहेत. शहरांतलीं उत्तमोत्तम घरें माझ्या आगमनाची वाट पाहत बसलीं आहेत. कोणा ना कोणाचा तरी पाहुणा ह्मणून मी सध्यां येथें राहतों. या देशाइतकी कुतूहल बुद्धि दुसऱ्या कोठेंही तुह्मांस आढळावयाची नाहीं. प्रत्येक गोष्ट समजून घेण्याची लालसा त्यांना आहे; आणि येथल्या स्त्रियांना तर विचारूंच नका. साऱ्या बाबतींत येथील स्त्रियांनीं आघाडी मारल्याचें दिसतें. इतक्या पुढें गेलेल्या स्त्रिया

जगांत दुसऱ्या कोठेंही आढळावयाच्या नाहींत. सामान्यतः अमेरिकन पुरुषांपेक्षां अमेरिकन स्त्री अधिक सुशिक्षित आहे. पुरुष सारा दिवस कवडी कवडी करीत असतात आणि स्त्रिया स्वतःची उन्नति करण्यांत प्रत्येक संधीचा उपयोग करून घेत असतात. अमेरिकन लोक सामान्यतः खुल्या दिलाचे आणि दयाशील आहेत. कोणालाही आपलें एखादें तट्टू पुढें ढकलावयाचें असलें तर तो प्रथम येथें येतो. असल्या लोकांत प्रत्यक्ष तत्त्व कांहींच नसतें ही मात्र मोठया दुःखाची गोष्ट आहे. अमेरिकन लोकांतही कांहीं दोष आहेत हें खरें, पण अगदीं निर्दोष असें कोणतें राष्ट्र आहे ? संस्कृतीचा पाया आशिया खंडानें घातला. युरोपानें पुरुषांला सुसंस्कृत केलें आणि अमेरिकेनें स्त्रिया व सामान्य जनता यांना उन्नतावस्थेस आणलें. माझ्या एकंदर निरीक्षणाचा मथितार्थ एवढ्यांत येतो. अमेरिका ह्मणजे स्त्रिया आणि मजूरवर्ग यांचें नंदनवनच होय. येथील स्त्रिया आणि खालचा वर्ग यांची तुलना आपल्याकडील त्याच वर्गांशीं केली तर दोहोंतील जमीन अस्मानाचें अंतर तेव्हांच नजरेस येतें. अमेरिकन लोक झपाट्यानें उदारमतवादी होत चालले आहेत. इकडे येणाऱ्या जुन्या कर्मठ नमुन्यांवरून एकंदर अमेरिकन लोकांची परीक्षा तुम्हीं करूं नका. तसले हठवादी कर्मठ येथेंही आढळतात; पण त्यांची संख्या दिवसेंदिवस झपाट्यानें कमी होत आहे. आपण मोठे धार्मिक आहों, असा बाणा हिंदु लोक बाळगतात; पण अमेरिकन लोकही या मार्गानें आतां झपाट्यानें पुढें पाऊल टाकीत आहेत.

हिंदु लोकांनीं आपला धर्म सोडूं नये, तथापि आपले धर्ममार्ग योग्य मर्यादेंत राखून समाजास विस्तार पावण्यास त्यांनीं आतां मोकळीक दिली पाहिजे. पुष्कळ वर्षांच्या अवनतीनें आणि भिक्षुकवर्गाच्या कठोरतेनें हिंदु समाजाची जी भयंकर दशा झाली, तिचें खापर सुधारकांनीं धर्माच्या माथीं फोडलें, ही मोठी भयंकर चूक केली. आमच्या अवनतावस्थेस आमचा धर्म कारण झाला, या भ्रमानें धर्माची इमारत उलथून पाडण्याचा उद्योग त्यांनीं आरंभिला; पण ही इमारत असल्या प्रकारच्या हल्लयांना दाद देणारी नाहीं; ती अभेद्य आहे. यामुळें त्यांच्या कृतीचा परिणाम काय झाला ह्मणाल, तर अपयश. बुद्धापासून तों थेट राममोहन रायापर्यंत प्रत्येकानें एकच चूक केली आहे. जातिभेद ही धार्मिक संस्था आहे असा या साऱ्यांचा चुकीचा

समज झाला. या भ्रमानें त्यांनीं धर्म आणि जात या दोहोंस एकदमच ढांसळून पाडण्याचा यत्न केला. या कार्यांत यांपैकीं कोणासही यश आलें नाहीं, हें आपणास ठाऊक आहेच; तथापि भिक्षुकवर्गानें कितीही ओरड केली तरी जात ही धार्मिक संस्था होऊं शकत नाहीं. पुष्कळ वर्षांच्या शांततेमुळें ती उत्पन्न झाली असून ती केवळ सामाजिक संस्था आहे; पण तिचें कार्य तिनें बजावलें असून आतां ती मरून गेली असल्यामुळें सडूं लागून आपल्या दुर्गंधानें भरतभूमीचें वातावरण दूषित करीत आहे. समाजाचे नष्ट झालेले वैय्यक्तिक हक्क त्यास फिरून देण्यानेंच ती संस्था नाहींशी करतां येणें शक्य आहे. अमेरिकेंत जन्मलेला प्रत्येक पुरुष खरोखर पुरुषच असतो. आपल्या ठिकाणीं पौरुष आहे, कर्तृत्व आहे, याची पक्की जाणीव त्याला असते. उलटपक्षीं हिंदुस्थानांतील प्रत्येक पुरुषाला आपण समाजाचे गुलाम आहों असें वाटत असतें. स्वातंत्र्यावांचून वाढ नाहीं. स्वातंत्र्य नष्ट झालें, कीं समाज अवनतीला लागलाच. अर्वाचीन काळच्या चढाओढींत जातिभेद कसा झपाट्यानें नष्ट होत आहे पहा. त्याला मारण्यासाठीं धर्माचें शस्त्र नको. आतां ब्राह्मणसुद्धां वाण्यांचा, चांभाराचा आणि दारू गाळण्याचा धंदा उघड माथ्यानें करीत आहेत. उत्तर हिंदुस्थानांत तर हा देखावा कोठेंही आढळून येतो. सांप्रतची चढाओढ हेंच या परिस्थितीचें कारण आहे. सध्यांच्या सरकारच्या अमलांत पोटासाठीं कोणताही धंदा करण्याची मनाई कोणासही नाहीं. यामुळें चढाओढ अत्यंत तीव्र झाली असून त्यामुळें हजारों लोक तळाशीं खितपत पडून न राहतां आपल्या जन्मसिद्ध गुणांनीं प्राप्य अशा उच्चतमावस्थेस जात आहेत, आणि जाण्याची धडपड करीत आहेत.

निदान हिंवाळा संपेपर्यंत तरी मला या देशांत राहिलें पाहिजे. त्यानंतर मी युरोपांत जाईन. माझी सर्व प्रकारची तरतूद परमेश्वर करील. त्याबद्दल आतां काळजी करण्याचें कारण आपणास नाहीं. तुमच्या प्रेमाबद्दल नुसत्या शब्दांनीं मी कसा उतराई होईन ?

परमेश्वराचा पाठिंबा मला आहे अशी दिवसेंदिवस माझी खात्री होत आहे. मी त्याच्या हुकुमाप्रमाणें चालण्याचा यत्न करीत आहें. जगासाठीं

आपण पुष्कळ मोठया गोष्टी करूं. केवळ नांव मोठें होण्यासाठीं अथवा कीर्तीसाठीं चांगलीं कामें करावयाचीं नसून केवळ जगाच्या बऱ्यासाठींच तीं करावयाचीं. परमेश्वराची जशी मजा असेल तसें होईल.

'**कर्मण्येवाधिकारस्ते**' हें वचन नित्य ध्यानांत ठेऊन फलाची अपेक्षा न करतां आपण कार्यरत राहिलें पाहिजे. सदोदित आनंदित वृत्तीनें राहत जा. मोठया गोष्टी करण्यासाठींच परमेश्वरानें आपणास जन्मास घातलें आहे, अशी भावना आपल्या ठिकाणीं पक्की झाली ह्मणजे मोठया गोष्टी आपल्या हातून खास घडून येतील. यासाठीं आपण स्वतःच प्रथम तयारी करून सदोदित जय्यत राहिलें पाहिजे. ही तयारी ह्मणजे अंतःकरणाचें पावित्र्य आणि निष्काम प्रेम ही होय. गरीब आणि दुःखी कष्टी लोकांबद्दल तुमच्या चित्तांत निष्काम प्रेम उद्भवलें ह्मणजे परमेश्वराचा आशिर्वादही तुह्मांस मिळेल.

आपल्या तेथील मित्रांस वारंवार भेटत जा, आणि हिंदुस्थानांतील खालच्या वर्गांच्या लोकांबद्दल त्यांच्या चित्तांत प्रेमाचें बीजारोपण करून देत जा. आपण वरिष्ठवर्गीय लोक त्यांस कसे दडपीत आहों हें त्यांच्या ध्यानीं आणून द्या. त्यांच्या उन्नतीस वरिष्ठवर्गियांनीं हातभार न लावला तर ते मनुष्यच नव्हेत. कोणाचीही भीति बाळगूं नका. परमेश्वर तुमच्या सन्निध सदोदित आहे मग तुह्मांस भीति कशाची? हिंदुस्थानांतील लक्षावधि क्षुधितांस आणि अज्ञानतिमिरांत बुडालेल्या लोकांस परमेश्वर अद्यापीही मार्ग दाखवील. तुमच्यांतील पुष्कळशा तरुणांपेक्षां आणि बहुतेक साऱ्या राजेरजवाड्यांपेक्षां येथला रेल्वेचा हमाल सुद्धां अधिक सुशिक्षित आहे. हिंदु स्त्रियांच्या स्वप्नींही येत नसेल इतकें शिक्षण येथील स्त्रियांस मिळालें आहे. आपणासही असा शिक्षणप्रसार कां करतां येऊं नये? हें काम आपण केलेंच पाहिजे.

आपण दरिद्री आहों म्हणून आपल्या हातून कांहीं होणार नाहीं, असा विचारसुद्धां मनांत आणूं नका. पैशांत कोणत्याही प्रकारचें सामर्थ्य नाहीं. पण सौजन्य आणि पावित्र्य यांच्या ठिकाणीं मात्र तें आहे, या गोष्टीचा प्रत्यय साऱ्या जगभर तुम्हांस कोठेंही आढळून येईल.

आपला,

**विवेकानंद.**

**ता. क.** — नें पाठविलेला निबंध खरोखर मोठा विलक्षणच होता. जणूं काय एखाद्या व्यापाऱ्याची किमतीची यादीच त्यानें पाठविली होती. असला निबंध महाधर्म परिषदेंत वाचण्याच्या किमतीचा नव्हता. यासाठीं एका गृहस्थानें त्यांतले थोडेसे उतारे एका बाजूच्या मंडपांत वाचले; पण त्यांतलें एक अक्षरही कोणास कळलें नाहीं. ही गोष्ट त्याला तुम्हीं सांगूं नका. अगदीं थोड्या शब्दांत पुष्कळ भावार्थ आणणें ही एक मोठी महत्त्वाची कला आहे. दुसऱ्या एका निबंधांतही बरीचशी छाटाछाट करावी लागली. थोड्याशा अवधींत सुमारें एक हजार निबधांचें वाचन तेथें व्हावयाचें होतें. अशा स्थितींत अशाप्रकारच्या कांहीं तरी भरकटलेल्या मजकुरास कोठून थारा मिळेल? प्रत्येक निबंधाच्या वाचनास फक्त अर्धा तास देण्यांत आला होता; तथापि मला मात्र याहून बराच अधिक वेळ मिळाला. लोकांना आवडणाऱ्या वक्त्यांचीं भाषणें अखेरपर्यंत राखून ठेवीत असत. यामुळें लोकही मध्येंच सभास्थान सोडून जात नसत. वक्त्याबद्दल त्यांच्या ठिकाणीं किती प्रेमभाव होता म्हणून सांगूं? तसेंच पुष्कळ वेळ तिष्ठत बसण्यास लागणारी मनाची शांतीही त्यांच्या ठिकाणीं फार होती. सकाळीं दहा वाजल्यापासून तों रात्रीं दहापर्यंत सारा श्रोतृगण शांत बसलेला असे; मध्यंतरीं फक्त अर्धा तासच विसांवा मिळे. या अवधींत निबंधांमागून निबंध वाचले जात असत. यांपैकीं बरेचसे निबंध खरोखर अगदीं क्षुल्लक असत; तथापि आपल्या आवडत्या वक्त्याच्या भाषणश्रवणासाठीं सारा समाज निमूटपणें अखेरपर्यंत बसून राही.

सिलोनचे धर्मपाल हे एक लोकांच्या आवडत्या वक्त्यांपैकीं होते. धर्मपाल हे फार गोड स्वभावाचे गृहस्थ आहेत. माझी व त्यांची चांगलीच मैत्री जमली होती.

बाई सोराबजी नांवाची एक पुण्याची ख्रिस्ती स्त्री आणि जैनप्रतिनिधी गांधी हीं दोघें बरेच दिवस येथें राहणार आहेत. त्यांच्या मनांतून जागोजाग व्याख्यानें द्यावयाचीं आहेत. त्यांना यश येईल अशी मला आशा आहे. व्याख्यानें देणें हा धंदा या देशांत बराच फायद्याचा आहे; आणि कित्येक वेळां तर त्यावर खूप पैसा मिळवितां येतो. इंगरसोल हे एका व्याख्यानास दीड दोन हजार रुपये सहज मिळवितात. या देशांत हे एक मोठे प्रख्यात व्याख्याते आहेत.

# स्वामी विवेकानंद यांचे समग्र ग्रंथ.

प्रत्येक राष्ट्राच्या संस्कृतीचे मार्ग भिन्न भिन्न असतात. त्या विशिष्ट मार्गांस धरूनच त्या राष्ट्रानें आपली उन्नति करून घेतली पाहिजे. भरतभूमीच्या संस्कृतीचा पाया धर्म हा असल्यामुळें, त्याच्या आधाराशिवाय कोणताहि संस्कृतिमार्ग यशस्वी होऊं शकणार नाहीं. आमच्या आधुनिक शिक्षणपद्धतीमुळें खऱ्या धर्मशास्त्राची व आमची फारखत झाल्यासारखें झालें आहे. जुने ग्रंथ पूर्वपरंपरेचे, ते समजावयाचीं साधनेंहि कमी झालीं. अशा स्थितींत आमचीं जुनीं धर्मतत्त्वें नव्या भाषेनें सांगणारा कोणी तरी हवा होता. हें मार्गदर्शकाचें काम स्वामी विवेकानंद यांनीं उत्कृष्ट प्रकारें बजावलें आहे.

वेदान्तप्रतिपादित धर्म अव्यवहार्य नाहीं, एवढेंच नव्हे तर त्याच्या अभावीं व्यक्तीची व राष्ट्राची अवनति होते, ही गोष्ट सनातन धर्मसिद्धांत, भौतिक शास्त्रांचे सिद्धांत आणि संतांचा अनुभव या साधनत्रयीनें स्वामीजींनीं निःसंशय सिद्ध केली आहे.

स्वामीजींचीं व्याख्यानें, लेख, पत्रें वगैरेंचा लाभ निव्वळ मराठी वाचकांस व्हावा या हेतूनें त्यांच्या समग्र लेखांचें मराठी रूपांतर करण्याचें आह्मी सुरू केलें आहे. अशा प्रकारचीं अवजड कामें वाचकवर्गाच्या भरपूर साहाय्याशिवाय तडीस जाणें शक्य नाहीं. आमचा महाराष्ट्रभाषाभिमानी वाचकवर्ग आह्मांस मनःपूर्वक साहाय्य करील अशी अपेक्षा अनाठायीं होणार नाहीं, अशी आमची खात्री आहे.

**किंमत**--प्रत्येक खंडास कायमच्या वर्गणीदारांस, साधी बांधणी, रु० १, कापडी सोनेरी बांधणी रु. १।; इतरांस प्रत्येकीं चार आणे अधिक.

**पत्ता**-म्यानेजर, **कर्नाटक छापखाना**, ठाकुरद्वार-मुंबई.

# स्वामी विवेकानंद यांचे समग्र ग्रंथ.

## प्रथम खंडांतील विषय.

## द्वितीय खंडांतील विषय.



## तृतीय खंडांतील विषय.

## चतुर्थ खंडांतील विषय.

